


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# क्षणचित्रे



डॉ. अरुणा ढेरे 'मसाप'च्या 'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमात हुजूरपागा प्रशालेत रंगला संवाद.




'मसाप'च्या 'कथासुगंध' या कार्यक्रमात छाया महाजन यांच्या कथेचे अभिवाचन




एक कवी एक कवयित्री रमण रणदिवे आणि हेमा लेले




नंदकुमार सावंत याना मसाप कार्यकर्ता पुरस्कार




नंदा सुर्वे यांना मसाप कार्यकर्ता पुरस्कार

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३६०, जुलै-सप्टेंबर २०१७



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**

**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**



प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३

संकेतस्थळ : www.masapapune.org

ई-मेल : masaparishad@gmail.com

(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका











◆

मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

◆

जाहिरात व्यवस्थापक
**शिरीष चिटणीस**
७५८८८६५०५१

◆

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

◆

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

◆

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

◆

मुद्रितशोधन
**अनुश्री भागवत**

◆

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

◆

मूल्य : १५ रुपये

◆

प्रकाशन क्र. ३६०
जुलै-सप्टेंबर २०१७

◆

या अंकात व्यक्त झालेल्या
विचारांशी संपादक, संपादन समिती,
सल्लागार मंडळ तसेच प्रकाशक
सहमत असतीलच असे नाही.

# अं | त | रं | ग


- संपादकीय : 'अंतरीचा ज्ञानदिवा मालवू नको रे'
  **डॉ. पुरुषोत्तम काळे** । ३

**श्रद्धांजली**

- 'अज्ञात रेषां'च्या आसपास : शिरीष पै
  **आश्लेषा महाजन** । ५

**लेख**

- १९९०नंतरचे मराठीतील डावे वैचारिक लेखन :
  एक चिकित्सा । **डॉ. दीपक बोरगावे** । ८
- साहित्यविश्व आणि देशीवादाची चर्चा
  **भास्कर ढोके** । २१
- नवदर्शनाच्या प्रतीक्षेत पुरोगामी विचारविश्व
  **किशोर बेडकिहाळ** । २५
- साहित्यकृतीचे माध्यमांतर । **राजेंद्र थोरात** । ३५

**समीक्षा**

- प्रवीण बांदेकर यांची 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या'
  **कैलास जोशी** । ३१
- आटपाटनगरीची सामान्य तत्त्वे । **महेंद्र कदम** । ४०

**पुस्तक परीक्षण**

- उगम : सृजनाची महत्ता अधोरेखित करणारी कादंबरी
  **डॉ. सुरेश जोशी** । ४४
- स्थित्यंतराचे भाषेवरील पडसाद आणि भाषाप्रकाश
  **प्रा. डॉ. वर्षा तोडमल** । ४६
- सईची 'सय' कलाप्रवासाची रंगतदार स्मरणयात्रा
  **सुधीर गाडगीळ** । ४८
- मरणगंधाच्या कुपीतली महानगरीय जाणीव : शहर आत्महत्या
  करायचं म्हणतंय! । **प्रा. डॉ. चंद्रकांत पोतदार** । ५१

- शाखा कार्यवृत्त : **प्रकाश पायगुडे** । ५४

- मराठी विज्ञान परिषदेची पहिली पन्नास वर्षे । **म. ना. गोगटे** । ६४



संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# 'अंतरीचा ज्ञानदिवा मालवू नको रे'

*- संत सोहिरोबा*

**म.** सा. पत्रिकेचा ३६०वा अंक आपल्या हाती देताना विशेष आनंद होत आहे. हे संपादकीय लिहीत असताना अखिल भारतीय साहित्य संमेलन बडोद्याला होणार ही बातमी आली. महाराजा सयाजीराव गायकवाडांच्या बडोदा नगरीत हे संमेलन होणार याचा आम्हाला विशेष आनंद आहे. स्वातंत्र्यपूर्व काळातील महाराष्ट्रातील बहुतेक संस्थांना महाराजांचा राजाश्रय होता. अनेक विद्वानांना विद्यार्जनासाठी महाराजांनी साहाय्य केले. शिक्षण, कृषी आणि आरोग्यादी क्षेत्रांमध्ये महाराजांनी केलेल्या पायाभूत कामांचा आदर्श महाराष्ट्रातील संस्थानिकांनी घेतला. खऱ्या अर्थाने समतावादी असलेल्या महाराजा सयाजीरावांनी नेहमीच पुरोगामी, आधुनिक विचारांचे स्वागत केले. महात्मा जोतिबा फुल्यांच्या 'शेतकऱ्यांचा आसूड' या ग्रंथाचे फुल्यांनी केलेले वाचन ऐकून ग्रंथछपाईस अर्थसाहाय्य केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांसारख्या अनेक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देऊन परदेशी शिक्षण घेण्यास साहाय्य करणाऱ्या या गुणग्राहक राजाच्या बडोदा नगरीत हे ९१वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन होत आहे, ही म्हणूनच आनंदाची बातमी आहे.



अ. भा. साहित्य संमेलन आणि वाद यांचे नाते गेल्या काही वर्षांमध्ये दृढ झाले आहे. महाराष्ट्र आणि बृहन्महाराष्ट्रातील मराठी भाषिकांनी एकत्र यावे, मराठी साहित्याविषयी आणि त्यातील विविध प्रवाहांमधील साहित्य-निर्मितीचा सर्वांगीण आढावा घेतला जावा यासाठी साहित्य संमेलन भरविले जाते. या निमित्ताने आयोजित केल्या जाणाऱ्या ग्रंथप्रदर्शनांनी मराठी वाचनसंस्कृती वाढीस लागावी, हा उद्देश यामागे आहे. नवोदित लेखक, कवी, कथाकथनकार आणि विचारवंतांच्या साहित्याविषयींच्या भूमिकेचे रसिकांना दर्शन होते. मराठी साहित्य संस्कृतीमध्ये अ. भा. मराठी साहित्य संमेलनांना यामुळेच वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. संमेलन उत्सवी, ऐश्वर्यपूर्ण असावे का? संमेलनामुळे मराठी साहित्यविश्वात काय बदल घडतात? यासारख्या प्रश्नांवर हिरिरीने वाद घातले जातात. वाद-संभाषा ही भारतीयांची ओळखच आहे. आपापली वैचारिक भूमिकाच कशी योग्य





अनुक्रमणिका

आहे, हेही यानिमित्ताने ठासून सांगितले जाते. संमेलनांना विरोध केला जातो. संमेलन उधळून लावण्याची धमकीही काही विचारवंत साहित्यप्रेमी देतात. या सर्वांच्या मतांचा आदर करूनही हे संमेलन मराठी भाषिकांचे आणि मराठी साहित्याविषयी विचारमंथन करण्यासाठी आहे, हे सांगावेसे वाटते. संमेलनाच्या स्वरूपाविषयी मतमतांतरे असू शकतात, पण म्हणून ते होऊच नये असे म्हणणे योग्य नाही. हे संमेलन अतिशय यशस्वी व्हावे यासाठी बडोद्याच्या आयोजक संस्थेला शुभेच्छा! संस्थात्मक काम करणे हे सोपे नसते, अनेक प्रवाद उद्भवू शकतात, टीका होते; परंतु संस्थांचे काम निरलसपणे पुढे नेणे हे साहित्य-संस्कृती व्यवहारासाठी आवश्यक आहे. त्यामुळे विरोधी आवाज-मते न दडपता, ती ऐकून, आत्मपरीक्षण करून साहित्यव्यवहार आणि संमेलन सर्वसमावेशक कसे होईल, हे पदाधिकाऱ्यांनी पाहावे. साधनशुचिता ही कोणत्याही आयोजनात असली पाहिजे, याकडे लक्ष दिले पाहिजे. या संमेलनांमधून मराठी साहित्याच्या सौंदर्याचे दर्शन रसिकांना घडावे यासाठी दर्जेदार साहित्यविषयक कार्यक्रमांचे आयोजन व्हावे. ग्रंथविक्री अधिक प्रमाणात व्हावी यासाठी योग्य ते प्रयत्न अ. भा. साहित्य मंडळाने करावेत. संमेलन वैभवी आणि भपकेबाज होण्यापेक्षा ते साहित्यरसिकांचे व्हावे, यासाठी मनःपूर्वक प्रयत्न सर्व साहित्यसेवक पदाधिकाऱ्यांनी केले पाहिजेत. ग्रामीण भागातील साहित्यिकांना संमेलनात उचित प्रतिनिधित्व मिळावे. गेल्या काही दिवसांत ज्येष्ठ व्यंगचित्रकार मंगेश तेंडुलकर, 'बेरड'कार भीमराव गस्ती, आंबेडकरी चळवळीतील भीमसेन देठे आणि मराठी काव्यक्षेत्रात हायकू लोकप्रिय करणाऱ्या कथालेखक, कवयित्री आणि साप्ताहिक 'नवयुग'च्या संपादक शिरीष पै यांचे निधन झाले. या मान्यवर साहित्यिकांना भावपूर्ण आदरांजली!

पत्रकार गौरी लंकेश यांची निर्घृण हत्या काही दिवसांपूर्वी झाली. विचारवंतांच्या हत्या होणे हे कोणत्याही समाजाला भूषणावह नाही. दाभोळकर, पानसरे, कलबुर्गी यांच्या हत्यांचा तपास लागलेला नसताना गौरी लंकेश यांच्या हत्येमुळे समाज-वास्तव किती दूषित झाले आहे, याची कल्पना येते. गौरी लंकेश यांच्या हत्येचा आम्ही निषेध करीत आहोत. त्यांच्या विचारांचा प्रतिवाद विचारांनी न करता त्यांची हत्या केली जाते हे लांच्छनास्पद आहे. आपण खरोखर सहिष्णू आहोत का? याविषयी समाजमाध्यमांमध्ये प्रामाणिकपणे चर्चा व्हावी. या चारही हत्यांचा तपास लवकर पूर्ण होऊन खुन्यांना शासन व्हावे.

या अंकामध्ये नव्वदोत्तर वैचारिक साहित्यप्रवाहातील पुरोगामी मार्क्सवादी आणि देशीवादी साहित्याचा आढावा घेणारे तीन लेख प्रकाशित करीत आहोत. आगामी अंकांमधून इतर वैचारिक प्रवाहांबाबतच्या साहित्यविषयीचे लेख प्रसिद्ध करू. शिरीष पै यांच्या साहित्याविषयीचा लेख आणि प्रवीण बांदेकरांच्या 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या कादंबरीवरील लेख रसिकांचे लक्ष वेधून घेतील.

साहित्य अकादमीचे पुरस्कार राहुल कोसंबी यांच्या 'उभं आडवं' आणि ल. म. कडू यांच्या 'खारीचा वाटा' या साहित्यकृतींना जाहीर झाले आहेत. दोघांचेही साहित्य पत्रिका आणि परिषदेतर्फे मनःपूर्वक अभिनंदन. मुखपृष्ठावरील शिरीष पै यांचे छायाचित्र छापण्यास जया दडकर यांनी परवानगी दिली. आम्ही त्यांचे ऋणी आहोत. त्यांचे आभार!

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे विश्वस्त, साहित्यिक, विचारवंत मा. यशवंतराव गडाख यांचा अमृतमहोत्सवी सत्कार नुकताच परिषदेत झाला. त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो आणि त्यांच्या हातून अधिक साहित्यसेवा घडो ही शुभेच्छा!

येणाऱ्या दीपावलीच्या आपणास व आपल्या कुटुंबीयांना शुभेच्छा. ही दीपावली सर्वत्र ज्ञानाच्या प्रकाशाचा वर्षाव करणारी ठरो, ही प्रार्थना!

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)














श्रद्धांजली

आश्लेषा महाजन

# 'अज्ञात रेषां'च्या आसपास शिरीष पै



**शिरीषताईंनी कादंबरी, कथा, नाटके, ललित लेख, बालकुमार साहित्य अशा विविध प्रकारांतून 'स्व'चा शोध घेतला. निसर्गातील रंगलाघवी विभ्रमांना अतीव उत्कटतेने शब्दांमध्ये उतरवणारे त्यांचे 'ऋतुचित्र' हे पुस्तक म्हणजे जणू मुक्तछंद कविताच. असे असले तरी कविता हेच त्यांच्या अभिव्यक्तीचे आशयद्रव्य होते, हे त्यांच्या कविता, रुबाया आणि हायकू वाचताना जाणवते.**



**स्वा**तंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर काळात ज्यांच्या अमोघ-निर्भीड लेखणीचे आणि प्रभावी-परखड वक्तृत्वाचे अवघ्या महाराष्ट्रावर गारूड झाले होते, त्या आचार्य अत्रे नावाच्या झंझावाताची लेक म्हणजे शिरीष पै. मोठ्या वृक्षाखाली उगवलेल्या वाळ-रोपट्यांची वाढ खुंटते, असे म्हणतात. पण शिरीषताई त्याला अपवाद ठरल्या. एका वलाढ्य डेरेदार वृक्षाच्या सावलीत उगवूनही त्यांनी मान वर करून आपले ऊन शोधले. आपल्या ऊर्मीसाठी हवा तसा पैस शोधला. मनस्वीपणे तरी शांतपणे आपली अभिव्यक्तीची जमीन शोधली. उत्कट असोशीने आपल्याच खास वेगळ्या ढंगात, आपल्या प्रतिभेच्या प्रांतात विमुक्तपणे मुशाफिरी केली.

शिरीषताईंनी कादंबरी, कथा, नाटके, ललित लेख, बालकुमार साहित्य अशा विविध प्रकारांतून 'स्व'चा शोध घेतला. निसर्गातील रंगलाघवी विभ्रमांना अतीव उत्कटतेने शब्दांमध्ये उतरवणारे त्यांचे 'ऋतुचित्र' हे पुस्तक म्हणजे जणू मुक्तछंद कविताच. असे असले तरी कविता हेच त्यांच्या अभिव्यक्तीचे आशयद्रव्य होते, हे त्यांच्या कविता, रुबाया आणि हायकू वाचताना जाणवते. जगण्यासाठीची सळसळती ऊर्जा देणारी दुर्मीळ सर्जनशीलता त्यांच्यात होती, हे त्यांचे काव्य वाचताना जाणवत राहते. त्यांच्या स्वभावातली ऋजुता त्यांच्या निर्मळ-मवाळ अभिव्यक्तीत उतरून येत असे. अकृत्रिम, प्रासादिक व अनलंकृत तरी वास्तवाला थेट भिडणारी, शब्दांपल्याडचे सूचित करणारी 'विराग' ह्या संग्रहातली त्यांची कविता पाहा-

*इतकी आनंदात आहे मी*
*आणि अत्यंत दुःखातही*
*खूप बोलायचंय मला*
*वाटतंय....*
*काहीच बोलू नये...*

*वारे वहायचे थांबलेय त*
*माझ्या अवताली भवताली*
*म्हणून गच्च धरलीय फांदी*
*कालच्या वादळात जवळ*
*झुकलेली*

*ह्यात अर्थ नाही काही*
*कळतंय मला हेही*
*पण ह्यावाचून अर्थ नाही*
*हे खरंय की नाही...?*

त्यांच्या व्यक्तिमत्त्वातला निगर्वी साधेपणा त्यांच्या कवितेत पाझरत राहतो. वरवर साधी वाटणारी त्यांची अल्पाक्षरी कविता खूप मूलभूत, सखोल अर्थ सांगणाऱ्या एखाद्या सुविचारासारखी किंवा सुभाषितासारखी भासते. जन्म, जगणं, जगत राहणं आणि मृत्यू ह्याकडे त्या स्वच्छपणे पाहू शकतात.









अनुक्रमणिका

जशी- 'काळोख पडेल तेव्हा' ही कविता-

*काळोख पडेल तेव्हा*
*सावलीसारखा येशील का?*
*काळोखातून दूर दूर*
*सावलीसारखा नेशील का?*
*घेऊन जा त्या काळोखात*
*जिथून जन्म आले*
*जिथे एकमेकांना आपण*
*भेटायचे वचन दिले...*

'झेंडूची फुले'मधून कवी केशवकुमार अर्थात प्रल्हाद केशव अत्रे यांनी मराठीत विडंबनकाव्याची संस्मरणीय भर घातली, तशी शिरीष पै यांनी मराठी सारस्वताला 'हायकू'ची भेट दिली. वडिलांनी समाजातल्या विसंगतीवर बोट दाखवत त्यावर प्रखर शाब्दिक प्रहार केले, तर लेक समईतल्या वातीप्रमाणे शांतपणे तेवत राहिली. आपल्या पप्पांच्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचा त्यांच्यावर प्रभाव होता. अत्र्यांच्या अष्टपैलू व झंझावाती कार्यकर्तृत्वाच्या त्या साक्षीदार होत्या. संयुक्त महाराष्ट्र चळवळीचा लढा त्यांनी जाणत्या वयात याचि डोळा पाहिला होता. अत्र्यांच्या अग्रलेखांनी खडबडून जागी होणारी मराठी माणसे त्यांनी पाहिली होती. 'मोरूची मावशी', 'तो मी नव्हेच', 'साष्टांग नमस्कार' इत्यादी अत्र्यांनी लिहिलेली व निर्माण केलेली नाटके, तसेच 'ब्रह्मचारी', 'महात्मा', 'श्यामची आई' इत्यादी चित्रपट यांनी गाजलेला काळ त्यांनी पाहिला. 'श्यामची आई' ह्या उत्कृष्ट चित्रपटाची निर्मिती करून त्यांनी साने गुरुजींना आदरांजलीच वाहिली. निसर्गकन्या बहिणाबाईंच्या कविता सर्वप्रसिद्ध प्रसिद्ध करून अहिराणीचा गोडवा उर्वरित महाराष्ट्राला त्यांनी दिला. ज्याला हात लावतील त्यात उत्कृष्ट व भरीव निर्मिती करणाऱ्या वडिलांचे प्रदीर्घ आत्मचरित्र 'कऱ्हेचे पाणी', तसेच 'मी कसा झालो' इत्यादी जाडजूड ग्रंथांची त्यांनी पारायणे केली. अत्र्यांचे अग्रलेख हाही त्यांच्या अभ्यासाचा विषय होता. वडिलांविषयीच्या आत्यंतिक प्रेमादरातून त्यांनीही आपल्या पप्पांवर अनेक पुस्तके लिहिली. ह्या पुस्तकांतून घरगुती वातावरणातले पप्पा ते आचार्य अत्रे हा पट उलगडतो. तत्कालीन सामाजिक व राजकीय परिस्थितीचे त्यांच्या परिप्रेक्ष्यातून झालेले दस्तऐवजीकरण म्हणूनही ह्या पुस्तकांकडे पाहता येते.

असे असले तरी कविता हीच आपल्या अंतरीची खूण आहे, हे त्यांना उमगले होते. शिरीष पै आणि हायकू हे एक समीकरणच आहे. त्यांना अवघा महाराष्ट्र मराठीतील 'आद्य हायकूकार' म्हणतो, हे अगदी सार्थ आहे. ह्या हायकूंशी त्यांचा परिचय झाला अगदी योगायोगाने. १९६३ साली सुप्रसिद्ध साहित्यिक व नाटककार विजय तेंडुलकर यांनी शिरीषताईंच्या हाती मूळ जपानी हायकूंचा इंग्लिश अनुवाद ठेवला. त्यांनी तो आवडीने वाचला. हळुहळू त्यांना हायकू हाक मारू लागले, त्यांना हायकूंचा ध्यास लागला. पण दिसतो तसा हायकू सोपा नाही. हायकू म्हणजे नुसत्या ३ ओळी नव्हे, तो तर साक्षात्कारी क्षण! तो क्षण पकडणे इतके सोपे नव्हते. त्यामुळे तो त्यांच्या मनात खोल रुतून बसला. पण लगेच कागदावर उमटला नाही.

शिरीषताई आचार्य अत्रे यांचे दैनिक 'मराठा' हे वृत्तपत्र चालवत होत्या. निर्भीड पत्रकारितेचा वारसा पुढे चालवत त्यांनी दैनिकाच्या संपादकपदाची धुरा पेलली होती. पण हे काम काही सोपे नव्हते. प्रत्येक कार्याची जशी सुरुवात असते, तसा अंतही असतो. पण तो अंत इतक्या लवकर येईल आणि जगणेच थबकेल असे त्यांना वाटले नव्हते. 'मराठा'च्या संपाविषयी शिरीषताईंनी लिहिलेय- १९७५ साली माझ्या आयुष्यात अशा काही घडामोडी घडल्या की त्यामुळे सारे आयुष्यच बदलले. साऱ्या आयुष्यालाच एक वेगळी कलाटणी मिळाली. तोपर्यंत मी दैनिक 'मराठा'चे संपादन करत होते. त्या वर्षी अचानक 'मराठा'त दीर्घ मुदतीचा संप झाला आणि आयुष्यात मला कधी नव्हे ते बेकार होऊन घरात बसावे लागले. सगळे भवितव्य त्या काळात पणाला लागले. अचानक जीवन थबकले....

अशा वेळी वस्तुस्थितीचा स्वीकार त्यांनी समंजसपणे केला. वडिलांची लढाऊ वृत्ती अनुवंशाने जशी त्यांच्यात आलेली होती, तशीच रिकामे न बसता सतत कार्यमग्न राहण्याची वृत्तीही आलेली होती. बारा वर्षांपूर्वी विजय तेंडुलकरांनी हाती ठेवलेले अनुवादित इंग्रजी हायकूंनी पोकळी भरून काढली. सृष्टीशी रत होत गोचर झालेले अनुभव दार ठोठावू लागले. निसर्गातील साक्षात्कारी क्षण लेखणीतून उतरू लागले-

*केव्हापासून करतोय कावकाव*
*खिडकीवरला एकाकी कावळा*
*इतका भरून येतोय त्याचाही गळा..*

हायकूने झपाटलेल्या शिरीषताईंनी त्यानंतर हजारो हायकू लिहिले. मराठी वाङ्मयकोशाच्या समीक्षाखंडात हायकू ह्या काव्यप्रकाराची नोंद झाली. त्यांचे चिकित्सक लेख 'सत्यकथा', 'राजस' ह्या मासिकांनी तसेच 'लोकप्रभा' साप्ताहिकाने प्रसिद्ध केले. श्री. रमेश पानसे व अंजली कीर्तनेंनी 'ऋचा' हा हायकू अंक संपादित केला. कै. सुहासिनी मूळगावकर यांनी दूरदर्शनवर हायकूंवर खास कार्यक्रम घेतला. सुप्रसिद्ध चित्रकार श्याम जोशी यांनी त्यांच्या संग्रहांना चित्रे काढलीच, शिवाय त्या रंगचित्रांची अनेक प्रदर्शने भरवली.

शिरीषताईंनी 'ध्रुवा', 'हायकू', 'हायकूंचे दिवस', 'माझे हायकू', 'फक्त हायकू', 'हेही हायकू', 'नवे हायकू', 'थोडे हायकू' अशा त्यांच्या हायकूसंग्रहांनी मराठी रसिकांना



अनुक्रमणिका

**शिरीष पै आणि हायकू हे एक समीकरणच आहे. त्यांना अवघा महाराष्ट्र मराठीतील 'आद्य हायकूकार' म्हणतो, हे अगदी सार्थ आहे. ह्या हायकूंशी त्यांचा परिचय झाला अगदी योगायोगाने. १९६३ साली सुप्रसिद्ध साहित्यिक व नाटककार विजय तेंडुलकर यांनी शिरीषताईंच्या हाती मूळ जपानी हायकूंचा इंग्लिश अनुवाद ठेवला. त्यांनी तो आवडीने वाचला. हळुहळू त्यांना हायकू हाक मारू लागले, त्यांना हायकूंचा ध्यास लागला. पण दिसतो तसा हायकू सोपा नाही. हायकू म्हणजे नुसत्या ३ ओळी नव्हे, तो तर साक्षात्कारी क्षण! तो क्षण पकडणे इतके सोपे नव्हते. त्यामुळे तो त्यांच्या मनात खोल रुतून बसला. पण लगेच कागदावर उमटला नाही.**



भरभरून आनंद दिला आहे. त्यातील पहिल्या तीन संग्रहात काही अनुवादित तर काही त्यांचे स्वतंत्र हायकू आहेत. याशिवाय 'चंद्र मावळताना' ह्या त्यांच्या कवितासंग्रहातही काही स्वतंत्र हायकूंचा समावेश आहे. मूळ जपानी हायकूंच्या इंग्लिश अनुवादावरून त्यांनी हायकूंचा सखोल अभ्यास केला. जपानमध्ये अतिशय लोकप्रिय असणाऱ्या ह्या काव्यप्रकाराला सुमारे ५०० वर्षांची परंपरा आहे. पंधराव्या शतकात जपानमध्ये हायकू फुलू लागला, पण त्याला हल्लीसारखा सुघड आकृतिबंध आणि बोली भाषेचे स्वरूप देण्यास कारणीभूत ठरला तो सतराव्या शतकातील 'बाशो' हा जपानी कवी. बाशो-बुसन-इस्सा ह्या तीन जपानी कवींना गुरू मानून एकलव्याप्रमाणे दूरस्थपणे शिरीषताईंनी स्वयंअध्ययन केले. त्यासाठी हायकूंमध्ये प्राणभूत असलेले झेन तत्त्वज्ञान शिरीषताईंनी समजून घेतले. बौद्ध धर्मातील झेनपंथी 'आत्ता आणि इथे' ह्या दोन शब्दांकडे संपूर्ण आयुष्याचेच निदर्शक म्हणून पाहतात. 'बोली भाषा अधिक अर्थपूर्ण करणे हे हायकूचे काम आहे,' असे जे बाशोने सांगितले, त्यांचाच शिरीषताईंनी पाठपुरावा केला. पाल्हाळ नाही, क्लिष्टता नाही, दुर्बोध प्रतिमांची गर्दी नाही असा त्यांचा हायकू अचूक, नेमके नि मोजके शब्द योजू लागला. त्या म्हणतात, हायकू ही बौद्धिक करामत नाही, किंवा तो अभिनवशैलीचा शोधही नाही. तुम्ही जसे बोलता तसे लिहितानाही तुम्ही सत्यापाशी नेमके जाऊ शकता हे हायकूने दाखवून दिलेले आहे. त्या लिहितात-

*इतक्या वेगाने गाडी पुढं गेली*
*रस्त्यावर उमललेली रानफुलं*
*डोळे भरून पाहताही नाही आली...*

किंवा-

*उडत जाताना बगळ्यानं*
*किंचित स्पर्श केला पाण्याला*
*उठलेला तरंग वाढतच गेला...*

*आणि-*

*पोपटी पालवी पाहताना*
*भरून आले डोळे*

*....तिचे थोडे दिवस उरले...*

हायकूंचा अभ्यास आणि निदिध्यास घेताना त्या हायकूमय झाल्या. 'मनुष्य आणि निसर्ग' यांची संपूर्ण एकतानता हाही झेन तत्त्वज्ञानाचा गाभा होय. जीवनातील सगळ्याचे मूळ एकच आहे, ह्याचा जेव्हा साक्षात्कार होतो, तेव्हाच हायकूकार तो क्षण हायकूतून शब्दबद्ध करतो. हायकू हा केवळ एक साहित्यप्रकार नसून तो एक श्रेष्ठ प्रकारचा आध्यात्मिक अनुभव असतो. हायकू लिहिणाराच नव्हे, तर ऐकणाराही एका विशिष्ट समाधी अवस्थेला पोहोचतो, अशी त्यांची भावना असते. अल्पाक्षररमणीयत्व हे काव्याचे एक लक्षण आहे. हायकू ह्या ३ ओळींच्या मूळ जपानी काव्यप्रकाराला शिरीषताईंनी प्रथम मराठीत आणले. 'दिसामाजी काहीतरी ते लिहावे...' ह्या समर्थोक्तीनुसार रोजच्या रोज, सातत्याने...अगदी मृत्यू येईपर्यंत हायकू लिहावेत, असे बाशोने आपल्या शिष्यांना सांगितले, ते शिरीषताईंनी नेमाने केले.

उमर खय्यामच्या रुबायांनीही त्या प्रभावित झाल्या. त्याचाही त्यांनी ध्यास घेतला. ह्या ध्यासपंथी, मनस्वी कवयित्रीच्या रुबायांचा 'अज्ञात रेषा' हा संग्रहही वाचकाला विचारप्रवण करणारा आहे. २ सप्टेंबर, २०१७ रोजी वयाच्या ८८व्या वर्षी शिरीषताईंना देवाज्ञा झाली. त्या देहाने जरी नसल्या तरी त्या त्यांच्या कवितेतून आपल्याशी बोलत राहतील. जसे-

*ह्या जगात असुनी जगात जणु मी नसते*
*कुणि बोलत असता कुठे तरी मन फिरते*
*छायेसम माझ्या कधी मला मी दिसते*
*संपले जगुन तरि...तरिही जगते...जगते...*

•

**आश्लेषा महाजन**
'मंजिरी', २३० चित्ररेखा सोसायटी,
सहकारनगर-१, पुणे ४११००९
चलभाष : ९८६०३८७१२३
ashlesha27mahajangmail.com



अनुक्रमणिका



लेख

डॉ. दीपक बोरगावे

# १९९०नंतरचे मराठीतील डावे वैचारिक लेखन : एक चिकित्सा



**आपल्या देशातील समाजात जात-पितृसत्ताक हे वैशिष्ट्य कायम राहिले आहे. त्यामुळे पुरोगामी व प्रागतिक विचारव्यवहाराचा प्रवास हा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत घडत राहिला आहे. पुरोगामी किंवा डावा विचार हा आपल्या देशात रुजायला म्हणूनच खूप अडचणी येत गेल्या. मार्क्सवादाबद्दलचे आकलन आणि त्याचा प्रत्यक्ष व्यवहारात किंवा भारतीय वास्तवात ते कसे अप्लाय करावे, लागू करावे, याबाबतचे चिंतन अनेक पक्षगटांचे हे वेगवेगळे दिसते.**



१९९०नंतरच्या मराठीत झालेल्या डाव्या वैचारिक लेखनाचा पट हा विस्तृत आहे. यामध्ये एकसाची (monolethic) प्रवाहापासून बहुप्रवाही विचार वाहताना दिसतात. मार्क्सवादाबरोबर फुले-आंबेडकरवाद हा भारतीय वास्तवाचे आकलन होण्यास महत्त्वाचा मानला गेला. हे साधारणपणे विसाव्या शतकात ऐंशीच्या दशकापासून सुरू झालेले वैचारिक घटित आहे. या संभाषितात जातीचा आणि जातीअंताचा प्रश्न हा कळीचा झाला.

विसाव्या शतकात रशियात लेनिनच्या नेतृत्वाखाली झालेल्या क्रांतीमुळे मार्क्सवादी लेनिनवादाचा डावा विचार भारतात आला. १९२५मध्ये भारतीय कम्युनिस्ट पक्ष स्थापन झाला. स्वातंत्र्योत्तर काळात नॅशनल इंडियन काँग्रेसबरोबर (राष्ट्रीय भारतीय कॉंग्रेस) काम करत असताना समाजवादी क्रांतीच्या निर्मितीबद्दल अनेक सैद्धांतिक मतभेद होऊन १९६४ मध्ये या पक्षाचे दोन पक्षामध्ये विभाजन झाले. श्रीपाद अमृत डांगे आणि इ. एम. एस. नंबुद्रीपाद यांच्या नेतृत्वाखाली सी. पी. आय.आणि सी. पी. एम. (मार्क्सवादी) असे अनुक्रमे दोन पक्ष निर्माण झाले. या दोन पक्षात मतभेद कायम राहिले. आजही एकविसाव्या शतकात ते कायम दिसतात.

सी. पी. एम. (मार्क्सवादी) पक्षाने पश्चिम बंगाल आणि केरळ या दोन राज्यांत संसदीय लोकशाहीच्या माध्यमातून सत्ता प्राप्त करत साम्यवादी विचारांच्या ताकदीवर अनेक महत्त्वाचे भौतिक बदल घडवून आणले. याशिवाय कमी अधिक प्रमाणात दोन्ही पक्षांचे खासदार आणि आमदार देशाच्या विविध पट्ट्यांतून निवडून आले. अनेक युती सरकारांना त्यांनी वाहेरून पाठिंबा दिला. कृषी-पाणी-उद्योग-कला-शिक्षण विशेषतः मुलींचे शिक्षण व स्त्री सबलीकरण ह्या क्षेत्रातील डाव्यांच्या तीव्र भूमिकांमुळे बरेच प्रागतिक बदलही झाले. गेल्या सत्तर वर्षांत कम्युनिस्टांचे कार्य हे चढउतारांमध्ये व्यापले गेले आहे. याचबरोबर शेतकरी कामगार पक्ष व लाल बावटा हेही कम्युनिस्टांचे मित्रपक्ष भारतीय संसदीय राजकारणात कार्यरत होते व आहेत. महाराष्ट्रात शे. का. प. चे १९७०च्या दशकात मोठे प्राबल्य होते. सैद्धांतिक मतभेद. स्थानिक राजकारण-समाजकारण - नेतृत्व - पोथीनिष्ठता - कार्यपद्धती - पक्षविचाराची शिस्त - सांस्कृतिक प्रश्नांशी भिडण्याची कार्यपद्धत या व अशा अनेक कारणांमुळे डाव्या चळवळीत हे चढउतार आले; का डावे लोकांपर्यंत पोहोचण्यात कमी पडले? डाव्यांच्या चर्चा व संवाद सातत्याने सुरू होते आणि आजही आहेत. पण याचा प्रत्यक्ष प्रभाव व्हायला हवा तेवढा दिसत नाही. याचे एक प्रमुख कारण असे दिसते की पुरोगामी चळवळीच्या क्षेत्रात व्यक्ती व संघटनांचा वर्तनव्यवहार परस्परांना वगळणारा, बहिष्कृत करणारा किंवा एकमेकांच्या विचारव्यवहारातील दोषांवरच अधिक भर देणारा राहिलेला आहे. त्यामुळे ह्या छोट्या मोठ्या संघटनांची बलस्थाने काय आहेत किंवा या दुर्लक्षित झालेल्या बलस्थानांना घेऊन पुढची वाटचाल करता आली असती का? पण





अनुक्रमणिका






ती नाकारल्यामुळे प्रागतिक चळवळीचे अर्थातच खूप मोठे नुकसान झाले आहे. यासाठी हेव्यादाव्याने भरलेला पुरोगामी अवकाश हा संवादाने भरून काढण्याची गरज आहे अशी चर्चाही आज पुरोगाम्यांमध्ये सुरू आहे. ही अर्थातच स्वागतार्ह गोष्ट मानायला हवी.

देशातील वर उल्लेखलेल्या ह्या चार डाव्या पक्षांशिवाय इतरही डाव्या विचारांच्या अनेक संघटना-पक्ष-गट असे वहुप्रवाह हे विशेषतः १९८०नंतर कार्यरत झालेले दिसतात. श्रमिक मुक्ती दल-सत्यशोधक मार्क्सवादी-युक्रांद-मुस्लीम सत्यशोधक युवा भारत-मार्क्सवादी लेनिनवादी पक्ष-स्टुडंट फेडरेशन ऑफ इंडिया-स्त्रीमुक्ती संघटना-लोकविज्ञान संघटना-जातीअंत परिषद-विचारवेध संमेलन-मुस्लीम मराठी साहित्य परिषद-मुस्लीम ओबीसी चळवळ-दलितांच्या संघटना-सत्यशोधक विद्यार्थी संघटना-हमाल पंचायत-कचरा-काच-पत्रा गोळा करणाऱ्या कामगारांची संघटना अशा अनेक शक्ती कार्यरत आहेत.

आपल्या देशातील समाजात जात-पितृसत्ताक हे वैशिष्ट्य कायम राहिले आहे. त्यामुळे पुरोगामी व प्रागतिक विचारव्यवहाराचा प्रवास हा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत घडत राहिला आहे. पुरोगामी किंवा डावा विचार हा आपल्या देशात रुजायला म्हणूनच खूप अडचणी येत गेल्या. मार्क्सवादावद्दलचे आकलन आणि त्याचा प्रत्यक्ष व्यवहारात किंवा भारतीय वास्तवात ते कसे अप्लाय करावे; लागू करावे यावावतचे चिंतन अनेक पक्षगटांचे हे वेगवेगळे दिसते. तशा पद्धतीने ह्या शक्तींचा प्रवास सुरू आहे. मार्क्सवादी आकलनाप्रमाणे राजकीय अर्थशास्त्राच्या (political economy) व उत्पादन पद्धतीच्या (modes of production) अनुषंगाने लेखन करत असताना. १९८०नंतरच्या भारतीय विचारवंतांनी वहुप्रवाही भारतीय वास्तवाच्या (मग तिथे तो धर्म-जात किवा लिंगभेद असो) पेचात्मक प्रश्नांना भिडण्यासाठी पारंपरिक मार्क्सवादी एकप्रवाही किंवा एकसाची (monolithic) आकलन सोडून वहुप्रवाही आकलनाच्या कक्षांना कवटाळलेले आहे. विशेषतः शरद पाटील यांनी स्त्रीदास्यजातीअंताचे सिद्धांतन केले; पाटील यांनी डाव्यांची ही पारंपरिक कोंडी फोडण्याचे कार्य केले आणि येथूनच वहुप्रवाही आकलनाच्या कक्षा रुंदावत गेल्या असे चित्र आहे. यानंतर रावसाहेब कसबे, भारत पाटणकर, विलास सोनवणे, राजीव कालेलकर यांनीही वहुप्रवाही आकलनांच्या दृष्टीने लेखन केले आहे. याचे एक कारण असे दिसते की हे सर्व प्रत्यक्ष चळवळीत काम करताना मार्क्सवादाची सतत चिकित्सा करत राहिले आणि त्यातून भारतीय वास्तवाशी भिडताना हा विचार त्यांना विकसित करता आला. एकप्रवाही भौतिकवादाच्या टीकेला खुद्द एंगेल्सलाही सामोरे जावे लागले होते आणि त्यांनी यावावत एका पत्रमालिकेत लिहिलेही आहे :

आर्थिक कृती केवळ शारिरिक कृती नाही तर ती मानवी कृती आहे आणि माणूस जेव्हा आर्थिक कृती करतो, तेव्हा तो हातावरोवर डोक्याचाही वापर करत असतो. माणसाच्या बौद्धिक विकासावरोवर अनेक घटक काम करत असतात. व्यक्तींच्या आर्थिक कृतीवरसुद्धा संपूर्ण सामाजिक परिस्थितीचा प्रभाव असतो. आणि या प्रभावात अनेक घटक आपापली भूमिका पार पाडत असतात, याचा अर्थ असा नव्हे की आर्थिक परिस्थितीच एकमेव कृतिशील घटक असते आणि इतर सर्व घटक निर्जीवपणे अस्तित्वात असतात. उलट हे सर्व घटक एकमेकांना प्रभावित करत असतात (रावसाहेब कसवे यांनी उद्धृत केल्याप्रमाणे; २०१३: ४८).

महाराष्ट्रात १९७०पर्यंतचे मार्क्सवादी लेखन हे असे एककल्ली होते हे कुमार शिराळकरांनीसुद्धा मान्य केले आहे. साधारणपणे १९७०च्या पूर्वीच्या काळात डाव्या चळवळींनी जातीच्या प्रश्नांवर आवश्यक तसे आंदोलन केले नाही (२०१५: १०३) ही गोष्ट शिराळकरांनी मान्य केली आहे.

महाराष्ट्रातील पुरोगामी किवा डाव्या विचारांचे प्रतिविंव १९९०नंतर मराठीतून विविध माध्यमातून व लेखनातून प्रसिद्ध झालेले आहेत. हा विचार प्रामुख्याने माफुआच्या (मार्क्सवाद-फुले-आंवेडकर) दिशेने गेलेला दिसतो. पुरोगामी आणि डावा विचार भारतासारख्या प्राचीन आणि पारंपरिक देशात रुजविण्यासाठी केवळ मार्क्सवाद हा पुरेसा नाही; येथील ऐतिहासिक, सामाजिक व सांस्कृतिक वास्तव समजून घेण्यासाठी व येथील वहुप्रवाही आणि अनेकतावादी समाजाच्या वेदनांचे आकलन होण्यासाठी फुले आणि आंवेडकरांच्या विचारांची जोडही द्यावी लागेल, हा आग्रह या सर्व लिखाणांतून प्रतिविंवित झालेला दिसतो. १९९०नंतरच्या डाव्या गटात माफुआ हे नवमार्क्सवादाचेच प्रतिविंव आहे, असे सामान्यपणे मानले गेले आहे.

पुरोगामी पक्षांची किंवा संघटनांची मुखपत्रे-मासिके-साप्ताहिके-वेळोवेळी काढलेली निवेदने-पुस्तिका व पुस्तके - सैद्धांतिक चर्चा आणि वाद या माध्यमातून हे लेखन साहित्य विखुरलेले आहे. विविध प्रकाशनांनीही यामध्ये महत्त्वाचे योगदान दिलेले आहे. उदाहरणार्थ, लोकवाङ्मय-साहित्य अकादमी-प्राज्ञपाठशाळा मंडळ - मागोवा - समाज प्रवोधन पत्रिका-सत्यशोधक मार्क्सवादी - तात्पर्य - पॉप्युलर - सुगावा-साकेत-राजहंस-प्रतिमा-मनोविकास-मावळाई-हरिती-क्रांतिसिह नाना पाटील अकादमी-मिळून साऱ्याजणी-क्रांतिज्योती सावित्रीवाई फुले स्त्री-अभ्यास केंद्र (सावित्रीवाई फुले पुणे विद्यापीठ-पुणे)-तारावाई शिंदे स्त्री अभ्यास केंद (डॉ. वावासाहेव आंवेडकर मराठवाडा विद्यापीठ-औरंगावाद) अंधश्रद्धा निर्मूलन वार्तापत्र-श्रमिकांचा आसूड - परिवर्तनाचा वाटसरू - मुक्त शब्द - साधना - लोकविज्ञान संघटना - शंकर व्रम्हे समाजविज्ञान ग्रंथालय- श्रमिक विचार - दिग्गन -

क्रांतिज्योती - शिक्षक संघटक - निर्मिती अशा अनेक संस्थांनी हे साहित्य प्रसिद्ध केले आहे. अशा माध्यमातून या संस्थांनी हे साहित्य लोकांपर्यंत पोहोचवण्याच्या कार्यात मोठे काम केलेले आहे. यामधील काही संस्था ह्या आज हयात नाहीत; तर काही टिकून आहेत; तर काही जोमाने कार्य करत आहेत असे आज चित्र आहे.

या अनेक प्रकाशन माध्यमातून पुरोगामी आणि डाव्या विचारांचे लेखन रावसाहेब कसबे, एजाज अहमद, रोमिला थापर, गेल ऑमवेट, भास्कर भोळे, सुलभा ब्रम्हे, आनंद तेलतुंबडे, भारत पाटणकर, कुमार शिराळकर, शरद पाटील, यशवंत सुमंत, शर्मिला रेगे, विद्युत भागवत, विलास सोनवणे, फकरूद्दीन बेन्नूर, दत्ता देसाई, सुहास पळशीकर, संजीव चांदोरकर, राजीव कालेलकर, रणजीत परदेशी, गोपाळ गुरू, मर्जबान जाल, उमेश बगाडे, दिलीप चव्हाण, दीपक कसाळे, राहुल कोसंबी, सचिन गरूड, सुभाष थोरात, उदय नारकर यांचे साहित्य प्रसिद्ध झालेले आहे. रोमिला थापर, एजाज अहमद, गेल ऑमवेट, आनंद तेलतुंबडे, गोपाळ गुरू आणि शर्मिला रेगे यांनी मुळातून इंग्रजीत लेखन केले आहे. यांचे साहित्य मराठीत भाषांतराच्या रूपात उपलब्ध आहे; त्याचा इथे विचार केला आहे. इथे शक्य तेवढ्या उपलब्ध झालेल्या साधनसामग्रीचा धांडोळा घेऊन १९९०नंतर मराठीतून प्रसिद्ध झालेल्या मार्क्सवादी लेखन साहित्याचे चित्र उभे करण्याचा एक अल्पसा प्रयत्न या लेखात आहे.

## २

कुमार शिराळकर हे डाव्या व परिवर्तनवादी चळवळीतील कार्यकर्ते आहेत. आदिवासी, दलित आणि कष्टकरी वर्गाच्या मुक्तिलढ्यात त्यांनी महाराष्ट्रात आणि देशातही वेळोवेळी शोषितांच्या बाजूने महत्त्वाच्या भूमिका घेतल्या आहेत व त्या अनुषंगाने जोखमीच्या जवाबदाऱ्याही पेलल्या आहेत. त्यांचे 'ऊठ वेड्या तोड बेड्या' (१९७४) हे पुस्तक आजही तरुणांना स्फूर्तिदायक ठरावे असे आहे. त्यांचे 'नवे जग नवी तगमग' हे पुस्तक (२०१५) त्यांच्या अनेक लेखांचा संग्रह आहे. साखर उद्योग, ऊस शेती व ऊस तोडणी कामगारांचे प्रश्न, वनाधिकार कायद्याची चर्चा, आदिवासींचे जीवन, आदिवासी संस्कृती, आदिवासी स्त्री, राष्ट्रीय रोजगार हमी कायदा, धर्मांधतेचे राजकारण, अर्थकारण, जातीअंताचा प्रश्न अशा प्रश्नांवर त्यांनी मार्क्सवादी वैचारिक लेखन केले आहे. धर्म-जात- आदिवासी- स्त्रीसंस्कृती-अर्थकारण व राजकारण आणि व्यक्तिगत अशा एकूण पाच विभागात वरील पुस्तकात मांडणी आहे.

जातीअंताचे प्रयत्न आपल्या देशात बसवेश्वरांपासून झालेले आहेत पण त्यासाठी बसवेश्वरांना आपला प्राण गमवावा लागला. तुकारामांचेही हेच झाले. आजही ह्या गोष्टी घडताना दिसतातच. उच्चभ्रू जाती आणि वर्चस्ववादी समाजातील आपले वर्चस्व टिकवण्याचे प्रयत्न करताना ऑनर किलींग सारख्या गोष्टी घडताहेत पण त्यावर फार काही उपाययोजना होत नाहीत हे वास्तव आज आपण अनुभवत आहोत. जातीअंत हा भारतीय समग्र सांस्कृतिक विकासाचा एक महामार्ग आहे असे माफुआ विचार मानतो. या संदर्भात अशा प्रागतिक चळवळीत आज कार्यरत असलेल्या विचारवंत कार्यकर्त्यांची मांडणी काय आहे हे समजावून घेणे महत्त्वाचे आहे. जात या विभागात शिराळकरांनी जातीअंताच्या संदर्भात चार उपाय सुचविले आहेत.१. प्रबोधन मोहीम; २.अत्याचाराला बळी पडलेल्यांचे पुनर्वसन; गुन्हेगारांना अद्दल घडेल यासाठी कायदेशीर आणि अन्य मार्गांनी दबाव; ३. सर्व जाती-धर्मांच्या लोकांना एकत्र आणून कार्यक्रमाचे आयोजन; उत्सव साजरे करणे; सुख-दुःख प्रसंगी सहकार्य देण्याचे प्रघात यासाठी मुद्दाम चालना देणे; ४.आंतरजातीय आंतरधर्मीय विवाहांना प्रोत्साहन (२०१५: १०७-८).

भांडवली उत्पादन संबंधांना नष्ट करण्याची चळवळ उभारल्याशिवाय जातिव्यवस्थेचा अंत अशक्य आहे, असे भारत पाटणकरांनी म्हटले आहे (२०१२: ६४४). शरद पाटलांनी उल्लेख केलेल्या भांडवलशाहीपूर्व समाजातील जातिव्यवस्थेची सहा लक्षणे उद्धृत करून (१.जात जन्मसिद्ध असणे, २.जातीचा व्यवसाय जन्मसिद्ध असणे, ३.रोटी व्यवहार जातीतच, ४.बेटी व्यवहार जातीत, ५.अलग व बहिष्कृत वस्त्या ६.जातीत नियमदंडन जातपंचायती मार्फत) पाटणकर लिहतात :

त्यातील बरीच लक्षणे औद्योगिक व भांडवलशाही समाजात पूर्ण मोडून पडली आहेत. या सहा बाह्य लक्षणांपैकी जात ही जन्मसिद्ध असते हे जातीचे लक्षण अस्तित्वात आहे तोपर्यंत जात ही जन्मसिद्धच राहणार आहे. पण ही बाह्य (लक्षणे) कितीही महत्त्वाची असली तरी जातिव्यवस्थेचा गाभा असणारा तिचा पायाभूत गुणधर्म (दोष धर्म ) हाच तिला जिवंत ठेवणारा पाया असू शकतो. ह्या बाह्य लक्षणांच्या मागे दडलेल्या जातिव्यवस्थेचा गाभा म्हणजे तिच्यातील उतरंड. या उतरंडीत ज्या जातीचे जे स्थान असेल, त्यानुसार त्या त्या जातीचे उत्पादन संबंधातले स्थान ठरते. हा उतरंडीचा नियम आहे. जात जन्मसिद्ध आहे. या जन्मसिद्ध स्थानानुसार उत्पादन संबंधातले स्थान ठरणार. ज्या जाती पूर्वी अस्पृश्य आणि अतिशूद्र समजल्या जात होत्या, त्या जातीमधील बहुसंख्य नव्या भांडवली उत्पादन संबंधामध्ये शेतमजूर, अकुशल कामगार, कंत्राटी कामगार, कचरा गोळा करणारे आणि चतुर्थ श्रेणी कर्मचारी या वर्गथरांमध्ये समाविष्ट आहे. ब्राह्मण आणि तत्सम जातीमधली बहुसंख्य शास्त्रज्ञ, मॅनेजर, प्रथम श्रेणी कर्मचारी, पांढरपेशा व्यावसायिक, चांगल्या प्रकारच्या अन्य पांढरपेशा नोकऱ्या, छोटेमोठे औद्योगिक भांडवलदार या वर्गथरांमध्ये आहेत. जातिव्यवस्थेच्या या गाभ्याला अजूनही धक्का लागलेला नाही म्हणून जातिव्यवस्था टिकून आहे. ती स्वतःला पुनःपुन्हा निर्माण करीत आहे. तिची

काही बाह्य लक्षणे कायम ठेवायला मदत करत आहे (२०१२: ६४२-४३).

रावसाहेब कसबे यांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या Annihilation of Caste (1936) या जातीअंताच्या ग्रंथावर चर्चा करताना जातिव्यवस्था आणि धर्मव्यवस्था यांच्या नात्यासंबंधी भाष्य केले आहे. इथे पाटणकर आणि कसबे यांच्या विश्लेषणात साम्य आढळते (२०१३: ४६). ते लिहितात :

भारतीय हिंदू जात पाळतात यात त्यांची काहीही चूक नाही. आंबेडकरांनी हे मान्य करून चुकीचा आहे तो त्यांचा धर्म, याकडे लक्ष वेधले आहे. हे जर खरे असेल तर जातीयता पाळणारे हे खरे शत्रू नाहीत. तर खरा शत्रू जातिसंस्थेची शिकवण देणारी धर्मशास्त्रे आहेत. म्हणून जातिसंस्थेच्या पालनातून मुक्त होण्यासाठी खरा मार्ग हा धर्मशास्त्राच्या मान्यतेलाच उद्ध्वस्त करणे हा आहे (२०१३: ४६).

उच्चवर्णीय पुरुषसत्ताक भांडवलशाही, उजव्या शक्ती आणि प्रतिगाम्यांकडून मार्क्सवादाबद्दल नेहमीच खोट्या गोष्टींचा प्रचार केला गेला आहे. उदाहरणार्थ, सोविएत युनियन आणि समाजवादी राष्ट्रे कोसळल्यानंतर मार्क्सवाद कालबाह्य झाला; मार्क्सवाद हे माणसाच्या स्वातंत्र्याला नख लावणारे तत्त्वज्ञान आहे; मार्क्सवाद हे माणसाचे सारे जीवन आर्थिक चष्म्यातून पाहतो; मार्क्सवाद केवळ रक्तरंजित क्रांतीचाच पुरस्कार करतो; मार्क्सवादाला पर्यावरणाच्या हानीची चिंता नाही; मार्क्सवाद मानवी मूल्ये तुच्छ मानतो; जाती, धर्म, भाषा आदींनी विखुरलेल्या भारतात हा कसा काय लागू होऊ शकतो? असे हे अनेक आरोप खूप जुने असले तरी ते परत परत केले जातात. या सर्व आरोपांचे खंडन आणि ह्या खोट्या प्रचारांचा समाचार स्वतः मार्क्स काय म्हणतो, ह्या आधारांवर उदय नारकर यांनी घेतला आहे (२०१४). हे पुस्तक या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

ज्येष्ठ मार्क्सवादी विचारवंत एजाज अहमद यांची दोन भाषांतरे उपलब्ध झाली आहेत. 'मार्क्सवादाचे आजच्या काळातील महत्त्व' ही अनुवादित पुस्तिका (१९९७) मार्क्सवाद हा सतत विकसित होत राहणारे तत्त्वज्ञान आहे हा विचार अधोरेखित करतो. मार्क्सवादाचा सिद्धांत हा अपवादात्मरीत्या एकमेव असा विचारप्रवाह आहे की ज्याने संपूर्ण साम्राज्यवादी चौकटीस आणि भांडवली व्यवस्थेच्या प्रत्येक वळणावर साम्राज्यवादाच्या बदलत्या स्वरूपास समजावून घेण्यासाठी आपणाला वैचारिक दिशा दिली आहे. आजच्या जगाकडे पूर्वग्रहदोषविरहित पाहायचे असेल तर मार्क्सवादाशिवाय दुसरा कोणताच विचार किंवा सिद्धांत नाही. तो सततपणे विकसित होणारा विचार आहे. गेल्या काही दशकांत ग्रामची अल्थूझर यांनीही मार्क्सवाद विकसित केला आहे. याची चर्चा ही डाव्या विचारविश्वात केली जाते. संस्कृती अभ्यासाचे नवे आयाम यातून विकसित झालेले आहेत. याला नवमार्क्सवाद या नावानेही संबोधले जाते. एजाज अहमद यांचा जमातवादाचे बदलते स्वरूप आणि उद्याची परिस्थिती (२०१५: ३३४-५५) हा दीर्घ भाषांतरीत लेख जमातवादाचे धोके कोणते आहेत, प्रतिगामी सनातनी व मूलभूतवादी शक्ती मग त्या हिंदुत्वाच्या असो की इस्लामिक, ह्या कशा समाजात दहशत पसरवतात, फासीवाद निर्माण करून सर्वसामान्यांचे जीवन भीतिग्रस्त करतात याचे मार्क्सवादी आकलन या लेखात आहे. या लेखात नवउदारमतवादी व्यवस्था व उजवी आणि भांडवलदारी शक्ती हे पिळवणुकीचे हत्यार कसे आहे आणि यातून देशाचा सामाजिक व सांस्कृतिक कसा पद्धतशीरपणे उद्ध्वस्त केला जात आहे याचे विश्लेषण केले आहे. लेखाचा समारोप करताना अहमद लिहितात-

नवउदारमतवादी व्यवस्था ही केवळ एक पिळवणुकीचे क्रूर आणि अजस्र शस्त्र आणि कमी रोजगार देऊन कामगार वर्गाची जगण्याची ऊर्मीच नष्ट करण्याची यंत्रणा नाही तर ती एक लोकांना काम न पुरवणे किंवा प्रचंड संख्येच्या लोकांना रोजगार नाकारणारी यंत्रणा आहे. म्हणजे ही केवळ पिळवणुकीची यंत्रणा नाही तर मुळातून सामाजिक दृष्ट्या लोकांना उद्ध्वस्त करणारी व्यवस्था आहे. समाजाच्या लुंपेनीकरणाची घटना ही खूप व्यापक स्वरूपाची आहे; ती आज केवळ कामगार वर्गातच मर्यादित नाही तर तिची पाळेमुळे ही मोठ्या प्रमाणात मध्यमवर्गात पोहोचली आहेत. जमातवादाच्या संदर्भात आज डाव्यांच्या समोर हे मोठे आव्हान आहे असे मला वाटते. इथे सामाजिक संस्कृती सडू लागली आहे आणि याचे प्रमुख कारण टोकाचा भांडवलशाहीवाद आहे. परिणामी करोडो भारतीय गरीब आणि कामगार वर्गातील जनतेच्या जाणिवा ह्या विषग्रस्त झालेल्या आहेत.

जमातवादाविरुद्धचे सर्व लढे हे आवश्यकच आहेत पण यासंदर्भात हे लढे किती काळ चालतील आणि ह्या लढ्यांची तीव्रता कितपत टिकेल, वगैरेबद्दल भ्रमांचे ताळे करण्यात काही अर्थ नाही. जर जमातवाद हा केवळ खोट्या वैचारिक शक्तीचा इमला नसेल आणि जर जमातवादाची पाळेमुळे ही रचनात्मकदृष्ट्या भांडवलशाहीत रुतलेली असली तर याचा अर्थ असा होतो की जमातवादाविरुद्धचा लढा हा केवळ धर्मनिरपेक्षतेचा वैचारिक लढा नसून तो भांडवलशाही विरुद्धच्या लढ्याचा एक महत्त्वाचा भाग होतो. थोडक्यात असे म्हणता येईल की जमातवादाविरुद्धचा टिकणारा लढा हा केवळ कम्युनिझमच देऊ शकतो. भारतामध्ये धर्मनिरपेक्षता हे मध्यमवर्गीय मूल्य राहिलेले नाही. युरोपमध्ये प्रबोधन काळात (Enlightenment Period) धर्मनिरपेक्षता हे मध्यमवर्गीय मूल्य म्हणून त्याला प्रतिष्ठा होती. हीच परिस्थिती अनेक देशात वसाहतवादाविरुद्धच्या लढ्यांतून दिसते. आज भारतात व्यापक प्रमाणावर जमातवादी जाणिवांचा फैलाव होत असताना धर्मनिरपेक्षतावाद हेच विशेषतः एक साम्यवादी मूल्य म्हणून दिसते आहे (२०१५: ३५५).



अनुक्रमणिका

रोमिला थापर यांनी डाव्या विचारप्रणालीच्या दृष्टीने इतिहासाची मांडणी केली आहे. विशेषतः प्राचीन भारताची त्यांनी केलेली मांडणी ही जगात सर्वमान्य झाली आहे. भूतकाळ दूरचा असो / वा निकटचा असो. वर्तमानाशी तो कसा दृढपणे जोडला गेलेला असतो याचे विश्लेषण थापर यांनी आपल्या लेखनातून केले आहे. वर्तमानकाळातील परिस्थिती कशी आणि कोणत्या पातळीपर्यंत भूतकाळातल्या विशिष्ट काळाच्या अभ्यास करण्याच्या निवडीवर प्रभाव टाकते अथवा निश्चित करते, याचा वेध ते नेहमी घेताना दिसतात. त्यांची विधाने इतिहासाच्या अभ्यासाबद्दलची जागरूकता आणि संवेदनशीलता निर्माण करणारी असतात. काही उत्साही व हौशी इतिहासकारांमध्ये प्राचीन भारतातील अनेक गोष्टींचे उदात्तीकरण करण्याची प्रथा पडलेली आहे. त्यामुळे इतिहासाचे विकृतीकरण तर होतेच शिवाय वर्तमानकालीन समाजात आपल्या इतिहासाबद्दलचे चुकीचे समज दृढ होत जातात. भूतकाळात घडलेल्या घटना एकाच पद्धतीने किंवा एकसाची मार्गाने घडत नसतात. ऋग्वेद हे काही फक्त इंडो-आर्यन नाहीत. ते केवळ एकाच भाषेत रचले गेले नाहीत; त्यात विविध भाषांचा आणि संस्कृतींचा समावेश आहे. या संदर्भात एका मुलाखतीमध्ये थापर यांनी केलेले विश्लेषण महत्त्वाचे आहे :

सर्वसामान्य लोकांच्या पातळीवर ज्या दाव्यांचा प्रचार केला जातो, त्याच्या तपशिलात मी जात नाही. मी तज्ज्ञांच्यात जे मतभेद आहेत त्याकडे वळतो. प्राचीन भारताचा अभ्यास करताना राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर तज्ज्ञांचे ठामपणे सांगणे आहे. आर्यांची भाषा इराणमार्गे मध्य आशियातून भारतात आली असण्याची शक्यता आहे. पण हल्ली भारतात विविध लोकांकडून ज्या मताचा प्रचार केला जातो आहे ते मत असे आहे की, आर्य भाषा बोलणारे सर्व मूळचे इथलेच आहेत. काहींचा दावा आहे की, हरप्पा संस्कृतीचे निर्मातिही आर्यच होते. म्हणजे ते असे सुचवत आहेत. मूळच्या भारतीय संस्कृतीत आर्यांव्यतिरिक्त इतर घटकच नव्हते. या दाव्याचा विविध कारणांसाठी मी स्वीकार करू शकत नाही.

आर्यवादाचे पवित्रीकरण करायचे एकाच, स्रोताचा वापर करीत त्या प्रश्नांमधील गुंतागुंत बाजूला सारत प्रत्येक गोष्टीचे सरलीकरण (simplification) करायचे हे स्पष्ट आहे. दोन्ही दृष्टिकोनात तीव्र मतभेद आहेत आणि आपल्या समर्थनात दोन्ही बाजूंनी दिलेले पुरावे असमान आहेत. जे सुचवले गेले आहे ते आमच्यापैकी काहीजणांना भाषिक दृष्ट्या आणि पुरातत्त्वशास्त्रीय दृष्ट्या योग्य वाटत नाही. ऋग्वेदाचा कालखंड हराप्पा संस्कृतीनंतरचा आहे. त्यामुळे साहजिकच ऋग्वेदात आधीच्या संस्कृतीचे प्रतिबिंब पडत नाही, असा आमचा दावा आहे. हरप्पा संस्कृतीच्या वस्त्या ओमानमध्ये होत्या आणि त्यांचे मेसापोटेमियाशी संबंध होते. या कशाचेच प्रतिबिंब ऋग्वेदात पडत नाही. तिसऱ्या सहस्रकाच्या शेवटी आणि दुसऱ्या सहस्रकाच्या सुरुवातीला हरप्पा संस्कृती शेजारी समकालीन विविध बिगरहराप्पा संस्कृतीबरोबर नांदत होती. ऋग्वेदाच्या रचनेचा काळ सर्वसामान्यपणे ख्रिस्तपूर्व १५००-१००० असा मानला जातो. या काळातील विविध संस्कृतीचे (पेन्टेड ग्रवेअर संस्कृती-ब्लॅक अँण्ड रेड वेअर संस्कृती-मेगलिथिक आणि इतरही) अस्तित्व ऋग्वेदात जाणवते. त्या वेगवेगळ्या संस्कृती होत्या. ती काही एकच संस्कृती नव्हती. जसजसे आर्यभाषिक पसरत गेले. तसतसा त्यांचा संबंध हा वेगवेगळ्या संस्कृतींशी आला व ते त्यामध्ये वसून गेले.

हरप्पा संस्कृतीतील गावात प्रामुख्याने लिखाणाची माहिती असलेली आधुनिक शहरी संस्कृती नांदत होती; तर ऋग्वेदी समाज हा ग्रामीण कृषी संस्कृतीचा; शहरी संस्कृतीशी अनभिज्ञ आणि निरक्षर होता. हा महत्त्वाचा फरक ऋग्वेदाचे निर्माते आणि हरप्पा संस्कृतीच्या पुरस्कर्त्यात होता, हे आपण विसरता कामा नये (२०१५: ३१८-१९).

१९९०नंतरच्या कालखंडात मार्क्सवादी समीक्षा ही संस्कृती अभ्यासाच्या अंगानेही झाली आहे. या नवमार्क्सवादी परिप्रेक्ष्याचा आवाका फार मोठा आहे (वास्तविक यावर स्वतंत्रच लिहायला हवे); म्हणून त्याबद्दल इथे काही निरीक्षणे करणे अत्यावश्यक आहे. एकोणिसाव्या शतकात ब्रिटिशांच्या आगमनामुळे युरोपीय संस्कृती धारणांशी संपर्क होऊन समाजसुधारणेची मूल्ये भारतात रुजली. वासाहतिक मूल्यदृष्टी व गरजांमधून भारताच्या धर्माभ्यासाला सुरुवात झाली. भांडवली वसाहतवादामुळे पारंपरिक जातीसमाजाला वर्गीय समाजाचा छेद बसला म्हणून प्रबोधन-ख्रिश्चन धर्मविचाराचा प्रवेश-राज्यसंस्थेचे सेक्युलर स्वरूप वगैरे गोष्टींमुळे वर्गव्यवस्था जन्मण्याची चिन्हे दिसू लागली. पण भारतातला सामाजिक संघर्ष भांडवली व्यवस्थेच्या उदयानंतरही ब्राह्मणी विरुद्ध अब्राह्मणी या छावण्यामध्येच अविरतपणे कार्यरत राहिला (बगाडे; २००६ : ३४). या संदर्भातील संकीर्ण अशा स्वरूपाची चिकित्सा संस्कृती अभ्यासाच्या परिप्रेक्ष्यातून सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या निमित्ताने दीपक कसाळे यांनी केली आहे (२०१५ : ४८-७५). ती संपूर्णच मुळातून वाचण्यासारखी आहे. एस. गोपाल- राधाकृष्णन यांचे चिरंजीव- ज्यांनी आपल्या वडिलांचे चरित्र लिहिले आहे (१९८९). यामध्ये ते म्हणतात- नेहरूंनी राधाकृष्णन यांच्यावर वेगवेगळ्या जबाबदाऱ्या टाकून त्यांना राजकीय क्षेत्रात आणले. नेहरूंची ही मेहेरनजर राधाकृष्णन यांच्यावर उगीच नव्हती. पाश्चात्यांना वाटतो तसा भारत केवळ मागास (जातीस्त्रीदास्याच्या संदर्भात) नसून त्याचे आध्यात्मिक मोठेपण म्हणजेच वर्गजातिसंस्थांच्या उत्पत्तीच्या तथाकथित उदात्ततेची (ब्राह्मणी प्रभुत्वाची) बाजू जगापुढे यावी अशी नेहरूंना अपेक्षा होती. पुढे नेहरूंनी राधाकृष्णन यांची रशियातील राजदूत म्हणून



अनुक्रमणिका



हरप्पा संस्कृतीतील गावात प्रामुख्याने लिखाणाची माहिती असलेली आधुनिक शहरी संस्कृती नांदत होती; तर ऋग्वेदी समाज हा ग्रामीण कृषी संस्कृतीचा; शहरी संस्कृतीशी अनभिज्ञ आणि निरक्षर होता. हा महत्त्वाचा फरक ऋग्वेदाचे निर्माते आणि हरप्पा संस्कृतीच्या पुरस्कर्त्यांत होता, हे आपण विसरता कामा नये

नियुक्ती केली (as cited by Kasale; 1989 : 215).

सांस्कृतिक राजकारण हे नेहमीच वर्चस्ववादी विचारप्रणालीच्या ओझ्याखाली लपलेले असते; त्याचा अजेंडा हा अदृश्य असतो. राधाकृष्णन यांच्या वर्णजातीसमर्थनाचा संदर्भ देऊन कसाळे म्हणतात, जातिव्यवस्थेला आदर्श प्रारूप मानून राधाकृष्णन ब्राह्मणवादाच्या प्रभुत्वातील मागास जातीचे जातिव्यवस्थाक व सांस्कृतिक वास्तव दुर्लक्षून त्यांच्या शोषणाला नैसर्गीकरणाच्या चौकटीत पाहतात (२०१५ : ५०). ब्राह्मणी प्रभुत्व रचनेचा हा पेच केवळ ब्राह्मणांनाच वेढतो असे नाही तर तो शोषित जातींनाही प्रभावीत करत राहतो. त्यामागील व्यवस्थापक पैलू नीट समजून घेणे गरजेचे आहे. नवमार्क्सवादी समीक्षेच्या ह्या नव्या दृष्टीमुळे सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक वास्तवाचे पेच समजून घेण्यासाठी आपणास एक महत्त्वाचे हत्यार उपलब्ध झाले आहे.

भालचंद्र नेमाडे यांची 'हिंदू : जगण्याची समृद्ध अडगळ' (२०१०) ही कादंबरी गाजतवाजत आली. तिच्यावर समाजातील सर्व वैचारिक प्रवाहांकडून समीक्षणात्मक खूप उलटेसुलटे लिहिले गेले. या कादंबरीच्या समीक्षणार्थ वत्तीस लेखांचे एक संपादन प्रसिद्ध आहे (२०१५). या पुस्तकाच्या संपादकांनी जे प्रकाशकीय लिहिले आहे ते पाहण्यासारखे आहे. यातून एखादी संहिता ही कशी सांस्कृतिक राजकारणाशी जोडता येते, हे पाहता येते किंवा तिची समीक्षा ही सांस्कृतिक राजकारणाची कशी भक्ष्य होते हेही पाहता येते. कुणाचेतरी म्हणणे हे कुणाच्यातरी आवाजाचे दमन करण्यासाठी वापरले जाऊ शकते. किंवा तुम्ही बोलत राहा. कुणी रोखणार नाही. पण मग 'आम्ही' आमचे कान मात्र बंद करणार! खरे तर हे कान बंद करण्याचे 'महान' कार्य इतके सहज होते की त्यासाठी कानावर हात ठेवण्याची अथवा कानात बोळे कोंबण्याची गरजही नसते. सांप्रत भारतभूमीवर 'इतरांचा' आवाजच न ऐकण्याची बधीरता इतकी दाटून येते की 'तुम्ही' बोलताय म्हटल्यावर 'आम्हाला' ऐकूच येत नसते. जातपितृसत्तेचा हा बायडिफॉल्ट! जातीजमातीच्या स्वायत्त परंतु ब्राह्मणी पिळात गुंफलेल्या जातपितृसत्ताक रचनांच्या उतरंडीत, कोणता जातसमूह कोणत्या टप्प्यावर किती प्रामाणिक भूमिका घेणार याची कुंपणे आपसुक पडतात (प्रकाशकीय; २०१५: ८).

खैरलांजी ते खर्डा या भीषण परिस्थितीत अभ्यासक नेते, कार्यकर्ते आणि जनतेतील अंतर वाढले; अविश्वासाच्या वातावरणानी गढूळताही वाढत गेली. या सर्व परिस्थितीचे व्यवस्थित आकलन आणि सिद्धांतन गोपाळ गुरू यांनी केले. डाव्या चळवळीतले एक प्रमुख विचारवंत म्हणून त्यांचे लेखन महत्त्वाचे मानले गेले आहे. सामाजिक शास्त्रे आणि सामाजिक चिकित्सा यांचे सामाजिक व्यवहारांशी नेमके नाते काय असावे, हा एक जटिल पेच आहे. सामाजिक चिकित्सा सामाजिक आकलनाचे नवे दालन खुले करत असते. तसेच अशा चर्चेतून प्रचलित वर्चस्वाच्या व्यवस्थांची मर्मस्थाने उघडकीस येत असतात आणि त्यातून वर्चस्वाच्या प्रतिकारांना योग्य दिशाही मिळते. गुरू यांचे राजकीय लेखन हे डाव्या चळवळीतील सामाजिक कार्यकर्त्यांना आणि विद्याक्षेत्रीय अभ्यासकांना मार्गदर्शन म्हणून ठरले आहे (२०१५).

रावसाहेब कसबे यांचे तीन महत्त्वाचे ग्रंथ १९९०नंतरच्या काळात प्रसिद्ध झाले आहेत (१९९६; २००८; २०१६); हे तीनही ग्रंथ तत्त्वज्ञानात्मक आहेत. 'मानव आणि धर्मचिंतन' (१९९६) हा ग्रंथ मानवप्राण्याची माणूस म्हणून जीवशास्त्रीयदृष्ट्या उत्पत्ती कशी झाली आणि तो प्राणिसृष्टीचा त्याग करून मानवी सृष्टीत उन्नत का आणि कसा झाला याची चिकित्सा करत शेवटी कसबे मानवी विकासकाळातील अनेक टप्प्यांचे विश्लेषण करत आणि मानवी संस्था कशा जन्मल्या व विकसित झाल्या, याचे सांगोपांग विवरण केले आहे. मानवाच्या बदलत्या रूपांचा आणि त्याने केलेल्या निर्मितीचा शोध या ग्रंथात केंद्रस्थानी आहे. इथे मार्क्सवादी विश्लेषण पद्धती वापरली आहे: यात विविध ज्ञानशाखांमधील दृष्टी उपयोगात आणली आहे. 'धर्मग्रंथ आणि मानवी जीवनप्रवाह' (२००८) हा ग्रंथ धर्मसंस्था कशी अवतरली, तिचे समाजातील स्थान कसे निश्चित होत गेले. आणि तिने बजावलेल्या कोणकोणत्या भूमिका समाजविकासाच्या टप्प्यात बजावल्या व मानवाने तिचा नंतरच्या



अनुक्रमणिका

टप्प्यात कसा उपयोग व दुरुपयोग केला या व अशा जटिल समस्यांचा शोध हा ग्रंथ घेतो. यामध्ये कुराण व भगवद्‌गीता या धर्मग्रंथांनी पार पाडलेल्या सामाजिक, आर्थिक आणि राजकीय भूमिकांचे विश्लेषण आहे. 'भक्ती आणि धम्म' (२०१६) या ग्रंथातून भक्तीची अनेक रूपे यांचा वेध घेतला आहे. भक्ती ही शक्ती म्हणून मानवाच्या इतिहास प्रवाहात उभी राहिली; हीच भक्ती, संघर्ष, विद्रोह आणि बंडखोर ताकद म्हणूनही तिने क्रांतिकारक भूमिका मानवी इतिहासात बजावल्या. संत साहित्यातले बाऊल- अलवारसारखे दुर्लक्षित प्रवाह; मीरा-कबीर- नामदेव-तुकाराम याशिवाय प्राचीन ग्रीक चैतन्यापासून ते सूफी पंथ-ख्रिश्चन गूढवादी या अशा अनेक भक्तिसंप्रदायांबद्दलचे विवेचन इथे केलेले आहे. जागतिक पातळीवर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा जो धम्म विकसित झाला, त्याचा नवयान आणि विविध ज्ञानशाखा, संशोधने याचीही चर्चा इथे केली आहे.

आधुनिकता म्हणजे काय? ती कशी निर्माण झाली? यात कोणकोणत्या शक्ती होत्या? आधुनिकतेने जगावर कोणकोणते परिणाम घडवले? ती भारतात कशी आली? आपण जगाकडे कसे पाहतो? हे जग एक जग कसे बनू लागले? आधुनिक जगाचा प्रारंभ युरोपातच का झाला? आधुनिक जगामध्ये युरोपची आघाडी व तिचे वर्चस्व कसे अस्तित्वात आले? या व अशा अनेक प्रश्नांची उत्तरे दत्ता देसाई यांच्या 'आधुनिकतेचे आगमन' (१९१५) या पुस्तकात मिळतात. देसाई यांनी ह्या प्रश्नांची उत्तरे मार्क्सवादी दृष्टिकोनातून शोधण्याचा प्रयत्न केला आहे.

इतिहास आज एका ऐतिहासिक वळणावर उभा आहे. ज्ञानाच्या बाजारव्यवस्थेत तो उपेक्षित आहे. सांस्कृतिक राजकारणाच्या आखाड्यात तो विकलांग आहे. प्रत्यक्ष जीवनात माणसाच्या जगाचे भवितव्य काय? या प्रश्नाच्या ओझ्याखाली तो दडपलेला आहे. आज जागतिकीकरणामुळे कल्पनातीत गतिमान झालेल्या ह्या जगात अस्वस्थता ही दिवसेन्‌दिवस अधिक तीव्र रूप धारण करत आहे. या प्रक्रियेत आपण जागतिक झालो. असे आपण जागतिक बनण्याला जगाचा आधुनिक इतिहास मोठ्या प्रमाणात कारणीभूत आहे. आधुनिकतेच्या या इतिहासात धर्म, तत्त्वज्ञान, विज्ञान आणि समाजविचार, तंत्रज्ञान, व्यापार, औद्योगिक क्रांती आणि अर्थविचार-घड्याळे-नकाशे-हिशोब आणि प्रशासनपद्धती-युरोपबाह्य संस्कृती आणि वसाहती-राजकीय क्रांत्या-राष्ट्र आणि राष्ट्रवाद-इतिहास-कल्पनाप्रणाली आणि आधुनिकता-विविध वर्गांच्या भूमिका-सत्ता-सर्वसामान्य आम जनता आणि कामगार-स्त्रियांची अवस्था अशा अनेक गोष्टींची चर्चा या पुस्तकात केली आहे. थोडक्यात. आपण आधुनिकतेतून उद्याकडे म्हणजेच भविष्याकडे झेपावताना शास्त्रशुद्ध पद्धतीने इतिहासाचा वेध या पुस्तकात घेतला गेला आहे. मार्क्सवादी अन्वेषण पद्धतीमुळे आपणास इथे आधुनिकतेची पाळेमुळे समजतात.

विलास सोनवणे हे मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाचे पूर्वाश्रमीचे कार्यकर्ते, विद्यार्थिदशेत ते स्टुडंट फेडरेशन ऑफ इंडियाचे महाराष्ट्र राज्याचे सचिव-सत्यशोधक मार्क्सवादी-मुस्लीम मराठी साहित्य परिषद-मुस्लीम ओबीसी चळवळ ते युवा भारत असा त्यांचा राजकीय प्रवास झाला आहे. जातिव्यवस्थेचे अस्मितादर्श व एकसाची आकलन नाकारून त्यांचे तिच्या उत्पादन पद्धतीचे राजकीय अर्थशास्त्राच्या अंगाने मूलगामी चिंतन आहे ज्यातून जात, धर्म-भाषा यांच्या एकसाची आकलनाचा पेच त्यांनी अधोरेखित केला आहे. कार्यकर्ता म्हणून काम असताना समोर आलेले प्रश्न किंवा लढे बांधत असताना निर्माण झालेले गुंते, त्याची सोडवणूक करण्यासाठी घेतलेल्या भूमिका अशा अंगाने त्यांनी केलेले हे चिंतन त्यांच्या लेखातून प्रतिबिंबित झालेले आहेत. त्यांचे विश्लेषण हे वास्तवाशी नाते सांगणारे आहे. आपल्या लेखनातून वेळोवेळी उद्‌भवलेल्या प्रश्नांची व त्याचबरोबर मानवी जीवनातील मूलभूत प्रश्नांना त्यांनी मार्क्सवादी दृष्टिकोनातून भिडण्याचा प्रयत्न केला. त्यांची भाषणे आणि चर्चा ह्या शब्दबद्ध झाल्यामुळे या संहिता आज उपलब्ध झाल्या आहेत.

हिंदू आणि मुस्लीम समाजातील दोन्हीही बाजूंनी तिढे कसे निर्माण झाले किंवा ते मुद्दामहून निर्माण केले जातात या संबधीचे सोनवणे यांचे चिंतन प्रत्यक्षदर्शी आणि मूलभूत विश्लेषण करणारे आहे. रा. स्व. संघ मुस्लिमांना नेहमी राष्ट्रद्रोही ठरवून त्यांना वेठीस धरून खोट्यानाट्या गोष्टींचा प्रसार करून, या समाजाबद्दल द्वेष आणि शत्रुत्वाची भावना कशी वाढेल यासाठी पद्धतशीर प्रयत्न करतो. १९८१चा गोपाल सिंग आयोग व २००७ चा सच्चर आयोगाचा हवाला देऊन ते म्हणतात :

१९८१चा गोपाल सिंग आयोग इंदिरा गांधींच्या काळात नेमला गेला. सच्चर आयोगाचा समितीचा अहवाल हा २००७चा आहे. दोन्ही अहवालातील तफावत ही आकडेवारींची आहे. शिवाय गोपाल सिंग आयोगाने मुसलमानांच्या वेगवेगळ्या जातींची नोंद घेतली नव्हती. मधल्या काळात मुस्लीम ओबीसी चळवळीचा रेटा वाढल्यामुळे सच्चर आयोगाला मुसलमानांच्या वेगवेगळ्या जातींची नोंद घ्यावी लागली. गोपाल सिंग आयोगानुसार १९८१मध्ये मुस्लिमांच्या एकूण लोकसंख्येतील सरकारी नोकरीत केवळ २. ५ टक्के होते. सच्चर आयोगानुसार २००७ मध्ये मुस्लीम सरकारी नोकरीत असण्याचे प्रमाण हे केवळ २ टक्के होते. म्हणजे १९८१ मधले प्रमाण हे वाढण्याऐवजी अर्ध्या टक्क्यांनी घटले. १९८१ आणि २००७ मध्येही मुस्लीम लोकसंखेचे प्रमाण देशाच्या लोकसंख्येत पंधरा टक्के आहे. रा. स्व. संघ ज्याला राष्ट्रीय मुसलमान म्हणतो, तो आपला निधर्मीपणा सिद्ध करण्यासाठी आमची बुरखा पद्धती खूप वाईट आहे; आमच्यात आमचं काही खरं नाही; आमच्याकडे

तलाकची पद्धत खूप वाईट आहे; आमच्याकडे कुटुंब नियोजन नाही वगैरे. देशातील १९०२पासून आजपर्यंत सर्व जनगणना अहवाल पुनः पुन्हा हेच सांगतात की बहुपत्नीत्वाचे भारतातले सर्वाधिक प्रमाण हे जैनांमध्ये आहे, त्या खालोखाल आदिवासींमध्ये आहे. तिसऱ्या क्रमांकावर सवर्ण हिंदू, चौथ्या क्रमांकावर दलित आणि पाचव्या क्रमांकावर मुस्लीम आहेत. हा अहवाल मुस्लिमांनी तयार केलेला नाही. असा अहवाल तयार करण्यासाठी मुस्लिमांची संख्या ही सरकारी नोकरीत असावी लागते ती इथे दोन टक्के आहे. १९४७ पूर्वी सरकारी नोकऱ्यात मुस्लीम ३७ टक्के होते असा अहवाल आहे. १९४७ नंतर हा आकडा दोन टक्के झाला व आजही हे प्रमाण हेच आहे. ते वाढलेले नाही. जैविक बुद्धिजीवी होण्यासाठी विशिष्ट वातावरण लागते. तुम्ही एखाद्या समाजाला सातत्याने लक्ष्य करून सारखे निधर्मीपणाच्या परीक्षेला बसवणार असाल, तर ते जैविक वातावरण कसे निर्माण होईल? (२०१७: ३७-३८)

सुलभा ब्रह्मे ह्या कट्टर मार्क्सवादी कार्यकर्त्या लेखिका. एक ॲकडेमिशियन म्हणून त्यांनी प्रबोधनाचे काम लेखनाच्या माध्यमातूनही केले. लोकविज्ञान चळवळीतला त्यांचा सहभाग मोठा होता. इथे प्रमुख उद्देश हाच होता की अंधश्रद्धांच्या कोंडीत सापडलेल्या आपल्या समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजला पाहिजे. एक अर्थतज्ज्ञ म्हणून त्यांनी अशोक उपाध्याय यांच्याबरोबर महाराष्ट्रात गेल्या दहा वर्षांत ज्या अनेक शेतकरी चळवळी झाल्या त्यांचा सलग असा इतिहास तीन खंडात लिहिला आहे. यामध्ये विदर्भ आणि मराठवाड्यातील चळवळींचा आढावाही घेतला आहे. कृषिक्षेत्रातला हा एक डावा परिप्रेक्ष्य त्यांच्यामुळे लाभला आहे. त्यांनी डाव्या विचारसरणीच्या प्रसारासाठी अनेक पुस्तिका लिहिल्या. प्रत्यक्ष चळवळीत सहभाग घेऊन विविध समस्यांना सामान्यजन सामोरे जात आहेत त्याचे आकलन आणि विशेषतः तरुणांच्या योग्य भूमिका तयार व्हाव्यात आणि जनआंदोलनाचा रेटा वाढावा यासाठी सुलभा ब्रह्मे यांनी आयुष्यभर सातत्याने संशोधन लेखन केले. विशेषतः १९९० नंतरच्या लेखनावर एक नजर फिरवली तर त्यांनी किती विविध विषय हाताळले आहेत हे लक्षात येते. ब्रह्मे यांचा फोकस हा अधिक प्रबोधनावर राहिला आहे. मोठे ग्रंथ बहुतेकदा वाचले जात नाहीत म्हणून त्यांनी छोट्या पुस्तिका लिहिण्यावर भर दिला. इतिहासाचे विकृतीकरण, अल्पसंख्याकांच्या हक्कांचे संरक्षण, शेतकरी जात्यात, जागतिकीकरण की लोककेंद्री विकास, काश्मिर प्रश्न, अणुऊर्जा : भ्रम वास्तव आणि पर्याय, गाढा महागाईचा भस्मासुर, साम्राज्यशाही, खरे दहशतवादी कोण?, शासननिर्मित दुष्काळ, इंग्रजी माध्यमाचे वेड वगैरे. ह्या सर्व पुस्तिका १९९० नंतर प्रकाशित झाल्या आहेत.

'वर्तमानाची बखर' (२०१५) या पुस्तकात सुभाष थोरात यांनी साहित्य, संस्कृती, धर्म, दलितांवरील अन्याय, राजकारण, महामानवांचे कार्य आणि त्याचे आजच्या वर्तमानाशी असलेले नाते-तत्त्वज्ञान अशा विविध विषयांचा परामर्श घेतला आहे. तुकाराम-मार्क्स-एंगल्स- म. जोतिबा फुले-शाहू महाराज-डॉ.बाबासाहेब आंबेडकर-अण्णा भाऊ साठे- नेल्सन मंडेला आदी महामानवांवर चिंतनपर लेखन आहे. तुकाराम आणि मार्क्स यांच्यातील साम्यस्थळे त्यांनी दाखवून दिली आहेत. जोतिबा फुले आणि मार्क्स हे समकालीन होते पण जोतिबांना मार्क्ससारख्या अभ्यासाच्या सुविधा नव्हत्या. इतिहासाच्या ह्या मर्यादा ओलांडून जोतिबांनी मार्क्सइतकाच मूलगामी विचार आधुनिक भारतात पेरला आणि त्याचे पर्यवसान डॉ. बाबासाहेब आंबेडकर, शाहू महाराज यांसारखे महामानव निर्माण होण्यात झाले आणि त्यामुळेच आधुनिक भारताचा पाया रचला गेला.

इतिहासाचे विकृतीकरण होत असेल तर त्याला प्राणपणाने विरोध करायला हवा. आज धर्माधिष्ठित राष्ट्रवादाचा धोका निर्माण झाला आहे. ह्या वादाचा पुरस्कार करणारे इराण, अफगाणिस्तान, पाकिस्तान हे आजही मध्ययुगीन अंधारयुगामध्येच चाचपडताना दिसतात. धर्म, समाज, परिवर्तन, ब्रिटिशांचे वसाहतवादी राजकारण, वसाहतवादाला आवश्यक असणारी धर्माधिष्ठित राष्ट्रवाद आणि दहशतवाद, जमातवादाचा धोका, यातले सामाजिक धार्मिक व आर्थिक राजकारण असा एक व्यापक पट आणि त्याबद्दलचे एक मूलभूत चिंतनच इथे आहे. हिंदुत्ववाद्यांनी मुस्लीम द्वेष पसरवण्यात आपली हयात घालवली. थोरात म्हणतात, दहशतवादी हे जर मुस्लीमच असतील तर मालेगावमधील दहशती कारवायात हिंदूंचा सहभाग कसा उघड झाला? आधुनिक भारतात मुस्लीम लीगच्या राजकारणाला चेव आला हेही ह्या हिंदुत्ववाद्यांमुळेच आणि त्याचे पर्यावसन देशाची फाळणी होण्यापर्यंत झाला. ब्रिटिशांना भारताची फाळणी हवीच होती; हा साम्राज्यवादी धोरणाचा एक भाग होता.

शरद पाटील यांनी ऐंशीच्या दशकात मार्क्सवाद-फुले-आंबेडकरवाद (माफुआ) मांडणी विकसित केली. इतिहास लेखन अब्राह्मणी सौंदर्यशास्त्र, जातवर्ग संबंध, स्त्रीदास्य व जातीअंत ह्या नव्या संकल्पना मांडल्या. वास्तविक पाहता, त्यांनी मांडलेला भारतीय संदर्भातील मार्क्सवाद हा मार्क्सवादाचा एक विस्तारच आहे. पण याबाबत खूप वाद व मतभेद आहेत. शरद पाटील यांची १९९० नंतरची मराठीतील तीन पुस्तके आहेत (१९९६; २००३; २०१२). पाटील यांचे लेखन हे विस्तृत-दीर्घ-अनेक नवे आयाम आणि दृष्टी देणारे आहे आणि म्हणून ते मूलभूत स्वरूपाचे मानले गेले आहे. त्यांच्या लेखनावर व प्रतिपादनावर अनेक वाद झाले असले तरी पारंपरिक डाव्यांनी त्यांना फारसे गांभीर्याने घेतलेले दिसत नाही. भाजप सत्तेवर येण्यापूर्वीच्या काळात भारतात लोकशाही क्रांतीची समाजवादी पूर्ती कशी साकारता येईल? या संदर्भात पाटील लिहितात :





अनुक्रमणिका

गुजरात दंगल व तिचे इतर राज्यांत उद्रेक यावरून संघपरिवाराने धार्मिक दंगली हा आपला राजकीय कार्यक्रम बनवला असल्याचे स्पष्ट होते. पण धार्मिक दंगली, मग त्या ख्रिश्चनविरोधी असोत की मुसलमानविरोधी- हिंदूंची जातजमात एकजूट करायचे साधन आहे. ते साध्य झाले, की अतिशूद्रांच्या, परत्वे शूद्रांच्या, जातिव्यवस्थेच्या बेड्या दृढतर करण्याकडे 'हिंदुत्ववादाचा' मोर्चा वळेल. जात्यन्तक भांडवलदारी लोकशाही क्रांती होऊ न देण्याचा तोच हमखास मार्ग आहे. म्हणून त्यांना दोन्ही काँग्रेसचा पाठिंबा आहे. आर्थिक धोरणावर दोन्ही शक्ती सहमत आहेत. अमेरिकन सैन्याच्या भारतात झालेल्या कवायती जातिव्यवस्थासमर्थक बनिया भांडवलदार जातवर्गाच्या अराष्ट्रीय राजनीतीचा राजकीय आविष्कार होत्या, हे लक्षात घेतले पाहिजे. बनिया, भांडवलदार, ब्राह्मणी बुद्धिजीवी जातवर्ग व वरचढ शेतकरी जातीय उच्चभ्रू यांच्या या व्यूहरचनेची अब्राह्मणी बुद्धिजीवी जातवर्ग, सामाजिक व आर्थिक सर्वहारा जातवर्ग व विगर उच्चभ्रू शेतकरी जात वर्ग यांना जेवढी जाणीव होईल तेवढी जात्यन्तक भांडवलदारी लोकशाहीची तयारी होईल. त्याचबरोबर अब्राह्मणी बुद्धिजीवी, साहित्यिक व कलावंत या क्रांतीचे प्रबोधन राष्ट्रव्यापी करतील. मात्र या क्रांतीच्या व तिच्या प्रबोधनाच्या यशस्वितेची पूर्वशर्त समाजवाद उभारणीची पूर्वतयारी ही राहील (२००३ : २३९-४०).

क्रांतिसिंह नाना पाटील अकादमीनेसुद्धा अनेक प्रकारच्या पुस्तिका प्रसिद्ध करून डाव्या परिप्रेक्ष्यातून अनेक समस्यांची उकल आणि अनेक ज्वलंत प्रश्नांचे आकलन करून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे योगदान दिले आहे. ऐतिहासिक भौतिकवादी पद्धतीबरोबरच फुले आंबेडकरांच्या वैचारिक बैठकीचा उपयोग करून उमेश बगाडे यांनी दलितांचा प्रभुत्व आणि प्रतिकाराचा जाणिवेतील द्वंद्वाचा प्रश्न मांडला आहे (२०११). या संशोधनात्मक पुस्तिकेमध्ये बगाडे यांनी वर्गपूर्व समाजातील प्रभुत्व आणि प्रतिकाराच्या द्वंद्वामध्ये प्रवाहित झालेल्या दलित जाणिवेचा वेध घेतला आहे.

अकादमीने 'बुद्ध धम्म आणि भारतीय समाजक्रांती' (२००७) या पुस्तिकेत रावसाहेब कसबे, शरद पाटील, आनंद तेलतुंबडे आणि रणजीत परदेशी यांचे लेख समाविष्ट केलेले आहेत. दलित समाजाचे प्रश्न अस्मितेचे आणि स्वाभिमानाचे लढे (२००७ : २०) करून अपेक्षित सामाजिक परिवर्तन होण्यास मर्यादा निर्माण झाल्या असे तेलतुंबडे यांनी म्हटले आहे. आंबेडकरांचा धम्म हा नैतिकता आणि बहुजन हिताय बहुजन सुखाय या लोकशाही निकषांवर उभा होता. दलितांच्या अस्तित्वाची भौतिक बाजूच नाकारण्यासाठी डॉ. आंबेडकरांचीच भौतिकवादविरोधी प्रतिमा उभी केली गेली. जमिनीचे प्रश्न, किमान वेतन, कामाच्या अटी, सरकारची आर्थिक धोरणे या गोष्टी त्यांच्या औत्सुक्याच्या विषयामध्ये समाविष्ट नाहीत. चार दशकांच्या काळात दलितांच्या एकाही नेत्याने अथवा विचारवंताने, शासनाच्या आर्थिक धोरणांनी ग्रामीण दलितांच्या जीवनात काय हस्तक्षेप केला आहे, याची दखल घेतली नाही (२००७: १९-२०) असे तेलतुंबडे यांनी दलित चळवळींच्या संदर्भात म्हटले आहे. २००७च्या 'विचारवेध' संमेलनाच्या (सातारा) अध्यक्षीय भाषण म्हणून लिहिलेल्या दीर्घ मजकुराचे पुस्तकात रूपांतर झालेली संहिताही (२००८) तेलतुंबडे यांची शोषितांची बाजू मांडणारी आहे. भारतातील भांडवलदारांची संपत्ती ही सतत वाढणारी; जगातील श्रीमंतामध्ये भारतातील श्रीमंत अग्रक्रमात येताहेत. काही मिनिटाला ४०-५० लाख रुपये उत्पन या काही भांडवलदारांचे आहे (ही आकडेवारी २००७ ची आहे) तर गावातील शेतमजुरांची मजुरी रुपयांनी तरी वाढली का, हा प्रश्न तेलतुंबडे उपस्थित करतात. या पुस्तकातील आकडेवारी पाहता भारतातील आर्थिक विषमतेचे चित्र समोर येते.

दिलीप चव्हाण यांची नवमार्क्सवादाच्या अंगाने केलेली मांडणी 'साम्राज्यवाद : भाषा आणि संस्कृती' या पुस्तिकेत (२०१०) झाली आहे. शोषणाधिष्ठित व्यवस्थेच्या संवर्धन व संरक्षणात संस्कृतीची भूमिका कशी महत्त्वाची असते, हे सर्वप्रथम महात्मा फुल्यांनी उलगडवून दाखविले. जातिव्यवस्था शोषणप्रक्रियेत ब्राह्मणी धर्म व संस्कृतीच्या भूमिकेची चिकित्सा फुल्यांप्रमाणेच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी देखील केली.

**दलितांच्या अस्तित्वाची भौतिक बाजूच नाकारण्यासाठी डॉ. आंबेडकरांचीच भौतिकवादविरोधी प्रतिमा उभी केली गेली. जमिनीचे प्रश्न, किमान वेतन, कामाच्या अटी, सरकारची आर्थिक धोरणे या गोष्टी त्यांच्या औत्सुक्याच्या विषयामध्ये समाविष्ट नाहीत. चार दशकांच्या काळात दलितांच्या एकाही नेत्याने अथवा विचारवंताने, शासनाच्या आर्थिक धोरणांनी ग्रामीण दलितांच्या जीवनात काय हस्तक्षेप केला आहे, याची दखल घेतली नाही (२००७: १९-२०) असे तेलतुंबडे यांनी दलित चळवळींच्या संदर्भात म्हटले आहे. २००७च्या 'विचारवेध' संमेलनाच्या (सातारा) अध्यक्षीय भाषण म्हणून लिहिलेल्या दीर्घ मजकुराचे पुस्तकात रूपांतर झालेली संहिताही (२००८) तेलतुंबडे यांची शोषितांची बाजू मांडणारी आहे.**












मार्क्सवादी परंपरेत आन्टोन्यो ग्राम्शी, लुई अल्थुझर आणि थिओडर अडोनो यांनी आधुनिक काळातील संस्कृतीच्या राजकारणाचे सिद्धांतन केले. या नवमार्क्सवादी परिप्रेक्ष्यात मार्क्सवादी उत्पादनाची साधने भौतिकता या संकल्पनांबरोबरच शोषितांचे दमन करण्यासाठी सत्ताधारी वर्ग केवळ बळाचा वापर न करता जनमानसात त्यांच्या सत्तेप्रति स्वीकृती भावना कशी निर्माण करतो हे ग्राम्शीनी सांगितले आहे.

मार्क्सने मांडलेल्या उत्पादनशक्तींतून बनलेल्या पायाचे महत्त्व ग्राम्शीने नाकारले नाही; परंतु समाजामध्ये घडणाऱ्या घटनांच्या नियंत्या केवळ ह्या शक्तीच असतात ह्या मार्क्सच्या धारणेपासून त्याने फारकत घेतली. विचारसरणी ही समाजात कशी कार्यरत असते व ती जनमानसाची पकड कशी घेते, हा प्रश्न त्याच्यासमोर होता. त्याच्या मते विचारसरणी ही बेमालूमपणे कार्यरत असते. तिचे सर्वांत महत्त्वाचे काम म्हणजे सत्ताधारी वर्गाच्या सत्तेस शोषितांमध्ये अधिमान्यता मिळवणे. शासनकर्ता वर्ग त्याची सत्ता प्रस्थापित करण्यासाठी पाशवी बळाचा वापर करतो; परंतु केवळ बळाच्या आधारे तो त्याची सत्ता टिकवू शकत नाही. पाशवी बळापेक्षा तो शोषितांच्यामध्ये त्याच्या सत्तेप्रति स्वीकृती भावना निर्माण करतो. शोषितांनी स्वेच्छेने त्याला शरण जाणे हे त्याला बळाच्या किंवा हिंसेच्या वापरापेक्षा अधिक फायदेशीर असते. ग्राम्शीने सत्ताधाऱ्यांच्या वर्चस्वाला प्रभुत्व ही संकल्पना वापरली आहे. प्रभुत्व हे बळ आणि स्वीकृती यातून निर्माण होते. भांडवलदार वर्ग हा संपत्तीचे गठन करण्यासाठी उत्पादनाची प्रक्रिया क्रयवस्तू उपभोक्ता वर्ग याभोवतीची लोकसंस्कृतीच केवळ स्वतःच्या आधिपत्याखाली आणत नाही; तर तो जनसामान्यांच्या श्रद्धा-व्यवस्थेचेदेखील व्यवस्थापन व नियोजन करतो (२००७: ८).

चव्हाण यांनी साम्राज्यवादामुळे लोकसंस्कृतीचे भाषेच्या अंगाने होणारे नुकसान कसे प्रचंड आहे, हेही दाखवून दिले आहे. वसाहतवादी साम्राज्यवादामुळे भारतीय संस्कृतीचे सपाटीकरण (flattening of culture) झाले. असंख्य अप्रमाण भाषा अस्तंगत झाल्या; काही लोप पावल्या. हे भाषिक नुकसान कल्पनातीत आहे.

भांडवली लोकशाहीमध्ये धनदांडग्यांचे फावते आणि श्रमिक दलितांना देशोधडी लावले जाते. अशा परिस्थितीत डाव्या शक्तींनी सर्वसामान्य जनतेचे संघटन करायला हवे अशी सर्वसाधारण मांडणी आदिनाथ इंगोले यांनी केली आहे (२०१६). राहुल कोसंबी यांचे 'उभं-आडवं' (२०१६) हे पुस्तक डाव्या विचारसरणीच्या परिप्रेक्ष्यातून अलीकडच्या वास्तवाला भिडणारे पुस्तक म्हणायला हवे. त्यांच्या भूमिका ह्या सरळ निर्भीडपणे विषयाला भिडणाऱ्या आहेत; मग तिथे शरद पाटील असो वा विलास सारंग; किंवा दलित नवमध्यमवर्गीयांची पुरुषसत्ताक मनोवृत्ती असो. ते ह्या सर्वांचा (डाव्यांनाही न सोडता) समाचार घेताना दिसतात. त्यांच्या ह्या पुस्तकाने नवे सांस्कृतिक, सामाजिक व राजकीय भान देण्याचा निश्चित प्रयत्न केला आहे. जात-वर्ग-वर्ण-शोषण व्यवस्था-सांस्कृतिक व्यवस्था-स्थानिक आणि आंतरराष्ट्रीय राजकारण अशा अनेक परिमाणांचा आधार घेत. कोसंबी साहित्याच्या विविध विचार व्यवहारांवरही प्रकाश टाकतात. या निमित्ताने त्यांनी देशीवाद, नेमाडे आणि जातिव्यवस्था; नामदेव ढसाळ आणि राजा ढाले; दलित साहित्य आणि राजकारण; संस्कृती, साहित्य आणि सामाजिक बदल अशा अनेक विषयांवरचेही त्यांचे परखड विश्लेषण या पुस्तकात प्रतिबिंबित झाले आहे. समकालीन संस्कृती समीक्षेचा विचार करताना कोसंबी यांचे डाव्या वैचारिक मांडणीवरचे हे महत्त्वाचे पुस्तक म्हणायला हवे.

महाराष्ट्रातील १९७२चा दुष्काळ भीषण होता. या दुष्काळाचा सामना करताना वाळवा-इस्लामपूर या परिसरातील कष्टकरी जनतेला संघटित करून अनेक मोर्चेआंदोलने अशा सनदशीर मार्गाने शे. का. पक्षाने मोठा संघर्ष केला. या आंदोलनाचे प्रमुख नेते होते भाई प्रा. एन. डी. पाटील. उजव्या शक्ती ह्या शोषितांच्या चळवळी नेहमीच चिरडून टाकतात. १९७२मध्ये एक मोठा जनसंघर्ष झाला आणि शासनाला नमावे लागले. या संघर्षात प्रा. पाटील यांनी १९ ऑक्टोबर १९७२ या दिवशी इस्लामपूर (ता. वाळवा) तहसील कार्यालयावर मोर्चा काढला; पोलिसांनी लाठीहल्ला व गोळीबार केला. पण दुष्काळग्रस्तांची ही चळवळ शासनाला दडपता आली नाही. ती पुढे वाढतच गेली. यात चार मोर्चेकरी मरण पावले. या घटनेची चौकशी झाली. १९७३ मध्ये न्या. ए. व्ही. पाटकर यांचा एक सदस्य आयोग नेमला गेला. या मूळ इंग्रजी सत्यशोधन अहवालाचा विश्वास सायनाकर आणि सचिन गरूड यांनी मराठीत अनुवाद केला आहे (२०१६). या अनुवादामुळे हा अहवाल आता मराठी वाचकांना उपलब्ध झाला आहे. जनलढ्याबद्दलचे संशोधन आणि जनप्रबोधन या दृष्टीने हा महत्वाचा दस्तऐवज मानायला हवा.

१९८०च्या दरम्यान सुरू झालेल्या स्त्रीमुक्ती चळवळीने १९९०नंतर एक वैचारिक संभाषित (ideological discourse) म्हणून महत्त्वाची भूमिका बजावली आहे. डाव्या विचारात स्त्रीमुक्तीचा कार्यक्रम हा मध्यवर्ती असायला हवा, असा आग्रह अनेक प्रागतिक विचारवंतांचा राहिला आहे. ताराबाई शिंदे स्त्री-अभ्यास केंद्रानेही स्त्री प्रश्नांविषयी अनेक पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत. स्त्री अभ्यास क्षेत्र : आव्हाने आणि शक्यता (२०१६); स्त्रीवादी चर्चाविश्व : एक अन्वयार्थ (२०१५); पाठ्यपुस्तके आणि लिंगभाव : विश्लेषक चिकित्सा (२०१६); मुक्ता साळवे : भारतीय स्त्रीवादी सम्यक परिदृष्टी (२०१६) ह्या सर्व पुस्तिका अकादमी शिस्तीतल्या जरी असल्या तरी यामागे स्त्री प्रश्नांची तरुण विद्यार्थी आणि विद्यार्थिनींमध्ये समज आणि उकल व्हावी हाच केवळ उद्देश नाही तर एकूणच



अनुक्रमणिका

समाजजीवनात त्याचे पडसाद उमटावेत असा व्यापक दृष्टिकोन या लेखनातून दिसतो.

मार्क्सबरोबर फुले आणि आंबेडकरांनीही या विचाराला महत्व दिलेले आहे. शर्मिला रेगे यांचे पुस्तक *Writing Caste / Writing Gender* (2006) हे यासंदर्भात महत्त्वाचे आहे. एक सत्यशोधक विचारवंत म्हणून जातीवर्गस्त्रीदास्यत्वाचा अंत व्हावा ही त्यांची भूमिका शेवटपर्यंत राहिली. दलित स्त्रियांच्या मराठीतून प्रसिद्ध झालेल्या आत्मचरित्रात्मक कथनांतून जात आणि लिंगभाव या विषयाची चिकित्सक मांडणी या पुस्तकात रेगे यांनी केली आहे. या पुस्तकाची चर्चा मराठीतून व्हायला हवी होती पण अभ्यासकांकडून ते अजूनही झालेले नाही. बाईचे दासीकरण, भोगीकरण आणि बाजारीकरण ही जात आणि लिंगभेद या व्यवस्थेची अपत्ये आहेत. वर्णभेद, साम्राज्यवाद व पितृसत्ताक व्यवस्थेचे गुंतागुंतीचे संवंध स्पष्ट करणाऱ्या काळ्या स्त्रीवादी विचारवंतांची मांडणी भारतातील दलित बहुजन आदिवासी स्त्रीवादाशी संवाद करणारी आहे हे लक्षात आल्यावर रेगे यांची एक लेखमाला मराठीत प्रसिद्ध झाली (रेगे, २००६). यातील भूमिका ह्या भारतातील स्त्री चळवळींना महत्त्वाच्या आहेत.

स्त्री संघटनांमध्ये काम करणाऱ्यात किरण मोघे यांचे एक नाव अग्रस्थानी घ्यावे लागेल. स्त्रियांवद्दल आर. एस. एस. चे विचार काय आहेत? संघाने स्त्रियांना सार्वजनिक कार्यात सहभागी होण्यास फारसे प्रोत्साहन दिलेले नाही. परंपरा, बाजारव्यवस्था आणि अस्मितेच्या राजकारणात स्त्रियांची भूमिका प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे महत्वाची ठरते. धर्म, रीतीरिवाज, संस्कृती इत्यादी संकल्पना प्रत्यक्ष व्यवहारात आणि कौटुंबिक पातळीवर उतरतात. तिथे स्त्रियांचा त्यांच्याशी फार जवळचा संवंध येतो. किंबहुना स्त्रिया ह्या सर्व कल्पनांच्या वाहक असतात. पितृसत्ताक जात आधारित समाजात स्त्रियांचे स्वतंत्र अस्तित्व नसल्याने त्यांच्या श्रमाला किंमत नसते. घरातले श्रम अनुत्पादक समजले जातात. घराबाहेर, शेतात किंवा इतर उत्पादन प्रक्रियेत केलेल्या श्रमाला दुय्यम दर्जा समजून कमी मोबदला दिला जातो. किरण मोघे यांनी एकविसाव्या शतकातील सद्यःस्थितीतील स्त्रियांचे उदारीकरणाच्या काळात होणाऱ्या बाजारवादातून नव्या शोषणाची चिकित्सा केली आहे (मोघे; २०१५: ३६१-६०).

विद्युत भागवत यांनी पाश्चिमात्य जगातील स्त्रीवादी विचाराचा परिचय 'स्त्रीवादी सामाजिक विचार' (२००८) या पुस्तकातून करून दिला आहे. स्त्रीवाद हा पाश्चात्त्यांकडून आला आहे, म्हणून तो भारतीय परिस्थितीला त्याज्य मानून फेकून दिला पाहिजे अशी उजव्यांची भूमिका कायम राहिली आहे. जागतिकीकरणाच्या रेट्यात धार्मिक मूलतत्त्ववाद अधिक वेगाने पसरत आहे. अशा परिस्थितीत स्त्री शोषण आणि कुचंबणा ही वाढत चालली आहे. भारतीय स्त्रियांचे प्रश्न समजावून घेण्यासाठी आणि स्त्रीवाद विकसित व्हायचा असेल तर स्त्रीवादाचा अभ्यास जागतिक इतिहासाच्या संदर्भात झाला पाहिजे. या दृष्टीने भागवतांचे हे पुस्तक महत्त्वाचे आहे. सिमॉन द् बोहुआर, बेटी फ्रिडन-श्लोमिथ फायरस्टोन-ज्युलिएट मिशेल आणि शिला रोबॉथम या प्रमुख स्त्रीवादी विचारवंतांच्या महत्त्वाच्या योगदानाबद्दलचा परिचय या पुस्तकात करून दिला आहे. भागवतांनी संपादित केलेले स्त्रियांचे मराठीतील निबंधलेखन (२०१३) हे पुस्तक महाराष्ट्रातील स्त्रियांचा १८६८ पासून २०१२ पर्यंतचा लेखाजोखा सादर करते. स्त्री शोषणाचे घटित हे जगभर आहे. त्यातून मुक्त होण्याचा विचार मराठी स्त्री कशी करते, याचे एक दीडशे वर्षांचे महाराष्ट्रातील चित्र या पुस्तकातून आपल्या डोळ्यांसमोर उभे केलेले आहे.

विद्युत भागवत यांनी प्रतिमा परदेशी यांच्याबरोबर 'अब्राह्मणी स्त्रीवादी इतिहास लेखनाच्या दिशेने' (२०१५) हे पुस्तक संपादित केले आहे. गेल्या दशकात स्त्रियांचे स्थान, समाज परिवर्तनात अनन्यसाधारण आहे हे गृहीतक स्त्रीवाद ही एक राजकीय जाणीव म्हणून निर्माण होण्यात झाली. जागतिकीकरणाच्या लाटेत जाणाऱ्या भारतासारख्या देशात संस्कृतीचे जे राजकारण उभे राहत आहे, त्यातून फार मोठ्या प्रमाणावर लिंगभावाचे राजकारण घडताना दिसते. जात, जमात, धर्म, वर्ग याचप्रमाणे लिंगभाव, लिंगभेद ह्यांना भौतिक पाया असतो. हे भेद भिन्न सामाजिक रचनांमधून घडवले जातात. स्त्री प्रश्न हा इतिहासातून वेगळा काढता येत नाही. अब्राह्मणी स्त्रीवादी परिप्रेक्ष्यातून या पुस्तकात शरद पाटीलांपासून गोपाळ गुरू यांच्यापर्यंतचे संशोधनात्मक लेख समाविष्ट केले आहेत. ब्राह्मणी आणि अब्राह्मणी ह्या संकल्पना जातीवाचक नाहीत; त्या समाजशास्त्रीय आहेत आणि त्या वृत्तीवाचक आहेत. भोवतालच्या समाजातील विषमता, स्त्रीदास्य, विकासापासून वंचित असलेले अनेक जाती व वर्ग, भिन्न जीवन जगणारे आदिवासी, दलित हे परिवर्तनासाठी लढा देत आहेतः ह्या सर्वच शक्तींना इथे अब्राह्मणी असे संबोधण्यात आले आहे.

सावित्रीबाई फुले यांच्या क्रांतिकारी कार्याप्रमाणेच ताराबाई शिंदे (१८५०-१९१०) यांची 'स्त्री-पुरुषतुलना' (१९९६) ही संहिता महत्त्वाची आहे. एकोणिसाव्या शतकात ताराबाईंनी ही संहिता लिहिली होती. स्त्रीजातीचे दुःख दूर व्हावे आणि स्त्रियांना समाजात मानाचे स्थान मिळावे हा मूळ हेतू या पुस्तकामागे होता. ताराबाईंचे हे पुस्तक स्त्री-पुरुषसत्तासंबंधातील असमतोलाचे विवरण यावर प्रकाश टाकते. भारतीय स्त्रीमुक्ती परंपरा निर्माण करणारे हे संभाषित आहे. ताराबाई ह्या महात्मा फुले (१८२७-१८९०) आणि लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख (१८२३-१८९२) यांच्या समकालीन होत्या. स्त्री समतेचा व स्त्री सन्मानाचा हा विचार इथे का रुजला नाही, हा प्रश्न विचारायला हवा. पातिव्रत्य किंवा स्त्रीधर्म याबद्दलची ताराबाईंनी केलेली



अनुक्रमणिका

डाव्या चळवळीने गेल्या सत्तरऐंशी वर्षात परिवर्तनाच्या विश्वात मोठे योगदान दिले आहे. यात अनेक छोट्यामोठ्या शक्तींचा सहभाग राहिला आहे. वैचारिक सिद्धांतन केले आहे; हे कुणीही मान्य करेल. पण याचबरोबर अनेक ताणेबाणे-नेतृत्वाचा प्रश्न-हेवेदावे-वैचारिक मतभेदांतून बहिष्कृतता किवा हद्दपारितता.चळवळींतून आलेली निराशा-वैफल्य-अनेक जीवनदायी कार्यकर्त्यांकडे झालेले दुर्लक्ष-उपेक्षा आणि आवाळ-अहंकारातून विचार-व्यवहारांवर किंवा दोषांवरच अधिक भर देऊन अनुल्लेख करणे किंवा सरळसरळ वगळण्यावरच झुलणारी अहमहमिका, अनेक छोट्यामोठ्या शक्तींच्या बलस्थानांकडे दुर्लक्ष किवा डोळेझाक या व अशा अनेक वर्तन-व्यवहारांमुळे पुरोगामी, परिवर्तनवादी व डाव्या चळावळींचे फार मोठे नुकसान झाले आहे, हे कुणीही मान्य करेल.

व्याख्या पुस्तकाच्या सुरुवातीसच दिली आहे :

स्त्रीधर्म म्हणजे काय? निरंतर पतीची आज्ञा पाळणे-त्याचे मर्जीप्रमाणे वागणे-त्यांनी लाथा मारिल्या-शिव्या दिल्या-दुसऱ्या रांडा ठेविल्या-नवरूजी दारू पिऊन-जुवा खेळून कफलक होऊन-शंख करीत-चोरी करून-कुणाचा प्राण घेऊन-फितूर चहाडी-खजीना लुटून-लाच खाऊन जरी घरी आले; तरी स्त्रियांनी आपले हे कोणी जसे कृष्णमहाराज गौळ्यांचे दही दूध चोरून चंद्रवळीला कलंक लावून आलेत; असे समजून परमात्म्यासारखी यांची मोठ्या हसतमुखाने देवासारखी पूजा करावी-सेवेत हजर रहावे हा स्त्रीधर्म (१९९९: ९२).

ताराबाईंनी एकोणिसाव्या शतकात पातिव्रत्य किवा स्त्रीधर्माची केलेली व्याख्या आज एकविसाव्या शतकात आहे तशीच आहे; त्यात फारसा बदल झाला आहे असे अजिवात दिसत नाही.

ताराबाईंप्रमाणेच महाराष्ट्रातील दुर्लक्षित स्त्री विचार परंपरेचा आणि यातील प्रतीके व समकालीन सांस्कृतिक राजकारणाचा वेध घेत एक नवी मांडणी सचिन गरूड यांची आहे (२०१३). फुलेवादी परिप्रेक्ष्यातून कोल्हापूर भागात समाज पविर्तनात आणि सांस्कृतिक उत्थापनात उपेक्षित व दुर्लक्षिलेल्या सामान्य व्यक्तींच्या असामान्य कर्तृत्वाचा इतिहास त्यांनी मांडला आहे. हा एक वंचितांचा इतिहास (Subaltern History) मांडण्याचा नवा प्रयोग गरूड यांचा आहे. मार्क्सवाद्यांनी या इतिहासाकडे तसे दुर्लक्ष केलेले आहे, असे अभ्यासकांचे मत आहे. माफुआ विचारांनी मात्र ही कोंडी फोडली आहे.

## ३.

सर्वप्रथम हे स्पष्ट केले पाहिजे की खालील भाष्य करताना हे मला लखलखीत माहीत आहे की माझे चळवळीतील, रस्त्यावरील, प्रत्यक्ष रणांगणांवरील योगदान हे शून्य आहे. त्याचबरोबर मी डाव्या विचारविश्वातला मुळीच संशोधक किंवा विद्वान वगैरे नाही. पण परिवर्तनवादी चळवळीत काही ना काही कुवतीनुसार काम करत होतो व करत आहे. एक अभ्यासक म्हणूनही महाविद्यालयीन काळापासून सतत वाचत आलो आहे; थोडेफार लिहिलेही आहे. म्हणून काही सुचविण्याची काहीएक नैतिकता मला लाभली आहे, या अभिनिवेशाखाली या लेखाचा शेवट करत आहे.

डाव्या चळवळीने गेल्या सत्तरऐंशी वर्षांत परिवर्तनाच्या विश्वात मोठे योगदान दिले आहे. यात अनेक छोट्यामोठ्या शक्तींचा सहभाग राहिला आहे. वैचारिक सिद्धांतन केले आहे; हे कुणीही मान्य करेल. पण याचबरोबर अनेक ताणेबाणे-नेतृत्वाचा प्रश्न-हेवेदावे-वैचारिक मतभेदांतून बहिष्कृतता किंवा हद्दपारितता. चळवळीतून आलेली निराशा-वैफल्य-अनेक जीवनदायी कार्यकर्त्यांकडे झालेले दुर्लक्ष-उपेक्षा आणि आवाळ-अहंकारातून विचार-व्यवहारांवर किंवा दोषांवरच अधिक भर देऊन अनुल्लेख करणे किंवा सरळसरळ वगळण्यावरच झुलणारी अहमहमिका, अनेक छोट्यामोठ्या शक्तींच्या बलस्थानांकडे दुर्लक्ष किंवा डोळेझाक या व अशा अनेक वर्तन-व्यवहारांमुळे पुरोगामी, परिवर्तनवादी व डाव्या चळवळींचे फार मोठे नुकसान झाले आहे, हे कुणीही मान्य करेल. जातीअंत आधी का वर्गअंत आधी? यावर वाद होऊ शकतो; विकसित होत असलेल्या नवमार्क्सवादावर चर्चा होऊ शकते; माफुआबद्दल चर्चा होऊ शकते; संवाद होऊ शकतो; काही समान कार्यक्रम घेऊन व्यापक (broader) कार्यक्रम घेता येतो. पण हे होताना दिसत नाही. यासाठी काय करायला हवे, याचा विचार होणे आवश्यक आहे; ही कोंडी फोडली गेली पाहिजे. समाज व सांस्कृतिक परिवर्तनाचे पर्यावरण आणि अवकाश मोठा झाला पाहिजे याबद्दल काही ठोस पावले उचलली गेली पाहिजेत. सर्वसमावेशक डाव्या शक्तीच उजव्या व प्रतिगाम्यांना वठणीवर आणू शकतात. हे काही नव्याने सांगितले जात आहे अशातला भाग नाही. आपण माणूस असल्यामुळे आपणास अनेक गोष्टींचे विस्मरण होत असते, शिवाय आपण खूप वेळा घायकुतीलाही येतो. हे काही खरे नाही अशा प्रतिक्रिया अनेक जीवनदायी कार्यकर्त्यांकडून मी अनेकदा ऐकल्या आहेत. म्हणून कंटाळून न जाता हे सारखे सारखे सांगायला हवे, असे वाटते.

जीवनदायी डाव्या चळवळीतले कार्यकर्ते राजीव कालेलकर यांनी अशाच प्रकारची भूमिका मांडली आहे (२०१५: १६३-



अनुक्रमणिका

६७). त्यांनी मार्क्सवादी आणि बिगर मार्क्सवादी पुरोगामी यांच्यात संवाद होण्याच्या आवश्यकतेवर भर दिला आहे. भारतात जातिव्यवस्था आहे; तसेच ब्राह्मणशाही आहे. हा समाजच पुरुषसत्ताक आहे. पण राज्य म्हणून आणि शासनकर्ता वर्ग म्हणून जगभर भांडवलशाही आहे. भांडवलशाहीची पहिली शास्त्रीय समीक्षा मार्क्सने केली. म्हणून या संवादप्रक्रियेला पुढे नेण्याचे काम मार्क्सवाद्यांनीच करायला हवे.

मार्क्सवाद्यांमध्ये अनेक प्रवाह आहेत; तसेच फुले आंबेडकरवाद्यांमध्येही आहेत; गांधीवाद्यांमध्ये आहेत. स्त्रीवाद्यांमध्येही आहेत. हे सारे वादी आणि त्यांच्यामधील प्रवाह सामान्य लोकांचे प्रतिनिधित्व करत असतील, तर त्यांनी आपल्या मतभेदासकट संवाद सुरू केला पाहिजे आणि किमान कार्यक्रमावर एकत्र आले पाहिजे. किमान कार्यक्रमावर एकत्र यायचे म्हणजे काय? लोकशाही, समता, सामंजस्य आणि सहिष्णुता ही जीवनमूल्ये म्हणून स्वीकारणे होय. ते म्हणतात :

मार्क्सवाद्यांपासून सर्व बिगर मार्क्सवादी पुरोगाम्यांना लोकशाही हवी असते. त्यांची लोकशाहीविरुद्धची भूमिका ही खोट्या लोकशाहीविरुद्धची प्रतिक्रिया असते. सर्व डाव्यांचे हे कर्तव्य आहे की लोकांना व सामान्यजनाला खऱ्या लोकशाहीवरचा विश्वास परत मिळवून दिला पाहिजे. घरापासून शेती, कारखाने, कचेऱ्यांपर्यंत तसेच शहरी आणि ग्रामीण विभागातील सर्व समाजजीवनातील व्यवहारापर्यंत लोकांना लोकशाही त्यांच्या हाताला लागली पाहिजे.

समाजवाद-साम्यवाद-सर्वोदय-अंत्योदय-लोकशाही समाजवाद-दलित-बहुजनवाद-स्त्रीवादातील सर्व प्रवाह व पर्यावरणवादी सर्व प्रवाह यांचा गाभा समता हाच आहे

या सर्वांच्यात समतेची आस आहे. ही आसच साऱ्या पुरोगामी तत्त्वज्ञानामागील चैतन्य आहे. त्या चैतन्याला सर्व पुरोगाम्यांनी आपल्या मतभेदासकट आवाहन केले पाहिजे (२०१५:६४-६५).

कालेलकरांची ही भूमिका मान्य करायला हवी अशी आहे. ती आजच्या काळात कळीचीही भूमिका आहे. पण प्रत्यक्षात ही साकार करताना काय काय होईल, हे सांगता येणार नाही. तरीही असा प्रयोग होणे गरजेचे आहे. जयप्रकाश नारायण यांनी असा प्रयोग केला होता आणि इंदिरा गांधींची सत्ता जाऊन जनता सरकार स्थापन झाले होते. हा इतिहास आहे. याची पुनरावृत्ती होऊ शकेल?

या लेखाच्या अखेरीस. के. सच्चिदानंदन यांची एक कविता (२०१३: २०-२१) या संभापिताच्या पार्श्वभूमीवर उद्धृत करतो; ती खूपच बोलकी आहे :

*शत्रू कोण आहे?*
*शिक्षक जो तुमच्या मुलांना शिकवतो खोटं*
*तो तुमचा शत्रू नाहीय*
*तो वाईट बोलतो त्या धड्यांबद्दल ते त्यानं*
*शिकवायलाच पाहिजेत*
*आणि वाईट वाटतं त्याच्या बायकोबद्दल*
*जी कंटाळवाणी चाकरी करते स्वयंपाकघरात*
*तुमचा निरीक्षक जो रोखून बघतो तुमच्याकडं*
*तुम्ही कामावर उशिरा आल्याबद्दल*
*तुमच्या मुलाला इस्पितळात नेऊन आणल्यानंतर*
*तुमचा शत्रू नाहीय*
*तो हे करतो त्याच्या वरिष्ठाच्या भीतीनं*
*आळशी तरुण रस्त्यावर भटकणारा*
*लांब केसांचा व फुल्याफुलांच्या सदऱ्याचा*
*तुमचा शत्रू नाहीय*
*तो गरीब सावज आहे व्यापारी सापळ्यातलं*
*गोड गोड अंगाई गाणारा गायक*
*बेभान होऊन अंगावरचे कपडे काढून टाकणारी गायिका*
*दिवसभराची रोटी कमावणारा कादंबरीकार*
*अर्थहीन आयुष्याबद्दल लिहीत राहणारा*
*ते सगळे तुमचे शत्रू नाहीत*
*ते निव्वळ बाहुले आहेत कुणाच्यातरी हातातले*
*धर्मगुरू धैर्यावर प्रवचन देणारा*
*भक्त निर्जीव दगडासमोर प्रार्थना करणारा*
*तुमचे शत्रू नाहीत*
*त्यांना मुळीच कळत नाही की ते काय करीत आहेत*
*तुरुंगात तुमची हाडं मोडणारा जेलर*
*केवळ तुम्ही काही प्रश्न विचारले म्हणून*
*तुम्हाला मृत्युदंडाची शिक्षा ठोठावणारा न्यायाधीश*
*तुमचे शत्रू नाहीत*
*ते फक्त कायद्याचं पालन करताहेत कुणासाठी तरी*
*शेपूट हलवणाऱ्या पाळीव कुत्र्याची निष्ठा*
*जेव्हा तुम्ही मारता आणि आपल्या कह्यात घेता त्याला*
*तो तुमचा शत्रू नाही*
*त्याची मूकसंमती*
*जिनं सगळं काही निर्माण केलं आणि*
*काहीचं सोडलं नाही*
*ती तुमची शत्रू आहे*
*तुम्ही जे उभं राहता आणि पाहता हे*
*कळत नाही तुम्हाला की काय करायचं*
*तुम्ही तुमचे शत्रू आहात* (२०१३: २०-२१)

●

डॉ. दीपक बोरगावे
भक्तीनंदन, सर्वे नं.१/२/३१,
महादेव मंदिराजवळ ममता नगर,
जुनी सांगवी, पुणे-४११ ०२७;
मोवाईल : ०९४२२५१८८६४ /९४०५२६७७८२



अनुक्रमणिका








लेख

भास्कर ढोके

# साहित्यविश्व आणि देशीवादाची चर्चा



**मराठी समीक्षा आणि सिद्धांत चर्चांमध्ये मोठ्या प्रमाणात अस्तित्ववाद, आधुनिकवाद, रूपवाद, संरचनावाद, विरचनावाद, उत्तरसरंचनावाद, अतिवास्तववाद, इ. पाश्चात्त्य सिद्धांतांचीच चर्चा मोठ्या प्रमाणात होत होती. मार्क्स, फुले, आंबेडकर, लेनीन, माओ यांच्या विचारांवर आधारित समाजशास्त्रीय मांडणीही केली जात होती. साहित्य प्रकारांचीही चर्चा केली जात होती. याच दरम्यान भालचंद्र नेमाडे यांनी साहित्याची 'देशी' भूमिकेतून मांडणी करायला सुरुवात केली.**



'सह्याद्री' मासिकातून १९३५ ते १९३९ या काळात बा. सी. मर्ढेकर यांचा 'वाङ्मयीन महात्मता' हा दीर्घ निबंध प्रसिद्ध झाला. मराठी वाङ्मय एकांगीपणे परपुष्ट आहे. ते परपुष्ट आहे, पण पुरेसे परपुष्ट नाही असा त्यांचा आक्षेप होता. राजवाडे यांनी आपल्या निबंधातून व्यक्त केलेल्या विचारांच्याच जवळ जाणारा हा मुद्दा मर्ढेकरांनीही मांडलेला दिसतो.

मर्ढेकर आपल्या निबंधातून आपल्या 'वाङ्मयीन महात्मता' या निबंधातून मराठी साहित्य एकांगीपणे इंग्रजी साहित्य आणि विचारांचे अनुकरण करणारे आणि कल्पनादारिद्र्य असलेले आहे, असे म्हटले. हे विचार मांडताना त्यांनी 'लेखनपूर्व आत्मनिष्ठा आणि लेखनगर्भ आत्मनिष्ठा' या दोन तत्त्वांचा उल्लेख केला. मराठी साहित्यात आत्मनिष्ठेचा अभाव जाणवत होता. 'तादात्म्यता' त्यांना महत्त्वाची वाटत होती. पुढे १९९५पर्यंत विविध निबंधांतून मर्ढेकरांनी समीक्षात्मक आणि सौंदर्यविचारांविषयी लेखन केले. मराठीत प्रथमच सौंदर्यशास्त्राची मांडणी करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. 'लयतत्त्व' आणि भावनानिष्ठ समतानतेचा सिद्धांत काव्याच्या संदर्भात मांडला.

बा. सी. मर्ढेकरांनंतर शरदचंद्र मुक्तिबोधांनी साहित्यात 'मानुषता' हेच महत्त्वाचे तत्त्व असल्याचे प्रतिपादन केले. मुक्तिबोधांना कोणत्याही कलावृत्तीत समाजसापेक्षता किंवा समाजमूल्य महत्त्वाचे वाटत होते. बाह्य सौंदर्यापेक्षा त्यांना लेखक, कवीची जीवनविषयक आकलनाची अभिव्यक्ती जास्त महत्त्वाची वाटत होती.

रा. भा. पाटणकरांनी सौंदर्यशास्त्राची मांडणी द्विध्रुवात्मकता या सिद्धांताच्या आधारे केली. याशिवाय अशोक केळकर, दि. के. बेडेकर, प्रभाकर पाध्ये, श्री. के. क्षीरसागर (टीकाविवेक- १९६५) यांनीही साहित्य, समीक्षा आणि सौंदर्यविचारात काही एक भर घातली. साहित्यविश्वात त्याची चर्चाही होत राहिली. कलावाद आणि जीवनवाद यांचीही चर्चा घडत राहिली. १९६०च्या



दशकात मराठी साहित्यात ग्रामीण, दलित, स्त्रीवाद, आदिवासी, ख्रिस्ती, जनवादी, मुस्लीम साहित्य असे काही प्रांत निर्माण झाले. त्या-त्या विचारांचे समर्थन करणारे, मांडणी करणारे विचारही व्यक्त होत राहिले. यातील काही विचार, चळवळी एकमेकांना छेद देणाऱ्या तर काही एकमेकांना पूरक अशाही होत्या.

मराठी समीक्षा आणि सिद्धांत चर्चांमध्ये मोठ्या प्रमाणात अस्तित्ववाद, आधुनिकवाद, रूपवाद, संरचनावाद, विरचनावाद, उत्तरसंरचनावाद, अतिवास्तववाद, इ. पाश्चात्त्य सिद्धांतांचीच चर्चा मोठ्या प्रमाणात होत होती. मार्क्स, फुले, आंबेडकर, लेनीन, माओ यांच्या विचारांवर आधारित समाजशास्त्रीय मांडणीही केली जात होती. साहित्य प्रकारांचीही चर्चा केली जात होती. याच दरम्यान भालचंद्र नेमाडे यांनी साहित्याची 'देशी' भूमिकेतून मांडणी करायला सुरुवात केली.

आज २१ व्या शतकाच्या दुसऱ्या दशकाच्या उत्तरार्धात मागे डोकावून पाहिले तर नेमाडे यांनी मांडलेली देशीयतेची भूमिका आणि दलित साहित्याची मांडणी या दोनच गोष्टी ठळकपणे चर्चेत राहिलेल्या दिसतात.

**नेमाडेंचा देशीवाद :**

१८व्या शतकात इंग्रजांच्या संपर्कातून पाश्चात्त्य साहित्य, समीक्षा आणि साहित्यशास्त्राचा परिचय भारतीय समाजाला झाला. काही विद्वान आणि विचारवंतांना हा आधुनिक युगाचा प्रारंभ होता असे वाटते. या आधुनिक होण्याच्या प्रभावातच आपला साहित्य व्यवहार मोठ्या प्रमाणात सुरू होता. या पार्श्वभूमीवर १९८३मध्ये भालचंद्र नेमाडे यांनी 'साहित्यातील देशीयता' हा निबंध लिहून एका नव्या विषयाची चर्चा सुरू केली. तत्पूर्वी १९६१ ऑक्टोबरच्या 'रहस्यरंजन' या अंकातील 'निरस्तपादपे देशेः श्री. के. क्षीरसागर यांचा वादसंवाद' या लेखापासूनच त्यांनी आपल्या देशीवादी विचारांची मांडणी सुरू केली होती. १९७८मध्ये चंद्रकांत पाटलांना दिलेल्या मुलाखतीत मराठी नाटकाचे 'गावठीकरण' होणे गरजेचे असल्याचे त्यांनी म्हटले होते. 'गावठीकरण' हा शब्द त्यांनी देशीकरण याच अर्थाने वापरला होता. ''इंग्रजी संस्कृतीचं आणि आपलं फारसं जुळत नाही.'' भारतीयांना पाश्चात्त्य संस्कृतीचा, गोऱ्या कातडीचा भयंकर गंड आहे. आपल्या निर्बुद्ध वर्तमानपत्रवाल्यांनी आणि मूर्ख लेखकांनी इंग्लंडबद्दल भलभलत्या मिथस् करून ठेवल्या आहेत.'' इत्यादी विधानांमधून त्यांचा कल स्पष्ट होत होता.

''कोणत्याही साहित्यातून देशी जाणिवा स्वाभाविकतःच व्यक्त व्हाव्यात, अशी अपेक्षा असते.'' अशी भूमिका घेत नेमाडेंनी देशीपणाचे भान म्हणजे मागासलेपण नसून ते आपले स्वत्व आहे. प्रत्येक समूहाची स्वतःची संस्कृती असते. आणि तो समूह त्या-त्या संस्कृतीमध्येच ठामपणे स्वतःला प्रकट करू शकतो. कुठलीही साहित्यकृती, पुतळा, चित्र, संगीत आपआपल्या परिसराशी, स्थलकालाशी अतूटपणे जोडलेली असते,' अशी कलाविषयक भूमिकाही स्पष्ट केली. आंतरराष्ट्रीय साहित्य वगैरे संकल्पना नाकारल्या. त्यांच्या मते आंतरराष्ट्रीय ही कृत्रिम आणि परजीवी संकल्पना आहे, तर देशीयता ही बहुकेंद्री, वर्णनपर आणि प्रत्यक्ष संकल्पना आहे. देशीपण हे सामान्य आणि अपरिहार्य तत्त्व आहे, कारण देशीपणाचे हे तत्त्व विशिष्ट संस्कृतीने निर्मिलेल्या बऱ्या-वाईट, लहान-मोठ्या सर्व प्रकारच्या कृतींमध्ये प्रकट झालेले दिसते. म्हणूनच आपल्या देशी संस्कृतीकडे दुर्लक्ष करून आभासी आंतरराष्ट्रीय पाहण्याची उलटी प्रक्रिया त्यांना साहित्याची मूलभूत गरज वाटत नाही. कुठल्याही चांगल्या साहित्यकृतीची मुळं आपापल्या भूमीतच रुजलेली असतात.' नेमाडे यांच्या या देशीवादी भूमिकेने मराठी साहित्य चर्चेला चांगलाच हादरा बसला हे स्पष्टच आहे. साहजिकच त्यांच्या देशीवादी मांडणीला विरोधही होऊ लागला. रा.भा. पाटणकर, हरिश्चंद्र थोरात, विलास सारंग, अनिकेत जावरे इ. अभ्यासकांनी नेमाडेंच्या मांडणीची चिकित्सा करत काही शंकाही उपस्थित केल्या आहेत. विशेषतः नेमाडे यांची जातव्यवस्थेसंदर्भातील भूमिका. देशी प्रमाणकांबावतची मांडणी, इंग्रजी भाषेविषयीची भूमिका चर्चेचा विषय ठरली आहे.

भालचंद्र नेमाडे यांनी आपली भूमिका 'साहित्यातील देशीयता हा निबंध, काही मुलाखती आणि भाषणांमधून मांडली आहे. १९८३पासून भारतीय साहित्यविश्वात सुरू झालेली देशीवादाची चर्चा दीर्घकाळ सुरूच आहे आणि साहित्य समीक्षेवरही नेमाडेंच्या विचारांचा मोठा प्रभावही पडताना दिसतो आहे. काही अभ्यासक या प्रभावाला 'नेमाडपंथ' असंही म्हणतात.

**पठारे आणि देशीवाद :**

भालचंद्र नेमाडे यांनी वसाहतवादाची प्रतिक्रिया म्हणून देशीवादाची मांडणी केली होती. त्यात जागतिकीकरणाचेही सूचन होतेय. त्यांच्या मांडणीमध्ये रंगनाथ पठारे यांनी 'जागतिकीकरण आणि देशीवाद' या १२ एप्रिल २००२ रोजी कोल्हापूर येथे केलेल्या भाषणातून नेमाडे यांनाच अनुसरणारी आणि देशीवादात भर घालणारी मांडणी केली. जागतिकीकरणाच्या भेसूर चेहऱ्याकडे त्यांनी लक्ष वेधले. त्यांच्या विवेचनातून, जागतिकीकरण ही औद्योगिक क्रांतीतून निर्माण झालेल्या भांडवली व्यवस्थेचीच एक बाजू असल्याचे त्यांनी स्पष्ट केले. या जागतिकीकरणाच्या रेट्यामध्ये आपल्याला जगण्याचे, टिकण्याचे, स्वत्व जपण्याचे बळ केवळ देशीयतेमध्येच आहे. म्हणून जागतिकीकरणाला सामोरे



अनुक्रमणिका

**कुठल्याही चांगल्या साहित्यकृतीची मुळं आपापल्या भूमीतच रुजलेली असतात.' नेमाडे यांच्या या देशीवादी भूमिकेने मराठी साहित्य चर्चेला चांगलाच हादरा बसला हे स्पष्टच आहे. साहजिकच त्यांच्या देशीवादी मांडणीला विरोधही होऊ लागला. रा.भा. पाटणकर, हरिश्चंद्र थोरात, विलास सारंग, अनिकेत जावरे इ. अभ्यासकांनी नेमाडेंच्या मांडणीची चिकित्सा करत काही शंकाही उपस्थित केल्या आहेत. विशेषत: नेमाडे यांची जातव्यवस्थेसंदर्भातील भूमिका. देशी प्रमाणकांबाबतची मांडणी, इंग्रजी भाषेविषयीची भूमिका चर्चेचा विषय ठरली आहे.**



जाताना सामान्यजनांसमोर देशीवादी असण्याचाच पर्याय शिल्लक आहे. म्हणूनच साहित्यातून देशीयता प्रकट होणे, साहित्याने देशीवादी होणे त्यांना महत्त्वाचे वाटते. त्यांनी अभिजन देशीवाद आणि बहुजन देशीवाद अशी देशीवादाची विभागणी केली आहे.

रंगनाथ पठारेंशिवाय कपिल कपूर यांनीही देशीवादाच्या चर्चेत भर घातली आहे. त्यांनी 'समरहिल आय.ए.एस. रिव्ह्यूमध्ये भालचंद्र नेमाडे यांच्या 'Nativism' (२००९, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ ॲडशन्स स्टडीज, शिमला) या पुस्तकावरील परीक्षणातून विस्तृत भूमिका मांडली आहे.

या पुस्तकाचे परीक्षण करताना कपिल कपूर यांनी भालचंद्र नेमाडे आणि त्यांच्या देशीवादी सिद्धांताने भारतातील विद्यापीठीय जगतातील भाषा, समाजशास्त्र इ. विभागांमध्ये बरीच उत्सुकता निर्माण केल्याची कबुली दिली आहे. कपिल कपूर यांची ब्राह्मणवादाविषयीची भूमिका नेमाडेंच्या मांडणीला छेद देणारी आहे. ती काहीशी पठारे म्हणतात त्या अभिजन देशीवादाकडे झुकणारी आहे. काही मतभेद असूनही कपूर यांच्या मते नेमाडेंनी देशीवादाची मांडणी अत्यंत प्रभावीपणे मांडली आहे आणि ती आवश्यकच होती. त्यांची भूमिका मान्य असणारे अनेक विचारवंत आणि अभ्यासक असल्याचे सुतोवाचही ते करतात. नेमाडेप्रणीत देशीकरणातून एक अत्यंत आशावादी चित्र भारतीय साहित्य-समीक्षा आणि वैचारिक क्षेत्रात निर्माण झाले असल्याचे ते म्हणतात.

आय.आय.टी. कानपूर येथे साहित्य अकादमीच्या वतीने झालेल्या देशीवादावरील चर्चासत्रात राजी शेठ यांनी "Nativism an area of Introspection' या निबंधात 'देशीवाद म्हणजे आपल्या मुळांकडे परत जाणे. म्हणजेच वसाहतकाळात नष्ट झालेल्या स्वत्वाची जाणीव होणे,' असे म्हटले आहे. याशिवाय अनेक विचारवंत अभ्यासकांनी देशीवादाच्या चर्चेत सहभाग नोंदवला आहे. राजन गवस, अशोक बाबर यांनी या चर्चेत मोलाची भर घातली आहे.

**देशीवादावरील आक्षेपांची चर्चा :**

भालचंद्र नेमाडेंच्या देशीवादी सिद्धांताची चर्चा अनेक अभ्यासकांनी केली आहे. रा. भा. पाटणकर, हरिश्चंद्र थोरात, विलास सारंग, म.सु.पाटील यांनी प्रामुख्याने नेमाडेंच्या आणि देशीवादाच्या मर्यादा दाखविण्याचा प्रयत्न केला आहे किंवा हा सिद्धांतच नाकारला आहे. या अभ्यासकांची भूमिका तात्त्विक पातळीवर देशीवादाच्या आधुनिकतेच्या विरोधी भूमिकेसंदर्भात आहे. नेमाडे यांच्या भूमिकेवर हिंदुत्ववादी मांडणीला पूरक विचार असल्याचाही आक्षेप नोंदवला जातो. नेमाडे यांच्या देशीवादी मांडणीत जातसंस्था आणि जात व्यवस्थेसंदर्भातील मांडणी आहे. नेमाडेंचा कल जातिव्यवस्था टिकवण्याकडे आहे. त्यामुळेच शरद पाटील आणि रावसाहेब कसबे यांनी देशीवादाची परखड चिकित्सा करण्याचा प्रयत्न केला आहे.

**शरद पाटील यांचे आक्षेप :**

परामर्श (खंड ११, अंक१, मे १९९६) या अंकात वासुदेव सावंत यांनी पर्यायी सौंदर्यशास्त्राच्या दिशेने (भालचंद्र नेमाडे आणि शरद पाटील यांचा साहित्य विचार) हा लेख लिहिला होता. त्या लेखावर प्रतिक्रिया देताना शरद पाटील यांनी नेमाडेंच्या देशीवादी भूमिकेची चर्चा केली आहे. परामर्शच्या अंकात वासुदेव सावंत यांनी आपले सौंदर्यशास्त्र एकवर्गीय जाणिवेच्या मर्यादेत अडकले असून साहित्याकडे पाहण्याचा नवा परिप्रेक्ष्य आवश्यक आहे. त्या दृष्टीने शरद पाटील यांचे अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र आणि नेमाडेंची नव्या मांडणीतून नवा परिप्रेक्ष्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न झाला असल्याचे विवेचन केले होते. या पार्श्वभूमीवर शरद पाटील काय म्हणतात ते पाहावे लागते.

शरद पाटील यांची भारतीय जातिव्यवस्था आणि जातीभेदाच्या विषयीची मांडणी अभ्यासकांना ज्ञात आहे. भारतातील सगळ्याच समस्यांचे मूळ जातिव्यवस्थेत आहे, असे त्यांचे मत होते. आजचा भारतीय समाज जातीवर्गीय झालेला असून त्याच्या दारिद्र्याचे कारण आर्थिक नसून सामाजिक आहे. वर्गीय नसून जातीय आहे, असे ते मानत. या विरुद्ध नेमाडे जातिव्यवस्थेला भारतीय समाजाचे पायाभूत सत्य मानतात, पण त्यांना जातिव्यवस्था आणि जातीयता हे

दोन ध्रुव वाटतात. शरद पाटलांना नेमाडेंचीही भूमिका पसंत नाही. त्यांच्या मते जातिव्यवस्था राहावी असे वाटून तिचे वास्तव मानणारा जातीविरुद्ध जातीअंताविरुद्ध लढू शकत नाही. जातिव्यवस्था आणि जातीयता यात फरक करता येत नाही, असे पाटलांना वाटते. धर्म आणि धर्मांधता यात फरक करता येतो, तसा जातिव्यवस्था व जातीयतेत करता येत नाही, धर्म ही शोषण शासनाची भौतिक व्यवस्था नाही तर वैश्विक व वैचारिक व्यवस्था आहे. वर्णव्यवस्था व जातिव्यवस्था या शोषणाच्या भौतिक व्यवस्था आहेत. असे शरद पाटलांना वाटते. जातीयता हा जातिव्यवस्थेचा गुणधर्म आहे आणि नेमाडे नेमकी याच्या विरोधात भूमिका घेतात. जातिव्यवस्था अपरिहार्यपणे जातीवादी असते असे नेमाडेंप्रणीत देशीवादाला वाटत नाही.

नेमाडे यांचा भारतीय साहित्यशास्त्र व पाश्चिमात्य सौंदर्यशास्त्राचा अभ्यास असला, तरी भारतीय तत्त्वज्ञानाचा विशेषतः बौद्ध तत्त्वज्ञानाचा अभ्यास नाही. ते जातक कथांचा उल्लेख करतात, पण वज्रसूची आणि महाकवी अश्वघोष यांचे नावही घेत नाहीत आणि भारतीय इतिहासातील वर्णजात, स्त्रीदास्य विरोधाचा सर्वांत प्रभावी प्रेरक असलेल्या तंत्राला व त्याच्या साहित्याला अनुल्लेखित ठेवतात म्हणून नेमाडे यांची मांडणी ब्राह्मणी सौंदर्यशास्त्राचा पर्याय होऊ शकत नाही. नेमाडे आपली अब्राह्मणी देशीयता घेऊन सौंदर्यशास्त्राच्या स्वयंवर-मंडपात शिरतात व तिथेच थांबतात असे शरद पाटलांना वाटते. इथे एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे ती ही की शरद पाटील नेमाडेंची देशीवादी भूमिका नाकारत नाही. ती त्यांना अब्राह्मणीच वाटते. मतभेद जातिव्यवस्थेच्या मांडणीबाबतचा आहे.

**रावसाहेब कसबे आणि देशीवाद :**

अलीकडच्या काळात देशीवादाच्या सैद्धांतिक चर्चेपेक्षा नेमाडे यांनी जातव्यवस्थेसंदर्भात घेतलेल्या भूमिकेचीच चर्चा मोठ्या प्रमाणात होते आहे. रावसाहेब कसबे यांनीही नेमाडेंच्या देशीवादाची चिकित्सा करण्यासाठी बहुधा त्यांच्या जातिव्यवस्थेविषयक मतांमधूनच प्रेरणा घेतली असावी असे दिसते. त्यांनी देशीवादाची चिकित्सा करण्यासाठी 'देशीवाद', 'समाज आणि साहित्य' हा ४५९ पृष्ठांचा ग्रंथच लिहिला आहे. केवळ मराठीच नाही तर एकूण भारतीय भाषेतून एखाद्या सैद्धांतिक मांडणीची चिकित्सा करणारा अशा प्रकारचा ग्रंथ लिहिण्याची अशी घटना अपवादात्मकच असावी. 'देशीवादासारख्या चिल्लर गोष्टींवर उगाच वेळ वाया का घालवता? तुम्ही देशीवादावर लिहिणे म्हणजे देशीवादाला विनाकारण मोठे करणे आहे.' (मनोगत) असे सल्ले मिळूनही रावसाहेब कसबे यांनी हा ग्रंथ लिहिला. ही मराठी विचारविश्वासाठी मोठी गोष्ट आहे.

'देशीवाद : समाज आणि साहित्य' हा ग्रंथ लिहिण्यामागील पार्श्वभूमी सांगताना रावसाहेब कसबे म्हणतात. 'टीकास्वयंवर' या संग्रहावरून नेमाडे यांना काय म्हणायचे आहे ते स्पष्ट होत नव्हते. २०१५मध्ये ज्ञानपीठ मिळाल्यानंतर त्यांनी केलेल्या भाषणांमधून आणि मुलाखतींमधून स्पष्टता आली. पुण्याच्या सर परशुराम भाऊ महाविद्यालयातील विस्तृत भाषणांमधून ती कळली. त्या भाषणातील जातिव्यवस्था, धर्मनिरपेक्षता, स्त्रीमुक्ती चळवळ या विषयीची मते रावसाहेब कसबेंना आक्षेपार्ह वाटली आणि त्यातून ते हा ग्रंथ लिहिण्यास सिद्ध झाले. रावसाहेब कसबे यांचे मनोगत वाचून शरद पाटील आणि त्यांचे आक्षेपाचे काही मुद्दे समान आहेत हे लक्षात येते. फरक एवढाच की शरद पाटील यांना नेमाडेंची जातिव्यवस्था विषयक भूमिका १९९६लाच कळली होती आणि कसबेंना ती २०१५ला कळाली. शरद पाटील यांनी आपली भूमिका केंद्र ढळू न देता मांडली आहे. रावसाहेब कसबे मात्र 'देशीवाद : समाज आणि साहित्य' या पुस्तकाचे लेखन करताना केंद्रापासून खूप दूर गेले आहेत असे जाणवत राहते. त्यामुळे देशीवादाच्या जोरकस सैद्धांतिक प्रतिवादाची अपेक्षा पूर्ण होत नाही. उलटपक्षी पुस्तकातील अनेक उल्लेख आणि विधानांवरून या चर्चेला सैद्धांतिक मांडणीऐवजी व्यक्तिगत स्वरूप प्राप्त होते.

एकूण मराठी वाङ्मयविश्वात आजतरी चर्चेच्या केंद्रस्थानी 'देशीवाद' आणि नेमाडे आहेत व दीर्घ काळ दलित साहित्य आणि देशीवाद चर्चेत राहतील असे दिसते.

**संदर्भ :**


- नेमाडे भालचंद्र, 'टीकास्वयंवर', साकेत, औरंगाबाद, (१९९०)
- नेमाडे भालचंद्र, 'निवडक मुलाखती', लोकवाङ्मयगृह (२००८)
- नेमाडे भालचंद्र, 'सोळा भाषणे'
- पठारे रंगनाथ, 'जागतिकीकरण आणि देशीवाद', लोकवाङ्मयगृह, मुंबई २००३
- कसबे रावसाहेब, 'देशीवाद समाज आणि साहित्य', लोकवाङ्मयगृह, मुंबई २०१६
- Nemade Bhalchandra, 'Nativism', IIAS, Shimala, 2009
- Paranjape Makrand, 'Nativism Essays in Criticism, Sahitya Aademi, 1997


●


**भास्कर ढोके**

चलभाष : ९४२३०८१०४६



लेख

किशोर बेडकिहाळ

# नवदर्शनाच्या प्रतीक्षेत पुरोगामी विचारविश्व

■ ■

**हिंदुत्ववादाचा प्रतिवाद, समाजवाद, गांधीवाद, मार्क्सवाद, फुले-आंबेडकरवाद, स्त्रीवाद, रॉयवाद या प्रकारच्या गृहीत भूमिकांमधून जसे लेखन नव्वदोत्तर पुरोगामी विचारविश्वामध्ये दिसते, तसेच नव्या सामाजिक चळवळी, परिवर्तनवादी विविध चळवळी, धर्मचिकित्सा या संबंधीचे लेखनही दिसते. भाष्यकार व मूलगामी चिंतनपर अशी विभागणी कमी दिसते. किंवहुना मूलभूत चिंतनपर दर्शनात्मक लेखन जवळपास अदृश्य वाटावे इतके कमी आहे. नव्वदोत्तरी पुरोगामी विचारविश्वाचा या व अशा परिस्थितीत आढावा या लेखात घ्यावयाचा आहे.**

■ ■

**स्वा**तंत्र्यपूर्वकाळ ते साठोत्तर काळापर्यंत मराठी साहित्यविश्वापेक्षा मराठी विचार विश्व अधिक रसरशीत होते. १९५० आधी हिरिरीने खेळले गेलेले वादविवाद. त्यातून निर्माण झालेले वैचारिक ग्रंथांचे विश्व व आजची पुरोगामी विचारविश्वाची स्थिती यात खूपच फरक जाणवतो. तुटक, आंशिक, प्रासंगिक, वैचारिक लेखनावर आज भर दिसतो. त्याला प्रासंगिक कारणेही असतातच. एकेका विषयाला धरून मोठ्या ग्रंथांची निर्मिती आज कमी दिसते. त्याऐवजी लेखसंग्रहांवर भर जास्त दिसतो. साठोत्तर विचारविश्वाप्रमाणे नव्वदोत्तर विचारविश्वात ही राजकीय-आर्थिक-सामाजिक प्रश्नांवर लेखन विषयात प्राधान्य दिसते. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचे अधिष्ठानही पुरोगामी विचारविश्वात उपस्थित आहेच. त्याचाही प्रभाव वैचारिक लेखनावर आहेच. १९५०पर्यंत ज्या तऱ्हेच्या विचारवंत भाष्यकारांची परंपरा महाराष्ट्राच्या पुरोगामी विचारविश्वात दिसत होती व ज्याप्रकारे १९७०पर्यंत नियतकालिकात वादविवाद दिसायचे, त्याचे स्वरूप व आजच्या वादांचे स्वरूप यात मूलतः अंतर पडले आहे. हिंदुत्ववादाचा प्रतिवाद, समाजवाद, गांधीवाद, मार्क्सवाद, फुले-आंबेडकरवाद, स्त्रीवाद, रॉयवाद या प्रकारच्या गृहीत भूमिकांमधून जसे लेखन नव्वदोत्तर पुरोगामी विचारविश्वामध्ये दिसते, तसेच नव्या सामाजिक चळवळी, परिवर्तनवादी विविध चळवळी, धर्मचिकित्सा या संबंधीचे लेखनही दिसते. भाष्यकार व मूलगामी चिंतनपर अशी विभागणी कमी दिसते. किंवहुना मूलभूत चिंतनपर दर्शनात्मक लेखन जवळपास अदृश्य वाटावे इतके कमी आहे. नव्वदोत्तरी पुरोगामी विचारविश्वाचा या व अशा परिस्थितीत आढावा या लेखात घ्यावयाचा आहे. नव्वदोत्तरी पुरोगामी विचारविश्वात तुलनेने बरेच नवीन तरुण अभ्यासकांची भर ठळकपणे दिसते. लेखनाचे स्वरूप प्रासंगिक असले तरी संख्येने पुष्कळ आहे. त्यामुळे नव्वदोत्तरी पुरोगामी विचारविश्वाचा अत्यंत व्यापक सर्वसमावेशक व सर्व लेखनाला न्याय देणारा आढावा घेणे ही प्रस्तुत लेखकाच्या आवाक्यातली गोष्ट नव्हे. सर्वच सर्व लेखन मी पाहिलेले नाही. त्यामुळे प्रवाह आणि निरीक्षणाच्या रूपाने हा आढावा सादर करण्याचा मानस आहे. याच्या परिणामी अनेकांचा नामनिर्देश न झाल्यास वा राहिल्यास आधीच दिलगिरी व्यक्त करतो.

स्वातंत्र्यपूर्वकाळापासून ते जवळपास सत्तरच्या दशकाअखेरपर्यंत ज्या विचारवंत-अभ्यासकांनी पुरोगामी विचारविश्व व्यापले होते त्यातली प्रमुख तत्त्वे अशी- तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. अ. डांगे, पां. वा. गाडगीळ, वा. दा. मुंडले, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, च. वि. बावडेकर, व. भ. कर्णिक, द्वा. भ. कर्णिक, वि. मु. भुस्कुटे, एस. वाय. कोल्हटकर, गं. बा. सरदार, दि. के. बेडेकर, ना. ग. गोरे, मधु लिमये, विनायकराव कुलकर्णी, नरहर कुरुंदकर, भा. शं. भणगे, दि. य. देशपांडे, मे. पु. रेगे, स. भि. शहा, बाबा आडाव, व्ही. डी. देशपांडे, श्री. ग. माजगावकर, यदुनाथ थत्ते, बगाराम तुळपुळे, शांताराम गरूड, श्री. ग.





अनुक्रमणिका






सरदेसाई, शरद पाटील, वसंत पळशीकर, गो. पुं. देशपांडे, ना. म. डोळे, राम बापट, मे. पुं. रेगे, देवदत्त दाभोलकर, माधव लिमये, पन्नालाल सुराणा, प्रा. जनार्दन वाघमारे, दिवाकर मोहनी, गो. मा. पवार, सेतुमाधवराव पगडी, द. वा. पोतदार, न. र. फाटक, शेजवलकर, सदाशिव आठवले, श्रीनिवास दीक्षित, ग. ह. खरे, वि. आ. कानोले, देवीसिंग चौहान, स. रा. गाडगीळ, म. अ. मेहेंदळे, डॉ. रा. चिं. ढेरे, वि. भि. कोलते, गो. म. कुलकर्णी, प्रभाकर पाध्ये, निर्मलकुमार फडकुले, श. भा. पाटणकर, नलिनी पंडित, पुष्पा भावे, हमीद दलवाई, अशी खूप मोठी नामावली पुरोगामी विचारविश्वात कार्यरत होती. काळाच्या ओघात यातील बरेच जण कालवश झाले. तरीही यातील काही नव्वदोत्तर विचारविश्वात काही काळ कार्यरत दिसतात. त्यात राम बापट, मे. पुं. रेगे, देवदत्त दाभोलकर, वसंत पळशीकर, गो. मा. पवार, श्रीनिवास दीक्षित, म. अ. मेहेंदळे, नलिनी पंडित, रा. भा पाटणकर, य. दि. फडके, शरद पाटील इ. नव्वदोत्तर पुरोगामी विश्वात आजही या पिढीतले दिवाकर मोहनी, पन्नालाल सुराणा कार्यरत आहेत. १९८०च्या दशकापासून पुरोगामी विचारविश्वात नवीन अभ्यासकांची भर पडली. त्यात डॉ. आ. ह. साळुंखे, अशोक चौसाळकर, भा. ल. भोळे, यशवंत सुमंत, सुहास पळशीकर, राजेंद्र व्होरा, हरी नरके, सदानंद मोरे, गोपाळ गुरू, राजीव साने, आनंद तेलतुंबडे, नरेंद्र दाभोलकर, किशोर बेडकिहाळ, मेधा पाटकर, संजय संगवई, गजानन खातू, प्रकाश बाळ, शांताराम पंदेरे, रेखा ठाकूर, रणजित परदेशी, श्रीपाल सबनीस, सु. श्री. पंढरीपांडे, मुरलीधर पवार, रावसाहेब कसवे, सुधाकर गायकवाड, राजा ढाले, भारत पाटणकर, सुधीर बेडेकर, राजा जाधव, यशवंत मनोहर, जयसिंगराव पवार, उल्का महाजन, प्रकाश बाळ, सतीश कामत, भालचंद्र मुणगेकर, जयदेव डोळे, निळू दामले, निखिल वागळे, फकरुद्दीन बेन्नूर, कुमार केतकर, विद्युत भागवत, सरोज कांबळे, शर्मिला रेगे, वंदना भागवत, विद्या बाळ, गीताली वि.म., मंगला आठलेकर, डॉ. प्रकाश पवार, राहूल कोसंबी, रणधीर शिंदे, विनय हर्डीकर, विनोद शिरसाट, प्रतिमा परदेशी, दत्ता देसाई, करुणा गोखले, हेमंत कर्णिक, माधव गोडबोले, डॉ. एन. डी. पाटील, कुमार शिरोळकर, डॉ. टी. एस. पाटील, चैत्रा रेडकर, सदा डुंबरे, प्रभाकर वैद्य, नागोराव कुंभार, अवनीश पाटील, डॉ. भारती पाटील, लता प्र. म. अरुण कांबळे, संध्या नरे-पवार, निशा शिऊरकर, संजीव चांदोरकर, रमेश पाध्ये, मिलिंद मुरुगकर, अरुण ठाकूर, मा. मो. देशमुख, पार्थ पोळके, दिलीप चव्हाण, वंदना सोनाडकर, शांताराम पंदेरे, देवेंद्र इंगळे, सुरेंद्र जोंधळे, डॉ. राजा दीक्षित, सचिन गरुड, श्रुती तांबे, संजय कोळेकर, राजेश्वरी देशपांडे, सुहास कुलकर्णी, शारदा साठे, डॉ. नीरज हातेकर, माधव दातार, डॉ. शैलेंद्र खरात, डॉ. विवेक घोटाळे, विश्वास दांडेकर, डॉ. शिवाजी पाटील, डॉ. भारती पाटील, गिरीश कुबेर, डॉ. राजा दीक्षित, डॉ. विलास खोले.

वरील अभ्यासकांच्या यादीतून काही नावे वगळली गेली असल्याची शक्यता मी गृहीत धरतो. वरील यादीवरून नव्वदोत्तरी पुरोगामी विचारविश्वाचे वैविध्य लक्षात येईल. इथे 'पुरोगामी' हा शब्द डाव्या विचारांच्या सर्व छटा असा घेतला आहे व सामाजिक दृष्ट्या पुरोगामी व विकासाची भूमिका सर्वसमावेशक असणारे असे काही अभ्यासकही यात घेतले आहेत.

या सगळ्या लेखक-अभ्यासकांच्या लेखनाचा आढावा इथे घेणे अशक्य आहे. त्याऐवजी त्यांच्या लेखनाचे प्रकार पाडून त्यातील निवडकांचा उल्लेख केला आहे. फुटकळ, प्रासंगिक लेखन यातील अनेकांचे आहे, ते वगळता ग्रंथरूपाने ज्यांनी नव्वदोत्तरी विचारविश्वात ठसा व वेगळेपण उतरवला आहे असे अभ्यासक, ज्यांनी भाषांतराद्वारा पुरोगामी विचारविश्वात भर घातली असे अभ्यासक, ज्या नियतकालिकांनी पुरोगामी विचारविश्व घडवले ती नियतकालिके, ज्यांनी हे लेखन प्रसिद्ध केले अशी प्रकाशनगृहे, महत्त्वाची संपादने ज्यांनी केली ते संपादक, संदर्भयोग्य झालेले गौरवग्रंथ, ज्या संमेलनांनी पुरोगामी वैचारिक अभ्यासकांना व्यासपीठ दिले व नवे अभ्यासक दिले अशी संमेलने व याशिवायच्या उपक्रमातून निर्माण झालेले लेखनविश्व यांचा थोडक्यात परामर्श इथे घेतला आहे. या सगळ्या आढाव्यातून साहित्य-समीक्षा वगळली आहे.

नव्वदोत्तर पुरोगामी चर्चा विश्वातील महत्त्वाच्या अभ्यासकांमध्ये डॉ. आ. ह. साळुंखे व डॉ. य. दि. फडके हे जास्तीत जास्त ग्रंथ संख्या नावावर असणारे अभ्यासक संशोधक आहेत. डॉ. फडके यांनी संशोधन हाच आपल्या लेखनाचा मुख्य गाभा ठरवला होता. १९व्या शतकातील महाराष्ट्रातील प्रमुख व्यक्तिमत्त्वांविषयक संशोधन व विसाव्या शतकातील महाराष्ट्राचा राजकीय इतिहास, ब्राह्मणेतर चळवळीचे संशोधक व वाङ्मय संपादन ही त्यांच्या लेखनकार्याची प्रमुख उपलब्धी. बहुतांश पुरोगामी कार्यकर्त्यांना व चळवळींना त्यांच्या संशोधनातून उपकारक असे संदर्भ मिळाले व एकूणच समाज वाढण्यास त्यांची मदत झाली.

डॉ. आ. ह. साळुंखे यांच्या लेखन प्रकल्पाचे स्वरूप निराळे आहे. १९व्या शतकात म. फुल्यांनी जो लेखनप्रपंच केला, त्यात प्रामुख्याने शूद्र-अतिशूद्र व स्त्रियांच्या प्रबोधनाला महत्त्व होते. ब्राह्मणेतर बहुजन समाजाला धर्म-सांस्कृतिक दृष्ट्या कसे वागवले जाते, धर्मशास्त्रांनी त्यांच्यावर कसा अन्याय केला अहे, याची सविस्तर मांडणी फुल्यांनी केली व त्यातून बहुजन चळवळीला जन्म मिळाला. फुल्यांचा हाच प्रबोधनाचा प्रकल्प आहे- साळुंखे यांनी अधिक विस्तृततरीत्या व धर्मग्रंथ, परंपरा यांच्या विपुल संशोधनाद्वारा व्यापक केला. त्यांच्या ग्रंथांच्या नावावर जरी नजर टाकली तर याचा प्रत्यय

येईल. डॉ. आ. ह. साळुंखे यांच्या लेखनाने परिवर्तनवादी चळवळीला व कार्यकर्त्यांना परंपरेचे अनेक पदर उलगडायला त्यायोगे स्वतःच्या परंपरांना तपासायला मदत झाली. संत तुकाराम महाराजांच्या कार्याचा, व्यक्तिमत्त्वाचा एक वेगळा अन्वयार्थ डॉ. साळुंखे यांनी लावला. डॉ. साळुंखे यांच्या वाचकवर्गात बहुजन वाचकांची मोठी संख्या आहे. या समूहाला आपल्या सांस्कृतिक स्थानाची ओळख साळुंख्यांच्या लेखनातून मिळाली. साळुंखे यांच्या लेखनासंदर्भात अनेकांशी त्यांचा वादही झाला. (उदा. साळुंखे-मोरे, साळुंखे-पळशीकर, साळुंखे-दीक्षित, साळुंखे-निपाणीकर) आपल्या लेखनाच्या उत्तर काळात गौतम बुद्धाचे चरित्रही त्यांनी लिहून 'समते'च्या अंतिम दिशेकडे बहुजनांची वाटचाल व्हावी असा संदेश दिला. नव्वदोत्तरी पुरोगामी चर्चा विश्वात डॉ. साळुंखे यांचे स्थान म्हणूनच महत्त्वाचे राहिले.

नव्वदोत्तरी चर्चाविश्वात महाराष्ट्राच्या इतिहासाचा एक वेगळा प्रकल्प डॉ. सदानंद मोरे यांनी सुरू केला. संत तुकारामांबद्दलचे डॉ. मोरे यांचे विवेचन लक्षात घेता व इतिहासाची मांडणी लक्षात घेता. तुकाराममकेंद्रित महाराष्ट्राच्या इतिहासाची मांडणी हे मोरे यांच्या प्रकल्पाचे वेगळेपण आहे. महाराष्ट्राच्या राजकारणातील 'लोकमान्य ते महात्मा' या स्थित्यंतराचा मागोवाही डॉ. मोरे यांनी द्विखंडी ग्रंथातून घेतला. महाराष्ट्रावरील त्यांचे लेखन एकोणिसाव्या शतकाच्या व विसाव्या शतकाचा अनुबंध जोडत जाणारे आहे. मराठ्यांच्या इतिहासातील राष्ट्रीय पातळीवर स्थान मिळवून देण्याचा त्यांचा प्रयत्न व संशोधनही वेगळे म्हणावे लागेल.

आपल्या फुटकळ, प्रासंगिक लेखांच्या संग्रहाचे पुस्तक करण्याऐवजी सलग विषयावरचे मोठे ग्रंथ लिहिणे हे प्रा. रावसाहेब कसबे यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य राहिले आहे. साधारणतः १९८०नंतर रावसाहेब कसबे यांचे पाच मोठे ग्रंथ प्रयोग मी विचारविश्वात महत्त्वाचे ठरवले आहेत. मार्क्स आणि आंबेडकरांची पूरकता ह्या पुरोगामी चळवळीच्या गरजेस रावसाहेबांनी मार्क्स आणि आंबेडकर आणि मार्क्स लिहून सैद्धान्तिक स्वरूप दिले. परिवर्तनवादी चळवळीची गरज म्हणून काही प्रतिक्रियात्मक ग्रंथही रावसाहेबांनी लिहिले. शेषराव मोरेंच्या सावरकरांचा प्रतिवादार्थ सावरकर आणि हिंदू-मुस्लीम प्रश्न, नेमाडेंच्या देशीवादाच्या प्रतिवादार्थ 'देशीवाद आणि मराठी साहित्य' हा ग्रंथ या संदर्भात दाखवता येईल. प्रतिक्रिया वा प्रासंगिकता बाजूला ठेवून चिंतनात्मक ग्रंथही कसब्यांनी लिहिले. धर्म या मानवी जीवनातल्या मूलभूत प्रेरणेसंदर्भात त्यांनी त्रिखंडात्मक लेखन करून भरीव कामगिरी केली आहे. अशा अभ्यासकाची गांधींशी गाठ न पडली तरच नवल. सध्या ते गांधींसंदर्भात वाचत आहेत व लिहिणार असल्याचे वृत्त आहे. या त्यांच्या ग्रंथाचे कुतूहल दलित चळवळीच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरेल.

कुमार केतकर व राजीव साने या दोघांचे लेखन 'बदलते विश्व', 'युगांतर' अनुभवले, हे बदलत्या समाजाचे प्रातिनिधिक ठरावेत असे आहेत. रा. भा. पाटणकरांचा 'अपूर्ण क्रांती' हा ग्रंथही नव्वदीच्या नंतरचा अतिशय महत्त्वाचा ग्रंथ आहे. आधुनिकतेची बाजू त्यांनी उत्तम प्रकारे मांडली आहे. शरद पाटलांनी समग्र दृष्टीचा अवलंब करीत भारतीय इतिहासाचा जो उलगडा केला आहे, तो नव्वदोत्तर विचारविश्वातला सर्वोच्च महत्त्वाचा आविष्कार आहे. मार्क्स-फुले-आंबेडकर यांचा सैद्धान्तिक समन्वय करणारे ते आचार्य जावडेकरांनंतरचे दुसरे लेखक. जावडेकरांनी मार्क्स-गांधींच्या समन्वयाचा प्रयत्न केला. स्वातंत्र्योत्तर काळातील पुरोगामी विचारविश्वात शरद पाटील व जावडेकर हे दोनच विचारवंत या दृष्टीने एका नवदर्शनाचा प्रयत्न करताना दिसतात. नव्वदोत्तर विचार विश्वातली विशेष उल्लेखनीय (पण निवडक) पुस्तकांची नोंद घ्यायला हवी. यात दत्ता देसाईंचे युरोपियन आधुनिकतेचा इतिहास, गो. पु. देशपांडे यांची रहिमतपूरकरांची निबंधमाला व चर्चक निबंध, राहुल कोसंबी या तरुण अभ्यासकाचे 'उभे-आडवे', गांधी व आंबेडकर ही ऐतिहासिक दृष्टीने विवेचन करणारी पुस्तके, अरुण साधूंचे 'तिसरी क्रांती', श्रीराम गुंदेकरांचे लेखन, जनार्दन वाघमारे यांची ग्रंथसंपदा, सुधाकर गायकवाड या अत्यंत महत्त्वाच्या अभ्यासकाचे 'माणूस, त्याचा समाज व त्यातील बदल' हा डॉ. आंबेडकरांच्या विचारांचा इतर शास्त्रातील विचारांच्या अनुषंगाने वेध घेणारा ग्रंथ, प्रकाश बाळ यांचा 'परामर्श', नरेंद्र दाभोलकरांचा 'तिमिरभेद', मंगला आठलेकरांचा 'धर्म आणि हिंसा', विद्युत भागवतांचा 'स्त्री प्रश्नाची वाटचाल', सदा डुम्बरे यांचा 'प्रतिबिंब', फक्रुद्दीन बेन्नूरांचे मुस्लीम राजकारणाचे तीन ग्रंथ, सुहास पळशीकरांचे भारतीय राजकारण विषयक व जमातवादविषयक लेखन, प्रकाश पवारांचे 'भारतीय राजकारण आणि नेतृत्वाची वाटचाल', संध्या नरे-पवारांची 'तिची भाकरी कोणी चोरली' व 'डाकीण', गीताली वि.मं.चे 'स्त्रीप्रश्न सोडवताना', अतुल देऊळगावकरांचे 'विश्वाचे आर्त', हेमंत कर्णिकांचे 'नक्षलवादाची कोंडी', डॉ. अशोक चौसाळकरांचे नवराष्ट्र व मार्क्सवाद- उत्तर मार्क्सवाद, डॉ. भा. ल. भोळे यांची संदर्भ दलित चळवळीचा, समाजविमर्श, शे.का.प., आंबेडकरांचा वैचारिक वारसा, म. फुल्यांचा वैचारिक वारसा, ही पुस्तके, गोविंद पानसरे यांचे छ. शिवाजीमहाराजांवरील पुस्तक. पन्नालाल सुराणा यांचे 'म. गांधी व दलित समस्या', संजीव चांदोरकरांचे अर्थविषयक लेखन, डॉ. उमेश बगाडे यांचे 'जात, वर्ग व महाराष्ट्रातील प्रबोधन, सु. री. पंढरीपांडे यांचे 'अन्वय', भारत पाटणकरांच्या समग्र साहित्याचे दोन खंड व सरोज कांबळे यांचे स्त्री प्रश्नावरील लेखन, डॉ. यशवंत सुमंत यांचे 'गांधींची विचारसृष्टी, काही अलक्षित पैलू', गजानन खातूंची 'जागतिकीकरण व भारत', आनंद तेलतुंबडे यांचे

'साम्राज्यविनाश व जातीअंत', के. रं. शिरवाडकरांची पुस्तके, प्रदीप पुरंदरे व विजय दिवाण यांची पाणी प्रश्नांवरची पुस्तके, दत्तप्रसाद दाभोलकरांचे 'माते-नर्मदे', करुणा गोखले यांचे 'बाईमाणूस', डॉ. राजा दीक्षित यांचे (संशोधनपर) '१९व्या शतकातील महाराष्ट्रातील मध्यमवर्ग', निशा शिऊरकरांचे परित्यक्ता स्त्रियांच्या प्रश्नावरील पुस्तक, माधव गोडबोले यांचे 'जवाहरलाल नेहरूंच्या उत्तुंग नेतृत्वाचे सिंहावलोकन करणारे पुस्तक, डॉ. सत्यरंजन साठे व न्या. नरेंद्र चपळगावकरांची राज्यघटनेला अर्धशतक झाले त्यानिमित्त घटनेचा आढावा घेणारी पुस्तके, शरणकुमार लिंबाळे यांचे 'भारतीय रिपब्लिकन पक्ष व प्रज्ञा सूर्य', डॉ. हरि नरके यांचे संशोधनपर लेखन, डॉ. अरुणा ढेरे यांचे 'विवेक आणि विद्रोह', डॉ. सुधीर रसाळांचे वाङ्मयीन संस्कृती', श्रीपाल सबनीसांचे 'संस्कृतीची तिसरी समीक्षा' अशा काही विशेष पुस्तकांचा उल्लेख करावा लागेल.

नव्वदोत्तरी पुरोगामी विश्वात काही महत्त्वाची भाषांतरेही झाली आहेत. शारदा साठेकृत 'गांधीनंतरचा भारत', रामचंद्र गुहा, अमर्त्य सेन यांचे 'वाद-संवादप्रिय भारतीय', वसंत पळशीकरकृत बी. आर. नंदांचे गोखलेचरित्र, अशोक मोकाशीकृत नेल्सन मंडेलांचे आत्मचरित्र, करुणा गोखले यांचे एम. जे. अकबरकृत नेहरू चरित्र, व बर्ट्रांड रसेलच्या Conquest of Happiness चे भाषांतर (सुखी माणसाचा सदरा) व सिमान द बोवाच्या सेकंड सेक्सचे भाषांतर, जयंत लेलेंच्या विचारप्रणालीच्या इतिहासातील टप्पे, हे पा. वाटसरूच्या चमूने केलेले भाषांतर, वंदना भागवतकृत मंटोच्या पुस्तकाचे भाषांतर, सतीश कामतकृत राजमोहन गांधींच्या यांच्या Understanding the founding fathers चे 'यांनी घडवला भारत' हे भाषांतर, डॉ. आ. ह. साळुंखेकृत एरिकच्या Art of Loving 'प्रेमसाधना' हे भाषांतर, माधव गोडबोले यांच्या फाळणीवरील पुस्तकाचे 'फाळणीचे हत्याकांड' भाषांतर, डॉ. भा. ल. भोळे यांचे नानकचंद दत्तूंच्या आंबेडकरांवरील पुस्तकाचे भाषांतर या भाषांतरांचा विशेष उल्लेख करावा लागेल.

नव्वदोत्तरी विचारविश्वात जशी भर भाषांतराने पडली आहे तशीच काही महत्त्वाच्या संपादकांनीही पाडली आहे. जवळपास ४० वर्षांहून अधिक काळ राजकीय-सामाजिक-आर्थिक-वैज्ञानिक-पर्यावरणीय प्रश्नांवर लिहिणारे विचारवंत, अभ्यासक श्री. वसंत पळशीकर यांच्या निवडक वाङ्मयाचे एकूण चार खंड, (पैकी तीन खंड किशोर बेडकिहाळ यांनी व एक खंड डॉ. भा. ल. भोळे यांनी संपादित केला आहे.) संपादित झाले व अन्य होण्याच्या मार्गावर आहेत. कुरुंदकरांच्या निवडक लेखाचे दोन खंड विनोद शिरसाटांनी संपादित केले असून अन्य खंडही प्रकाशनाच्या वाटेवर आहेत. विनय हर्डिकरांचे 'निवडक श्री. म. माटे' यांचे दोन खंड, प्रा. राम वापटांच्या लेखनाचे डॉ. अशोक चौसाळकरांनी संपादित केलेले तीन खंड, सुधाकर गायकवाडकृत निवडक अस्मितादर्शचे तीन खंड, प्रकाश बाळ व किशोर बेडकिहाळ यांनी संपादित केलेला 'भारतीय राजकीय व्यवस्था' व 'धर्म आणि राजकारण' हे ग्रंथ, मे. पु. रेग्यांच्या लेखनाचे संपादित खंड, मधु मंगेश कर्णीककृत संपादित सांस्कृतिक महाराष्ट्राचे दोन खंड, राजेंद्र कुंभार संपादित निवडक अण्णा भाऊ साठे वाङ्मयाचा खंड, श्री. मा. भावे संपादित शेषराव मोऱ्यांच्या फाळणीवरील पुस्तकांवरील प्रतिक्रियांचा संपादित ग्रंथ, प्रकाश बाळ संपादित एकविसाव्या शतकातील समाजवाद अशा महत्त्वाच्या निवडक अशा संपादनांच्या विशेष उल्लेख करायला हवा.

संपादनांप्रमाणेच गौरव ग्रंथांनीही पुरोगामी विचारविश्वात मौलिक भर घातली आहे. या ग्रंथामधून वेगवेगळ्या राजकीय-सामाजिक प्रश्नांवरील पुरोगाम्यांचे विचार वाचकांना उपलब्ध झाले आहेत. यात प्रामुख्याने पुढील गौरवग्रंथांचा उल्लेख करावा लागेल. डॉ. भा. ल. भोळे व किशोर बेडकीहाळ संपादित 'बदलता महाराष्ट्र' हा डॉ. एन. डी. पाटील गौरव ग्रंथ', डॉ. भा. ल. भोळे संपादित 'संशोधनाची क्षितिजे' हा डॉ. वि. भि. कोलते गौरव ग्रंथ, रावसाहेब कसबे संपादित रावसाहेब शिंदे गौरव ग्रंथ, उत्तम कांबळे संपादित रावसाहेब कसबे गौरव ग्रंथ व कॉ. गोविंद पानसे (जागतिकीकरणाची अरिष्टे) गौरव ग्रंथ, शरद जावडेकर संपादित भा. शं. भणगे गौरव ग्रंथ, डॉ. अशोक चौसाळकर संपादित प्रा. नागोराव कुंभार गौरव ग्रंथ (विचारवंत आणि समाज), प्रा. एकनाथ पाटील संपादित 'जागतिकीकरण आणि वर्तमान आव्हाने' हा प्राचार्य सायनाकर गौरव ग्रंथ, गुरुवर्य शामराव देसाई गौरव ग्रंथ, बेळगाव, १९व्या शतकातल्या सुधारकांची चिकित्सा करणारा 'आधुनिकता आणि परंपरा' हा डॉ. राजेंद्र व्होरा संपादित डॉ. य. दि.फडके गौरव ग्रंथ, प्रा. मनोहर जाधव व श्रीकांत देशमुख संपादित 'समकालीन साहित्यचर्चा' हा नागनाथ कोत्तापल्ले गौरव ग्रंथ, भटक्या विमुक्तांच्या प्रश्नाचा वेध घेणारा व्यंकप्पा भोसले गौरव ग्रंथ, वंदना भागवतांनी संपादित केलेला संदर्भासहित स्त्रीवाद हा विद्या बाळ गौरवग्रंथ. अशा महत्त्वाच्या गौरवग्रंथांचा उल्लेख करावा लागेल.

गौरवग्रंथांप्रमाणेच काही चरित्रग्रंथ, इतिहास साधने अशांचीही भर नव्वदोत्तरी पुरोगामी विचारविश्वात पडली आहे. डॉ. अशोक चौसाळकरकृत कॉ. डांगे चरित्र, गो. मा. पवारकृत विठ्ठल रामजी शिंदे बृहद्चरित्र, गो. मा. पवार व डॉ. रणधीर शिंदे संपादित म. शिंदे वाङ्मयाचे खंड, ब्राह्मणेतर चळवळीच्या अध्वर्यूंच्या समग्र वाङ्मयाचे खंड, (उदा. जवळकर समग्र वाङ्मय, पाळेकर वाङ्मय) आम्ही पाहिलेले फुलेंसारखे संशोधनपर पुस्तक, म. फुले समग्र वाङ्मयाची सुधारित संपादित आवृत्ती अशा काही ग्रंथांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. डॉ. य. दि. फडके यांनी अरुण शौरींच्या आंबेडकरांवरील ग्रंथाचा केलेला प्रतिवादपर ग्रंथ, विलास



अनुक्रमणिका

खोलेकृत रमाबाई रानडे चरित्र, पुरोगामी विचारविश्वात महत्त्वाचा ठरला. चैत्रा रेडकर यांनी लिहिलेले साने गुरुजींचे चिकित्सक व संशोधनपूर्ण चरित्र, जयसिंगराव पवारांचे संशोधित शाहू चरित्र ही विशेष उल्लेखनीय आहे.

नव्वदच्या पूर्वीच्या काही महत्त्वाच्या ग्रंथांची पुनर्मुद्रणेही आता नव्याने येत आहेत. य. गो. जोशींच्या वादविवेचनमालेतील तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशींचे- जडवाद, पा. वा. गाडगीळांचे अराज्यवाद, कॅपिटल सारग्रंथाची संक्षिप्त आवृत्ती, लालजी पेंडसे यांच्या 'महाराष्ट्राचे महामंथन' या संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या इतिहासावरील ग्रंथाचे पुनर्मुद्रण, दि. के. बेडेकरांच्या ग्रंथांची पुनर्मुद्रणे (धर्म, राष्ट्र, समाजवाद विचार यांचा), नरहर कुरुंदकरांच्या पुस्तकांची पुनर्मुद्रणे, हमीद दलवाईंच्या ग्रंथांचे पुनर्मुद्रण, गं. बा. सरदारांच्या 'संत वाङ्मयाची फलश्रुती'चे पुनर्मुद्रण अशी काही उल्लेखनीय पुस्तके पुनर्मुद्रित होताहेत.

पुरोगामी विचारविश्वात नव्वदोत्तरी काळात विचारवेध संमेलने व विद्रोही संमेलनांनी विचारमंथनात भरीव कामगिरी केली आहे. यातूनही अनेक पुस्तकांची निर्मिती झाली आहे. आंबेडकर अकादमीच्या विचारवेध संमेलनांच्या अध्यक्षीय भाषणाचे दोन खंड (डॉ. भा. ल. भोळे व किशोर बेडकिहाळ संपादित), विचार संमेलनातील निवडक निबंधांचा 'शतकांतराच्या वळणावर' हा भोळे-बेडकिहाळ संपादित खंड, शिवाय अनेक संघटनांच्या पुस्तिका उदा. विवेकानंद-साधक की प्रचारक - यशवंत सुमंत, जाती आणि राजकारण - भा. ल. भोळे, शिवसेनेवरील सुहास पळशीकरांची पुस्तिका, आरक्षणावरील अनेक पुस्तिका, जागतिकीकरणावरील विपुल पुस्तिका, विविध प्रश्नांवरील लढ्यांतून निर्माण झालेल्या पुस्तिका या सर्वांनीच पुरोगामी विचारविश्वात महत्त्वाची भर घातली आहे.

पुरोगामी विचारविश्वात 'समाज प्रबोधन पत्रिका', 'परिवर्तनाचा वाटसरू', 'नवभारत', 'सा. साधना', 'आजचा सुधारक', 'पुरोगामी सत्यशोधक' या नियतकालिकांनी अनेक अभ्यासकांना लिहिते केले आहे. त्यातून विविध विचारांचा व भूमिकांचा वाचकांना परिचय झालेला आहे. याशिवाय विविधसंघटनांच्या मुखपत्रातून व प्रासंगिक प्रकाशनातून हा परिवर्तन विचारांचा जागर सुरूच असतो. आचार्य शांताराम गरुडांनी स्थापन केलेल्या समाजवादी प्रबोधिनी ही संस्था गेल्या २५ वर्षांहून अधिक काळ पुरोगामी (प्रबोधन) विश्वात प्रसिद्ध आहे. या संस्थेचे 'प्रबोधन ज्योती' हे नियतकालिकही गेली अनेक वर्षे प्रबोधन पुरोगामी लेखन प्रसिद्ध करत आहे. 'नवभारत' मासिकाने नव्वदोत्तरी काळात अनेक विशेषांक प्रसिद्ध केले ज्यात प्रामुख्याने तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी विशेषांक, रानडे विशेषांक, आचार्य शंकरराव देव, आचार्य जावडेकर, आचार्य विनोबा भावे यांच्यावरील विशेषांक, नर्मदा आंदोलनावरील विशेषांक, भोपाळ दुर्घटनेवरील विशेषांक, राखीव जागा विशेषांक, काँग्रेसच्या शतकोत्तर रौप्य महोत्सवी वर्षातील विशेषांक संयुक्त महाराष्ट्राची पन्नास वर्षे झाल्यावरील विशेषांक, अशांचा उल्लेख करावा लागेल. समाज प्रबोधन पत्रिकेनेदेखील नेहरूंच्या मृत्यूला पन्नास वर्षे पूर्ण झाल्या निमित्ताने नेहरू विशेषांक, आंबेडकरांच्या १२५ व्या जयंतीनिमित्ताने केलेला आंबेडकर विशेषांक, रवींद्रनाथ टागोरांचा १५०व्या जयंतीनिमित्त केलेला टागोर विशेषांक हे वैशिष्ट्यपूर्ण अंक प्रसिद्ध केले. आंबेडकर अकादमीच्या प्रायोजकतेने 'परिवर्तनाचा वाटसरू' या पाक्षिकानेही आंबेडकरांवर दोन विशेषांक प्रसिद्ध केले. सुनीती सु. र. यांच्या संपादकत्वाखाली निघणारे 'आंदोलन' हे मासिकही आपले सातत्य टिकवून आहे. पर्यायी विकासनीतीची मांडणी, आंदोलने व चळवळींचे वृत्तांत यात नियमित प्रसिद्ध होतात. त्याचबरोबर अनेक विशेषांकही प्रसिद्ध झाले आहेत व होताहेत. अंनिसचे वार्तापत्रही नियमित प्रसिद्ध होते. या सर्व नियतकालिकांनी पुरोगामी प्रबोधन विश्वात मोलाची कामगिरी केली आहे. 'आजचा सुधारक' हे विवेकवादी विचारांना वाहिलेले मासिकही प्रबोधनाच्या बाबतीत अग्रेसर राहिले व त्यात समाजासमोरच्या अनेक प्रश्नांची विस्तृत चर्चा झाली. काही कारणाने हे मासिक बंद करण्याचा निर्णय संचालकांना घ्यावा लागला. पुरोगामी प्रबोधन विश्वाची ही हानीच म्हणावी लागेल. प्रा. नागोराव कुंभारांनीही 'विचारशलाका' हे त्रैमासिक गेली अनेक वर्षे निष्ठेने चालवले आहे. त्यांनीही अनेक विशेषांक प्रसिद्ध केले. म. फुले समता प्रतिष्ठानानेही 'पुरोगामी सत्यशोधक' हे त्रैमासिक प्रबोधनविश्वात आपले वेगळे अस्तित्व टिकवून आहे. याशिवाय लोकवाङ्मयगृहाचे 'आपले वाङ्मय वृत्त' हे मासिकही नियमित प्रकाशित होते व त्यात परिवर्तनवादी विचारांवरचे लेखन, पुस्तक परिचय नियमितपणे दिला जातो.

'साधना', 'लोकवाङ्मयगृह', 'प्रतिमा प्रकाशन', 'सुगावा प्रकाशन' ही प्रकाशनगृहे, 'श्रमिक प्रतिष्ठान', 'समाजवादी प्रबोधिनी', 'आंबेडकर अकादमी' यांसारख्या संस्थांनीही पुरोगामी विचारांवरील पुस्तके, पुस्तिका विशेषांक वेळोवेळी प्रसिद्ध केले आहेत.

असा हा पुरोगामी विचारविश्वाचा स्थूल आढावा. यातून अनके लेखक, अनेक ग्रंथ व तत्सम साहित्य वगळलेही गेले असेल. जेवढे प्रस्तुत लेखकाच्या नजरेत आले व उपलब्ध झाले तेवढेच समाविष्ट केले आहे. याबद्दल लेखक दिलगीर आहे.

या साऱ्या आढाव्याकडे नजर टाकल्यावर काही निरीक्षणे नोंदवावीशी वाटतात. हा आढावा परिपूर्ण नसल्याने निरीक्षणांनाही मर्यादा आहेच.

१. नव्वदोत्तरी काळात परिवर्तनवादी चळवळींचे समग्रतेच्या अंगाने जाणारे (१९७०च्या दशकातील) स्वरूप

संपले. चळवळी एक प्रश्नी झाल्या. विविध सामाजिक घटकात जागृती आली व त्यांच्या 'स्व'चा शोध व प्रश्नांचा ऊहापोह सुरू झाला. यातून लेखनाची प्रासंगिकता वाढली. या एकूणच काळात सुट्या प्रश्नांवरील लेखन वाढले. सलग अशी विषयांवरील पुस्तकांची संख्या घटली.

२. समग्रतेचा दृष्टिकोन लुप्त होताना दिसतो. या दृष्टिकोनाअभावी अनेक प्रश्नांवरील लेखन, सुटे आहे असेच जाणवते, त्याचा व्यापक प्रश्नांशी असणारा संबंध स्पष्ट होत नाही. त्याने एकसंध विचारप्रणालीची जाणीव होत नाही.

३. चिंतनशील व भविष्यगामी अशा पद्धतीच्या पुस्तकांची निर्मिती जवळपास घटली आहे. त्याऐवजी भाष्यकारिता जास्त जाणवते. ही भाष्यकारिता प्रसंगी प्रतिक्रियात्मकही असल्याचे जाणवते. यातून केवळ प्रश्नांचे दर्शन घडते. त्यात वास्तविकता असते पण वैचारिकता कमी असते.

४. आंतरविद्याशाखीय शिस्त व जाणीव फारच मर्यादित लेखनात जाणवते. त्या ऐवजी माहिती व तपशिलावर भर जास्त दिसतो. पण त्यांचे अन्यशास्त्रीय संबंध दिसत नाहीत.

५. आंतरविद्याशाखीय शिस्तीच्या अभावी व अशा अभ्यासकांअभावी काही पुस्तकांची नीट परीक्षणेही होऊ शकत नाहीत. उदा. सुधाकर गायकवाड यांचा आंबेडकरांवरील 'माणूस, त्याचा समाज व बदल' हा ग्रंथ किंवा रावसाहेब कसबे यांचा 'देशीवाद आणि मराठी साहित्य' हा ग्रंथ. सुधाकर गायकवाड यांचा ग्रंथ अनेक ज्ञानशाखांनीयुक्त आहे. निसर्ग-विज्ञाने व सामाजिक शास्त्रे या दोन्हीचे उपयोजन त्यात आहे. रावसाहेब कसबे यांचे पुस्तकही तसेच आहे. आंतरविद्याशाखीय दृष्टी नसेल तर यातील निसर्गविज्ञानाच्या उपयोजनाचा व त्यांच्या सैद्धांतिक मांडणीवरील परिणामांची कल्पनाच येणार नाही. त्यामुळेच या ग्रंथाची परिपूर्ण अशी टीकात्मक परीक्षणे होत नाहीत. पुरोगामीच काय पण एकंदरीतच मराठी विचारविश्वाची ही मोठीच कमतरता आहे.

६. पुरोगामी टीकाविश्व पूर्वीसारखे रसरशीत नाही. ग्रंथांची परखड परीक्षणे होत नाहीत. परिचयालाच परीक्षण म्हटले जाते. त्यामुळे मिळमिळीत, स्तुतीप्रधान व हळुवार दोष सांगणारी परीक्षणे सध्या दृष्टीस पडतात. कोणताही वाद ओढवून घेऊन 'पुरोगामी' ही प्रतिमा डागाळू न देण्याचा प्रयत्न जाणवतो. काही-काही पुस्तके तर यामुळे परीक्षणाविणाच राहतात. त्यांची दखलही अनेकांना नसते.

७. इतिहास संशोधन व त्यासंबंधीचे वाद त्याच त्या विषयांभोवती घुटमळताहेत. छ. शिवाजी महाराज, छ. संभाजी महाराज, पेशवाई यांच्यापुढे संशोधन जात नाही. असंख्य कागदपत्रे पडून आहेत. त्याला अभ्यासक मिळत नाहीत. त्यामुळे इतिहास संशोधनाला खिळ बसल्यासारखी झाली आहे.

८. भाषांतराच्या क्षेत्रातही पुरोगामी चळवळीतील कार्यकर्त्यांची समज वाढेल अशा मूलभूत ग्रंथांची भाषांतरे होत नाहीत. पूर्वी साहित्य संस्कृती मंडळाने सुरुवातीच्या काळात हे काम केले आहे. हेही थंडावले आहे. अनुवादाच्या क्षेत्रासाठीची बौद्धिक शिस्त व ओढा कमी दिसतो.

९. १९७०च्या आसपास मार्क्सवाद, समाजवाद, गांधीवाद, फुले-आंबेडकरवाद व रॉयवाद या विचारप्रणालींच्या आधारे कार्यकर्ते घडत असत व संघटनाही यावर आधारित असत, धारदार असत. विविध कार्यकर्त्यांमधील देवाण घेवाणही होत असे. आपापल्या दर्शनाला परिपूर्ण मानले जायचे. आज यातले एकही दर्शन परिपूर्ण नाही, हे स्पष्ट आहे. पण त्यामुळे नवदर्शनाचा शोध घेण्याऐवजी राजकीय गरजेप्रमाणे दर्शनांच्या बेरजेचे प्रयत्न दिसतात. मार्क्स+आंबेडकर, मार्क्स + आंबेडकर + गांधी, मार्क्स + आंबेडकर + फुले + लोहिया अशा बेरजांचे प्रयत्न दिसतात. पण यातून एकात्म नवदर्शन उभे राहताना दिसत नाही. त्यामुळे पुरोगामी विचारविश्वाला नव्या दर्शनाची प्रतीक्षा आहे.

१०. जागतिकीकरणाच्या आरंभी विरोधात्मक, प्रतिक्रियात्मक लेखन पुष्कळ झाले. पण आता जागतिकीकरणाला २५ वर्षे पूर्ण झाल्यावर जागतिकीकरणाचा भारतीय समाजावर झालेल्या सर्वंकष परिणामांचा वेध घेणारे लेखनही फारसे दिसत नाही. गेली तीन-चार वर्षे तर भाजपा केंद्रीय सत्तेत आल्यापासून सर्व पुरोगामीविश्व एका सुरात बोलत आहे, लिहीत आहे व ते स्वाभाविकही आहे. त्यामुळे मोदी, भाजपाविरोधी व जात-जमातवाद विरोध याने जास्तीत जास्त चर्चाविश्व व्यापले आहे. त्यामुळे समाजाच्या सामाजिक-आर्थिक पुनर्रचनेच्या विचारांकडे ढोबळपणे पाहिले जाते व त्याचे प्राधान्यही दुय्यम होते आहे. आजच्या सार्वजनिक जीवनात हिंसाचार, असहिष्णुता, तोडफोड यांचे वाढते प्रस्थ आहे. पुरोगामी विश्वातील लेखनावरही याचा परिणाम होताना दिसतो. तो वेळीच रोखायला हवा. यात पुरोगामी विचारविश्वाचे हित आहे असे वाटते.

या साऱ्या निरीक्षणांबरोबर आणखी एक बाब नोंदवायला हवी. ती म्हणजे, पुरोगामी विश्वातला लिहिता घटक आता बहुजातीय झाला आहे व त्यात दिवसेंदिवस भर पडत आहे. ही आश्वासक गोष्ट आहे. परिवर्तन विचारविश्व बहुजातीय, बहुधर्मीय होण्यातच चळवळींच्या यशाचे मर्म दडले आहे.

●

**किशोर बेडकिहाळ,**
'मैत्री', १२० १३/२/१,
यादोगोपाळ पेठ, सातारा.
ई-मेल : kishorbedkihal@gmail.com



अनुक्रमणिका



समीक्षा

कैलास जोशी

# प्रवीण बांदेकर यांची 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या'



'चाळेगत'मधून समकालीन वास्तवातील जाणवणाऱ्या प्रश्नांचा शोध घेतलेला आहे. आसपासचा भवताल उद्ध्वस्त होत जाणे, ढासळणारी मूल्यव्यवस्था, पुरोगामी विचारांवर झुंडशाही, दंडेली यांचे होणारे आक्रमण, तात्कालिक फायद्यासाठी हिंसक राजकीय शक्तीचे निर्माण होणारे आकर्षण हे कादंबरीतील लेखकाला जाणवणारे प्रश्न आहेत. तर 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या कादंबरीत समकाळातील बुद्धिजीवी वर्गाच्या बधीर होत जाणाऱ्या संवेदना, हताशा, परंपरा आणि धर्म यांच्या नावाखाली सनातनी प्रवृत्तींचे आक्रमण, त्या प्रवृत्तींनी बहुजनांचा केलेला बुद्धिभेद, आपली मुळे शोधण्याच्या नावाखाली व्याज-परंपरांचे, प्रतिगामी विचारांचे पुढे येणे आणि या सर्व प्रक्रियेत समाजाचे मूक प्रेक्षक बनून राहणे याविषयीचे भाष्य येते.





१.

प्रवीण बांदेकर हे महत्त्वाचे समकालीन कादंबरीकार आहेत. 'चाळेगत'- शब्दालय प्रकाशन आणि 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' शब्द पब्लिकेशन या त्यांच्या दोन कादंबऱ्या आहेत. बांदेकर यांच्या दोन्ही कादंबऱ्या समकालीन प्रश्नांची चर्चा करतात. वास्तवाचे विविध पदर, व्यक्ती-समाज यांच्या संबंधातील गुंतागुंत, समकालासमोर उभे असलेले नैतिक पेच, ढासळत्या मूल्यव्यवस्थेबाबतची चिंता या साऱ्यांना सामोरे जाताना 'लेखका'पुढे निर्माण होणारे प्रश्न, त्यांच्याशी 'लेखक' या व्यवस्थेने घेतलेली झुंज, लेखकाचा हा अंतर्बाह्य झगडा 'साहित्य' रूपात मांडताना होणारी दमछाक हे त्यांच्या लेखनाचे विषय आहेत. आपला विषय कादंबरी रूपात मांडताना आविष्करणाच्या पारंपरिक व प्रयोगशील पद्धतींचा वापर त्यांनी केला आहे. समकालीन तसेच एकूण कादंबरीत आपल्या या प्रयोगशील कादंबऱ्यांनी नवे भान देऊन भर घातली आहे. परंपरा आणि प्रयोगशीलता यांचा अनोखा वापर त्यांच्या कादंबऱ्यातून दिसतो. वास्तवाच्या गतिमानीचा शोध घेताना आशय हाताळणीच्या व निवेदनाच्या अनेक शक्यतांचा वापर त्यांनी केला आहे. वासाहतिक व नव-वासाहतिक प्रभावाला प्रतिक्रिया म्हणून उभ्या राहणाऱ्या देशीवादापेक्षा सकारात्मक स्वयंचिकित्सेवर भर देणारा देशी आशय हे त्यांच्या कादंबऱ्यांचे बलस्थान आहे. कोणत्याही वादप्रणालीची पोझ न घेताही ठाम भूमिकेतून मांडणी हे विशेष त्यांच्या कादंबऱ्यांतून दिसतात.

लेखकाची ओळख त्याच्या सुट्या सुट्या लेखनावरून पटते, त्यापेक्षा त्याच्या समग्र लेखनातून अधिक लक्षात येते. बांदेकरांच्या नव्या 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या कादंबरीचा विचार करता येईल, परंतु, त्यांच्या चाळेगत या आधीच्या कादंबरीशी बाहुल्यांचे आंतरिक नाते आहे.

२. 'चाळेगत' आणि 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या दोन कादंबऱ्यातून एकरेषीय गोष्ट सांगितलेली नाही. 'चाळेगत'मधून समकालीन वास्तवातील जाणवणाऱ्या प्रश्नांचा शोध घेतलेला आहे. आसपासचा भवताल उद्ध्वस्त होत जाणे, ढासळणारी मूल्यव्यवस्था, पुरोगामी विचारांवर झुंडशाही, दंडेली यांचे होणारे आक्रमण, तात्कालिक फायद्यासाठी हिंसक राजकीय शक्तीचे निर्माण होणारे आकर्षण हे कादंबरीतील लेखकाला जाणवणारे प्रश्न आहेत. तर 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या कादंबरीत समकाळातील बुद्धिजीवी वर्गाच्या बधीर होत जाणाऱ्या संवेदना, हताशा, परंपरा आणि धर्म यांच्या नावाखाली सनातनी प्रवृत्तींचे आक्रमण, त्या प्रवृत्तींनी बहुजनांचा केलेला बुद्धिभेद, आपली मुळे शोधण्याच्या नावाखाली व्याज-परंपरांचे, प्रतिगामी विचारांचे पुढे येणे आणि या सर्व प्रक्रियेत समाजाचे मूक प्रेक्षक बनून राहणे याविषयीचे भाष्य येते. सदर कादंबऱ्या विषयदृष्ट्या नावीन्यपूर्ण, समकालीन आहेत,












"कादंबरीत निवेदकाचा 'स्व' म्हणून हा परिसर येतो. निवेदकाचे काही व्यक्तिगत तपशील वगळता निवेदकाचा 'स्व' समूहस्वरूपाचा आहे हे सतत जाणवते. स्वसंस्कृती व स्वसमाजाच्या जगण्यावरील आक्रमण निवेदकाला अस्वस्थ करते. या आक्रमणाविरुद्धची चीड कादंबरीतून व्यक्त झालेली आहे. निवेदक हे सारे त्याच्या रोजच्या जगण्यातून वेचून सांगत राहतो. तीळतीळाने रोजचे उद्ध्वस्त होत जाणारे जगणे त्याच्या तपशिलासकट मांडले आहे."

गोष्ट सांगण्याच्या अभिनव पद्धतींचा वापर करणाऱ्या आहेत. या कादंबऱ्या उद्ध्वस्त होत जाणाऱ्या स्वसमाजाची गोष्ट सांगणाऱ्या आहेतच, त्याचबरोबर लिहिण्याचे, व्यक्त होण्याचे पेच याची गोष्ट सांगणाऱ्या आहेत. (प्रवीण बांदेकर यांनी वापरलेले अधिकथनाचे तंत्र हा स्वतंत्र निबंधाचा विषय आहे.)

३. प्रवीण बांदेकर यांच्या उल्लेखिलेल्या दोन्ही कादंबऱ्यांचे विषय समकालीन आहेत, त्याचबरोबर विशिष्ट भूमीचे, वास्तवाचे संदर्भ पृष्ठस्तरावर ठेवून समाजाच्या आंतरिक घडामोडी, परिवर्तने यांचे सूक्ष्म रूप शोधण्याकडे त्यांचा कल आहे. 'चाळेगत'मधील वास्तव थेटपणाने विशिष्ट अशा भौगोलिक परिसराचा निर्देश करते. कोकण, गोवा सीमावर्ती परिसरात ही कादंबरी घडते. या विशिष्ट परिसरातील निसर्गाशी, या निसर्गाने नियत केलेल्या संस्कृतीशी ही कादंबरी घट्ट नाते सांगते, कोकणातील समुद्र, नद्या, डोंगर, जंगले, वाड्या-वस्त्या या कादंबरीतील अपरिहार्य पात्रे आहेत. हा परिसर कादंबरीत केवळ पार्श्वभूमी म्हणून येत नाही, तर कादंबरीच्या आशयाचा तो अभिन्न भाग आहे. निव्वळ प्रादेशिकतेच्या पलीकडे जाऊन भोवतालचे वास्तव उभे करण्याची रीत या कादंबरीतून दिसते. सावंतवाडी, वेंगुर्ले, कनकवन (कणकवली), मालवण आदी प्रत्यक्षातील स्थळांचे निर्देश कादंबरीत येतात. कादंबरीतील या देशी वास्तवाची अपरिहार्यता आहे, कारण कादंबरीत उपस्थित केलेले प्रश्न या वास्तवासंबंधीचेच आहेत. कोकणातील साधनसंपत्तीवर बाह्य शक्तींचे होणारे आक्रमण लेखकाला अस्वस्थ करते. या निसर्गाची नासाडी, स्थानिकांचे शोषण केवळ विकासाच्या नावाने चालू आहे. स्थानिक राजकारणातील साठमारी, भ्रष्टाचार हिंसेला बरोबर घेऊन येते. विकासाचे आमिष दाखवून, स्थानिक अस्मितेला गोंजारून आपला स्वार्थ साधणारी राजकीय प्रवृत्ती लेखक उघड करून दाखविते. कादंबरीतील कोकण आपल्या समृद्ध तपशिलांसकट येतो. हा निसर्ग पर्यटकाने बघितलेला निसर्ग नाही. हा समुद्र, नद्या, डोंगर, जंगले आपल्या उग्र खारवट वासांसह येतो, मासे, सुकटाच्या चव, गंधासह येतो. वेगवेगळ्या यात्रा, खेळे, उत्सव, दैनंदिन प्रथा-परंपरा यांचे तपशील काहीतरी दाखवावे या हेतूने न येता, निवेदकाच्या जगण्याचा भाग म्हणून येतात. संपूर्ण कादंबरी या परिसराच्या तपशिलांनी व्यापली आहे. कादंबरीच्या प्रत्येक पृष्ठावर असे अनेक तपशील आहेत. प्रत्यक्ष कादंबरी वाचताना निवेदकाच्या या तपशिलांच्या आतलेपणाची जाणीव होते. कादंबरीचा भाषिक पोत या तपशिलाला सच्चेपणा प्राप्त करून देतो. हा भाषिक पोत कादंबरीच्या आशयाचा एक अभिन्न भाग आहे.

कादंबरीत निवेदकाचा 'स्व' म्हणून हा परिसर येतो. निवेदकाचे काही व्यक्तिगत तपशील वगळता निवेदकाचा 'स्व' समूहस्वरूपाचा आहे हे सतत जाणवते. स्वसंस्कृती व स्वसमाजाच्या जगण्यावरील आक्रमण निवेदकाला अस्वस्थ करते. या आक्रमणाविरुद्धची चीड कादंबरीतून व्यक्त झालेली आहे. निवेदक हे सारे त्याच्या रोजच्या जगण्यातून वेचून सांगत राहतो. तीळतीळाने रोजचे उद्ध्वस्त होत जाणारे जगणे त्याच्या तपशिलासकट मांडले आहे.

निवेदक आपले स्व-अस्तित्व ठामपणाने, प्राणपणाने टिकविण्याची आकांक्षा व्यक्त करतो. एका बाजूला खुणावणारा भौतिक विकास आणि दुसऱ्या बाजूला या विकासासाठी नष्ट होत चाललेला भवताल यातून येणारी हताशा व निसटलेपणाची उदास जाणीव कादंबरीभर पसरलेली दिसते. शेतात शिरलेले हत्ती, जाळ्यासहित मासे फस्त करणारे केंड मासे, तीक्ष्ण दात असलेले इतरांना भक्ष्य बनविणारे शार्क बाहेरच्या जगातही आहेत. शांत निसर्गाला अनुसरणाऱ्या, विकृत उपभोगापासून दूर असलेल्या, आक्रमणाची सवय नसलेला व प्रतिकाराची शस्त्रे हरवून बसलेला समाज आपलेच उद्ध्वस्त होणे पाहत असतो. आपणच निर्माण केलेली व्यवस्था आपल्यालाच कशी नष्ट करते आहे हे पाहून चक्रावून गेलेला, काहीही राखू न शकलेला आपण 'ग्लोबल चकोट' केलेय असे वाटणारा निवेदक आपल्याला दिसतो.

जाणत्या माणसांचे गप्प राहणे ही प्रवीण बांदेकर यांना अस्वस्थ करणारी गोष्ट 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या कादंबरीतून पुढे येते. 'चाळेगत'मध्ये वास्तवाभिमुख असलेली शैली 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या'मध्ये वास्तवामागच्या अमूर्ततेत अधिक रस घेते. 'चाळेगत'मध्ये कोकण, गोवा या भौगोलिक परिसराची ठळक सोबत वाचकांबरोबर असते, तर 'उजव्या सोंडेच्या



अनुक्रमणिका






बाहुल्या' मध्ये विशिष्ट वास्तवाधारित भौगोलिक तपशिलांऐवजी प्रवृत्तिनिर्देशाकडे अधिक लक्ष पुरविले जाते. 'जादुई वास्तववादाकडे' जाणारे हे लेखन आहे. ( चाळेगत ते उजव्या सोंडेच्या बाहुल्या यातील शैलीबद्दल यांचे तपशीलवार विवेचन हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे.)

हर्त्तीनी केलेल्या आक्रमणापाशी विराम घेतलेली 'चाळेगत', 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या'मध्ये सोंडवाल्यांच्या आक्रमणापासून सुरू होते. हे 'उजव्या सोंडवाले' समाजातील प्रतिगामी, सनातनी शक्ती आहेत. प्रा. परशुराम ठाकूर / ठाकर या बाहुल्यांच्या खेळाद्वारे कथा सांगणाऱ्यात निवेदकाच्या विचारप्रक्रियेतील, विलक्षण गुंतागुंतीची ही कादंबरी आहे. परशा, मल्हार, गोविंद किंवा इतर कुणाही विचारशील पुरोगामी माणसाच्या अस्वस्थतेची व हरवत चाललेल्या स्मृतीची ही कहाणी आहे. ज्युझे सारामागो यांच्या 'ब्लाइंडनेस' या कादंबरीत जशी पांढऱ्या आंधळेपणाची साथ पसरते, तसे 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या'मध्ये स्मृती हरवते आहे. खंडेराव विठ्ठल, राजन सिंदे, नितीन चित्रे, वसंत आवाजी कुलकर्णी, ज्ञान मनोहर, हरिश्चंद्र पाटणकर, वज्रेश, हेमंत, अरुण, सिद्धार्थ, बुजंग, मंगेश नारायणराव अशी परिचयाची वाटू शकणारी माणसे आहेत. या साऱ्यांना उजव्या शक्तींनी जेरबंद केले आहे. साऱ्यांची स्मृती हरवते आहे. कोण नेमके कोण आहे हे कुणालाच आठवत नाही. इतकेच काय, पण पांडुरंग सांगवीकर, कबीर कांबळे, रघु चिलमी ही फिक्शनल माणसे व ज्युझे सारामागो, हारुकी मुराकामी हे परदेशी लेखक देखील कादंबरीत आहेत. सनातनी उजव्या शक्ती जगण्याच्या प्रत्येक अंगांवर, पद्धतींवर आक्रमण करीत आहेत. बहुजनांचा इतिहास, परंपरा पुसून त्यांच्यावर आपला इतिहास, श्रद्धा, प्रथा-परंपरा थोपविण्याचा प्रकल्प त्यांनी हाती घेतला आहे. बहुजनांना त्यांच्या आदिम जाणिवांवर आधारित संस्कृती विसरायला लावून आपल्या संस्कृतीचे गुलाम बनविण्याचे त्यांचे प्रयत्न आहेत. अनामिक गुंगीने बुद्धिभेद करण्याबरोबरच जे आड येतील, आपले डावपेच उघड करून दाखवतील त्यांच्याविरुद्ध हिंसेचा वापर देखील ते करतात. मल्हारचे गायब होणे, परशा ठाकराला व्यक्तिगत जीवनातून उद्ध्वस्त करणे, गोविंदचा यज्ञात बळी देणे यासारख्या घटना अर्थपूर्ण आहेत. (दाभोळकर, पानसरे, कलबुर्गी यांच्या हत्यांचे स्मरण आपल्याला होते.)

या विराट पतनाच्या, स्मृतिभ्रंशाच्या काळात आपली मुळे घट्ट शाबूत ठेवणे निवेदकाला श्रेयस्कर वाटते. मल्हारला कालकुपी सापडणे, त्रिकालदर्शी मोगा आजी, स्मृती शाबूत असणारा गोविंद, भूतकाळातून येणारा आदिम नाग्यावावा यांच्याबरोबरच सारामागो, मुराकामी हे समकालीन सोबती त्याला आश्वासक वाटतात. आपली आदिम परंपरा, निसर्गसन्मुखता, स्वीकारशीलता पण त्याचबरोबर आक्रमणास प्रतिकार करणारी जिजीविषा जिवंत रहावी असे त्याला वाटते. ही दृष्टी व्यक्त करणारे अनेक प्रसंग कादंबरीत आहेत. एकतेच्या नावाखाली होणाऱ्या सपाटीकरणास तो विरोध करतो, परंपरेच्या आवरणाखाली लपलेला आक्रमक धार्मिक राष्ट्रवाद निवेदक उघड करून दाखवतो. याला उत्तर म्हणून 'स्व'चा पुनर्शोध त्याला श्रेयस्कर वाटतो. असे करताना समोर येणारे पेच त्याला अस्वस्थ करतात. आपले अस्तित्व संपतेय, आपल्या शब्दांवर आपले नियंत्रण गमावले जाते, ते दुसऱ्याच कुणाच्यातरी हातात जात आहे. ज्याला म्हणून आपण आपले म्हटले, ते आता आपले नाही असे कुणीतरी म्हणतेय, आपले असणेच आपण गमावतोय ही जाणीव त्याला अस्वस्थ करते. भावल्यावाल्याला त्याची अभिव्यक्ती करता येत नाही. ती दुसरेच कुणीतरी (उजव्या सोंडवाले) नियंत्रित करीत आहेत या जाणिवेने आपल्या बाहुल्यांना मूठमाती देऊन नव्या साळसूद माणसात मिसळणारा भावल्यावाला वाचकाला अस्वस्थ करतो. त्याची हतबलता वाचकात संक्रमित होते. आपल्यापुढील धोके ओळखण्यास बाध्य करते.

४. 'चाळेगत' आणि 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या दोन्ही कादंबऱ्यांची रचनापद्धती वैशिष्ट्यपूर्ण व वेधक आहे. ही रचनापद्धती, प्रयोगशीलता कादंबरीच्या आशयाचा भाग बनून येते. कादंबरीच्या आशयापासून तिला वेगळे काढून दाखवणे

कठीण आहे. बांदेकर दोन्ही कादंबऱ्यांत प्रमाण मराठीबरोबरच कोकणीचा चपखल वापर करतात. वाचनाच्या प्रवाहात ही कोकणी अडथळा ठरत नाही, अथवा प्रमाण मराठीवर तिचे कलम केले असेही वाटत नाही, ही कोकणी कादंबरीतील माणसांची 'देशभाषा', जगण्याची भाषा आहे. पात्रांच्या श्वासाप्रमाणे, जगण्याप्रमाणे ती कादंबरीत मिसळली आहे. या कादंबऱ्यांतून उभे राहणारे पात्रांचे हे 'देशविश्व' या भाषेखेरीज उभे राहू शकले नसते. लोकपरंपरा, लोकसंस्कृती यातील ताणेबाणे या भाषेमुळे जोरकसपणे व्यक्त झाले आहे. ही भाषा दुसऱ्या भाषेत रूपांतरीत करणे कठीण आहे. कादंबरीत या भाषेची अपरिहार्यता आहे. कोकणी बोलीचा लहेजा, म्हणी, वाक्प्रचार, विशिष्ट खटके, हेल यांनी कादंबऱ्यांची भाषा नादानुकुल झाली आहे. दोन्ही कादंबऱ्यांच्या पानोपानी याचे दाखले देता येतील.

प्रवीण बांदेकरांनी संकासूर आणि बाहुल्यांचा खेळ करणारा कथेकरी या दोन वैशिष्ट्यपूर्ण स्वरांचा वापर आपल्या कादंबऱ्यांतून केला आहे. 'चाळेगत'मध्ये येरूला लेखक होण्याचा मार्ग संकासुराच्या रूपात सापडतो. त्याला हा संकासूर केवळ निवेदनाची सोय वाटत नाही, तर त्याच्याशी आपली नाळ जुळली असल्याचे त्याला जाणवते. गोरगरिबांची बाजू घेऊन देवादिकांची, अभिजन, ब्राह्मण, उचभ्रू वर्गाची टिंगल उडवत हसत, हसवत जगाविषयीचे, जगण्याचे आपले स्वतंत्र तत्त्वज्ञान सांगणारा संकासूर येरूला आपल्या जवळचा वाटतो. आपली शस्त्रे, उपजीविकेची साधने पळविली गेल्यामुळे ब्रह्मदेवावर चिडलेला, परंपरा व व्यवस्था यांची चिरफाड करणारा संकासुर परंपरेतीलच देशी असा आहे. अभिजनांच्या बांधीव अभिव्यक्तीपेक्षा वर वर स्वैर वाटणाऱ्या परंतु आंतरिक नाते असलेल्या तुकड्या-तुकड्यात व्यक्त होणारा संकासुर चाळेगतमधील लेखक होऊ घातलेल्या येरूचा आदर्श आहे.

'उजव्या सोंडेच्या बाहुल्या'मध्ये बाहुल्यांच्या खेळाचा कथेकरी टेंबावरच्या ठाकराचा वंशज परशा ठाकर आहे. पारंपरिक बाहुल्यांचा हा खेळ प्रवीण बांदेकरांनी विलक्षण पद्धतीने गुंफला आहे. बाहुल्यांच्या आतील बाहुल्या, एकसारख्या असणाऱ्या बाहुल्या, कथेकऱ्याच्या खेळातील बाहुल्या, कधी कथेकऱ्याचेच रूप घेतलेल्या बाहुल्या कादंबरीत आहेत. आपल्या भोवतालच्या छळणाऱ्या प्रश्नांना हा कथेकरी या बाहुल्यांच्या रूपात मांडू पाहतो. हा खेळ मांडू पाहण्याची कथेकऱ्याची तगमग वाचकाला अस्वस्थ करणारी आहे. त्याला हे मांडण्यापासून रोखणाऱ्या शक्ती कुणालाही रोखू शकतात. आपल्या मुळांसह, परंपरेसह वर्तमानाला सामोरे जाण्याची त्याची धडपड कादंबरीतील संघर्ष अधिक गडद करते. त्याच्या बाहुल्यांच्या अनेक गोष्टी आहेत. आपल्याभोवतीच्या विखंडीत वास्तवाला भिडण्याचा त्याचा हा मार्ग परंपरा आणि नवता यांचे मिश्रण आहे. बाहुल्यांच्या खेळाच्या या वापरामुळे वास्तवाचे अनेक पदर, त्यामागील गुंतागुंत पाहणे वेधक झाले आहे.

'चाळेगत' आणि 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या दोन्ही कादंबऱ्यांची प्रकरणे सूत्र आणि त्यांची विवरणे या स्वरूपाची आहेत. ही सूत्रे सांगताना स्वत:च्या, मित्रांच्या कवितांच्या ओळी, अभंग व ओव्यांतील चरणे, म्हणी इत्यादींचा वापर केला आहे. प्रसंगी निवेदकाची मानसिक स्थिती झाली आहे.

प्रवीण बांदेकरांच्या या दोन्ही कादंबऱ्यांची निवेदनाची पद्धती वाचकाला कादंबरी रचण्याच्या खेळात सहभागी करून घेते. त्याचे अवधान आपल्याकडे खेचून घेते. संकासुर जसा एकाचवेळी खेळातील खेळातील पात्रही आहे आणि खेळाचा संचालकही, तो एकाचवेळी खेळातील पात्रांशी आणि प्रेक्षकांशीही बोलतो. कादंबरीचा निवेदक तशाच पद्धतीने कादंबरीतील पात्रही आहे आणि त्या खेळात वाचकालाही आपल्याबरोबर घेऊन जाणारा, त्याला सहसर्जक बनविणाराही आहे. कथेकऱ्याच्या निवेदनशैलीप्रमाणे एकरेपीय गोष्ट न सांगता विस्कळीत वाटतील अशा परंतु अंतिमत: एका सूत्रात गोवणारी गोष्ट तो सांगतो. आपल्या निवेदनात पारंपरिक अभंग, ओव्या, लोकगीते, यांची गुंफण तो करतो. स्वत:च्या तसेच मित्रांच्या कवितांच्या ओळींचा वापर करतो. हे सारे निवेदनाचा ओघ प्रवाही ठेवते व आशयाला सच्चेपणा प्राप्त करून देते.

'चाळेगत' व 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या दोन्ही कादंबऱ्यांना समकालीन सामाजिक व सांस्कृतिक, साहित्यिक संदर्भ आहेत. 'चाळेगत' ही कादंबरी त्यांनी फिक्शनल पात्रांना अर्पण केली आहे. समकालीन साहित्य चळवळी, लेखक, कवी यांचे अनेक संदर्भ या कादंबऱ्यांना आहेत. 'उजव्या सोंडेच्या बाहुल्या' या विश्वाचे स्मरण करून देते. (बांदेकरांच्या साहित्यातील आंतरसंहितात्मकता या अंगाने स्वतंत्रपणे विचार करता येईल.)

प्रवीण बांदेकर यांच्या उल्लेखिलेल्या दोन कादंबऱ्या परंपरा आणि नवता यांचे मिश्रण आहे. समकालीन असणारा हा लेखक आपल्या कादंबऱ्यांद्वारे एकूणच मराठी कादंबरीत भर घालतो, तिचा विकास करतो. परंपरेचा, भाषेचा नावीन्यपूर्ण वापर, परंपरेला ऐतिहासिक दस्तऐवज वा केवळ तपशिलाचा भाग म्हणून न वापरता तिचा वर्तमानाशी लावलेला अन्वय या दृष्टीने प्रवीण बांदेकर हा लेखक व त्याच्या सदर कादंबऱ्या महत्त्वपूर्ण आहेत.

●

**कैलास प्रभाकर जोशी**
kailasjoshgmail.com
चलभाष : ९९६०४१५९६८, ९४२३९४७४००



अनुक्रमणिका








लेख

राजेंद्र थोरात

# साहित्यकृतीचे माध्यमांतर

■■

**'ध्वनी' व 'दृश्य' हे सिनेमा व दूरचित्रवाणीचे माध्यम आहे. दृक्‌श्राव्य स्वरूपामुळे सिनेमा व दूरचित्रवाणी ही माध्यमे अधिक लोकप्रिय व प्रभावी झाली आहेत. कथा, पटकथा, संवाद, गीतकार, संगीतकार, कॅमेरामन, लाईट, डबिंग, संकलक, निर्माता, दिग्दर्शक यांच्या सामूहिक कौशल्यातून सिनेमा व मालिकांची निर्मिती होत असते. सिनेमा व मालिका या माध्यमातून प्रामुख्याने प्रेक्षकांचे मनोरंजन करताना भांडवलशाही दृष्टिकोन अवलंबिला जातो. आकाशवाणी हे श्राव्य माध्यम आहे. आकाशवाणीच्या विविध केंद्रांवरून साहित्यविषयक कार्यक्रम प्रसारित होत असतात. आकाशवाणीचे रसिक दिवसेंदिवस कमी होत असले तरी एफ. एम. रेडिओची लोकप्रियता वाढत आहे.**

■■

**सा**हित्य, सिनेमा, मालिका, आकाशवाणी, दूरचित्रवाणी या माध्यमातून मानवी जीवनाचा वेध घेतला जातो. माणसांच्या विविध वृत्ती-प्रवृत्ती या माध्यमातून अभिव्यक्त होत असतात. 'शब्द' हे साहित्याचे माध्यम आहे. कविता, कथा, कादंबरी, नाटक, चरित्र, आत्मचरित्र, आत्मकथन, प्रवासवर्णन इ. साहित्यप्रकारातून समाजजीवनाचे चित्रण विविध परिप्रेक्ष्यातून जगभरातील साहित्यिकांनी केले आहे. आपले अनुभवविश्व साहित्यिक साहित्यकृतीच्या माध्यमातून वाचकांसमोर ठेवत असतो. अलीकडच्या काळात काही पुस्तके देखील ऑडिओ स्वरूपात आली आहेत. 'ध्वनी' व 'दृश्य' हे सिनेमा व दूरचित्रवाणीचे माध्यम आहे. दृक्‌श्राव्य स्वरूपामुळे सिनेमा व दूरचित्रवाणी ही माध्यमे अधिक लोकप्रिय व प्रभावी झाली आहेत. कथा, पटकथा, संवाद, गीतकार, संगीतकार, कॅमेरामन, लाईट, डबिंग, संकलक, निर्माता, दिग्दर्शक यांच्या सामूहिक कौशल्यातून सिनेमा व मालिकांची निर्मिती होत असते. सिनेमा व मालिका या माध्यमातून प्रामुख्याने प्रेक्षकांचे मनोरंजन करतांना भांडवलशाही दृष्टिकोन अवलंबिला जातो. आकाशवाणी हे श्राव्य माध्यम आहे. आकाशवाणीच्या विविध केंद्रांवरून साहित्यविषयक कार्यक्रम प्रसारित होत असतात. आकाशवाणीचे रसिक दिवसेंदिवस कमी होत असले तरी एफ. एम. रेडिओची लोकप्रियता वाढत आहे.

साहित्यकृतीचे सिनेमा, मालिका, आकाशवाणी या माध्यमातून माध्यमांतर झाले आहे. जगभरातील साहित्यकृतींवर 'बायसिकल थीव्ज, हॅरी पॉटर, नॉट गॉन विथ द विंड, द दा विन्ची कोड, पथेर पांचाली, गाईड, देवदास, थ्री इडियट, बाजीराव-मस्तानी यांसारखे लोकप्रिय सिनेमे आले आहेत. साहित्यकृती मालिका, आकाशवाणी या माध्यमातूनही रूपांतरित झाल्या आहेत. रामायण, महाभारत काळापासून रूपांतराची प्रक्रिया सुरू आहे. लाकडापासून शेतीची अवजारे तयार करता येतात. लाकडापासूनच घराचा दरवाजा, झोपण्यासाठीचा पलंग तयार करता येतो. लाकडाची शेतीची अवजारे, दरवाजा, पलंग, कपाट, टेबल, खुर्ची ही














रूपांतरेच आहे. कुंभार मातीपासून मडके, डेरा, पणती, मूर्ती तयार करतो. म्हणजेच ओल्या मातीचे पणती, मूर्ती, मडके इ...मध्ये रूपांतर होते. कापसापासून वात केली जाते तसेच कापडही केले जाते. आदिम काळापासून रूपांतर होत आहे. शेकोटीभोवती बसलेले असताना एखादा धाडसी प्रसंग रंगवून सांगणे हे रूपांतरच आहे. रामायण व महाभारताचे मोठ्या प्रमाणात माध्यमांतर झाले आहे व यापुढेही होत राहील.

'शब्दरूप' ते 'दृश्यरूप' हा माध्यमांतराचा प्रवास आहे. 'कीर्तन, प्रवचन, भारूड, गवळण, पोवाडा या माध्यमातूनही माध्यमांतर झाले आहे. संत तुकारामांच्या अभंगाचे 'कीर्तना'तून निरूपण तसेच छत्रपती शिवाजी महाराजांचा पराक्रम 'पोवाड्या'तून सादर करणे ही माध्यमांतराची उदाहरणे आहेत. व्यंकटेश माडगूळकर, द. मा. मिरासदार, शंकर पाटील यांनी 'कथाकथना'तून कथेचे माध्यमांतर केले आहे. ग. दि. माडगूळकरांचे अजरामर 'गीत रामायण' संदीप खरे व सलील कुलकर्णी यांचे 'आयुष्यावर बोलू काही' ही कवितेच्या माध्यमांतराची योग्य उदाहरणे आहेत.

माध्यमांतर ही यांत्रिक व किचकट प्रक्रिया असून प्रत्येक साहित्यकृतीचे माध्यमांतर यशस्वी होईलच असे नाही. साहित्यकृतीचे माध्यमांतर करताना आशयाची हुबेहूब नक्कल अपेक्षित नसते. एखाद्या कादंबरीवर आधारित सिनेमा प्रदर्शित झाल्यावर रसिकाने सिनेमागृहात ती कादंबरी व बॅटरी नेऊन कादंबरीचा आशय व सिनेमा अशी तुलना केली तर त्याला सिनेमाचा आस्वाद घेता येणार नाही. म्हणजे एक डोळा कादंबरीवर व एक डोळा सिनेमावर असे करता येणार नाही. संजय लीला भन्साळी यांच्या 'बाजीराव-मस्तानी' या सिनेमावेळी 'पिंगा' या गीतावरून वाद झाला होता. दिग्दर्शकाने अधिक स्वातंत्र्य घेणे कधी कधी रसिकांना रुचत नाही.

साहित्यकृतीच्या आशयामध्ये दिग्दर्शकाने आवश्यक ते बदल करणे योग्य आहे. सिनेमा माध्यमामध्ये मर्यादित वेळ असल्याने निवडक आशय घ्यावा लागतो तर मालिकेत वेळ अमर्याद असल्याने काल्पनिक प्रसंगांची भर टाकली जाते. माध्यमांतर करताना दिग्दर्शकाने आशयाशी प्रामाणिक राहिले पाहिजे, याविषयी नागराज मंजुळे म्हणतात, 'चित्रपट हा ओंजळीतून पाणी घेऊन येण्याचा प्रकार असून त्याच्या आशयाची गळती होऊ न देण्याची मोठी जबाबदारी असते. कादंबरी, कथा, कवितेतील संदर्भ चित्रपटात उतरविताना खूप तयारी करावी लागते. थोडे दुर्लक्ष झाले तरी आशयात मोठा बदल होतो. यामुळे आशयाची गळती न होण्यासाठी योग्य ती काळजी घेतली पाहिजे.'[१]

साहित्यकृतीचे माध्यमांतर होताना मूळ कथा महत्त्वाची असते. माध्यमांतराचा प्रारंभ कथेपासूनच होत असतो. कथा, कादंबरी, नाटकाच्या गाभ्यात माध्यमांतराच्या शक्यता दडलेल्या असतात. कथा, कादंबरी व नाटकाची 'कथनशैली' निर्माता दिग्दर्शकाला माध्यमांतरासाठी प्रवृत्त करत असते. 'कथनशैली'तून साहित्यिक शब्दरूपाने आशयाचे निवेदन करत असतो. माध्यमांतर करताना या शब्दरूपाला 'दृक्-श्राव्य रूप' प्राप्त होते. कथा, कादंबरी, नाटकातील 'आयते आशयसूत्र' व 'आयती लोकप्रियता' निर्माता दिग्दर्शकाला प्रभावित करत असते. जी. ए. कुलकर्णी यांची 'कैरी' ही कथा, सुहास शिरवळकर यांची 'दुनियादारी' ही कादंबरी तसेच जे. के. रोलिंग यांच्या लोकप्रिय कादंबरीवरील 'हॅरी पॉटर', चेतन भगत यांच्या लोकप्रिय कादंबऱ्यांवरील हिंदी सिनेमे उदाहरण म्हणून आपणास सांगता येतात. जी. ए कुलकर्णी यांच्या 'कैरी' या अभिजात कथेवरील अमोल पालेकर यांचा 'कैरी' सिनेमा आपणास प्रभावित करतो. 'दुनियादारी' ही वाचकवर्गात अफाट लोकप्रिय असणारी कादंबरी. या कादंवरीची लोकप्रियता संजय जाधव यांनी सिनेमातून 'कॅच' केली आहे. 'हॅरी पॉटर' सिनेमांना जगभर लोकप्रियता मिळाली आहे. चेतन भगत यांच्या लोकप्रिय कादंबऱ्या हिंदी सिनेमातून माध्यमांतरित झाल्या आहेत. कथा-कादंबरीतील आयते आशयसूत्र व कथा-कादंबरीची 'संरचना' माध्यमांतरास पोषक आहे. निर्माता व दिग्दर्शक कथाकार किंवा कादंबरीकडून कलाकृतीचे हक्क विकत घेतात व मानधनाचा करारही होतो. आर्थिक तरतूद करणारा निर्माता असला तरी माध्यमाच्या यशामध्ये 'कथेची' निवड महत्त्वाची असते. प्रत्येक माध्यमाला काहीतरी सांगायचे असते किंवा दाखवायचे असते म्हणजेच 'कथा' सांगायची असते. प्राचीन काळापासून मानवाला कथा सांगण्याची व कथा ऐकण्याची विलक्षण आवड आहे. आजीच्या गोष्टी ऐकणारी पिढी व आता टेलिव्हिजनवर बाल गणेश, छोटा भीम, डोरेमन यासारखी कार्टून पाहणारी मुले हाच काय तो माध्यमांतील बदल आहे!

कथा ही कितीही दर्जेदार असली तरी ती स्वतंत्र पटकथेची गरज भागवू शकत नाही. पटकथाकार कथेवर आधारित स्वतंत्र पटकथा लिहितो. साने गुरुजींच्या 'श्यामची आई' या साहित्यकृतीवर आचार्य अत्रे यांनी स्वतंत्र पटकथा लिहिली आहे. 'जोगवा' सिनेमाची पटकथा संजय कृष्णाजी पाटील यांनी लिहिली आहे. अनुभव कथन करताना ते म्हणतात, 'पटकथाकाराला दिग्दर्शकाची व दिग्दर्शकाला पटकथाकाराची व दोघांना प्रेक्षकांची 'नजर' असणे महत्त्वाचे असते. चित्रपटाचा आराखडा एकदा ठरला की साहित्यकृतींमधील नेमक्या निर्णायक प्रसंगांवर लक्ष केंद्रित करून पटकथा लेखन करणे सोपे जाते. अर्थात, ते तितकेच आव्हानात्मक असते. राजीव सिनेमा माध्यमाच्या सर्व शक्यतांचा विचार करून माझ्यासोबत पटकथा लेखनावर काम करत असे. कॅमेरा, अँगल, अभिनय, प्रकाशयोजना, ध्वनिसंकलन, नेपथ्य या

**माध्यमांतर ही यांत्रिक व किचकट प्रक्रिया असून प्रत्येक साहित्यकृतीचे माध्यमांतर यशस्वी होईलच असे नाही. साहित्यकृतीचे माध्यमांतर करताना आशयाची हुबेहूब नक्कल अपेक्षित नसते. एखाद्या कादंबरीवर आधारित सिनेमा प्रदर्शित झाल्यावर रसिकाने सिनेमागृहात ती कादंबरी व बॅटरी नेऊन कादंबरीचा आशय व सिनेमा अशी तुलना केली तर त्याला सिनेमाचा आस्वाद घेता येणार नाही.**



विषयांच्या पायाभूत संकल्पना समजून घेऊन पटकथा लेखन करायला त्याने मला शिकवले. साहित्यकृतीच्या माध्यमांतरासाठी तुम्ही त्या साहित्यकृतीत व सिनेमाच्या प्रोसेसमध्ये असायला हवे'.[२] पटकथाकाराने पटकथा लिहीत असताना दिग्दर्शक, लेखक यांच्याशी चर्चा करणे आवश्यक आहे हे स्वअनुभवातून संजय कृष्णाजी पाटील यांनी सांगितले आहे. 'जोगवा'ची पटकथा लिहीत असताना त्यांनी राजन गवस यांच्याशी चर्चा करून त्यांच्या सूचनांनुसार पटकथा लेखन केले आहे.

'नटरंग' सिनेमाची निर्मिती होत असताना रवी जाधव यांनी नटरंग कादंबरीचे लेखक आनंद यादव यांच्याशी चर्चा करून आशयामध्ये काही बदल केले आहेत. 'सिंहासन' या सिनेमाची पटकथा विजय तेंडुलकर यांनी लिहिली आहे. सिनेमातील प्रभावी संवाद रसिकांच्या टाळ्या घेतात. हिंदीमधील 'शोले', 'तिरंगा', 'क्रांतीवीर', 'अग्निपथ', 'डॉन' अशी काही नावे सांगता येतात. मराठीत विजय तेंडुलकर यांचे 'सामना' व 'सिंहासन'मधील टोकदार संवाद कथानक गतिमान करतात. जब्बार पटेल यांच्या 'एक होता विदूषक'चे संवाद पु. ल. देशपांडे यांनी लिहिले आहेत. 'लय भारी', 'दुनियादारी' या सिनेमातील संवाद आकर्षक आहेत.

स्क्रीन प्ले (पटकथा) तयार झाल्यावर दिग्दर्शक कलावंतांकडून अभिनय करून घेतात. कलावंत कॅमेरासमोर दिग्दर्शक सांगतील त्याप्रमाणे अभिनय करतात. 'उंबरठा'मधील स्मिता पाटील, 'सामना'मधील डॉ. श्रीराम लागू व निळू फुले, 'नटरंग'मधील अतुल कुलकर्णी, 'जोगवा'मधील मुक्ता बर्वे, उपेंद्र लिमये ही चांगल्या अभिनयाची उदाहरणे आहेत. कलावंतानुसार स्क्रीन प्ले लिहिले जातात. 'थ्री इडियट'मध्ये अमीर खानच्या भूमिकेला अधिक वाव दिला आहे. अमीर खान अस्सल अभिनयासाठी प्रसिद्ध आहे. अमीर खानच्या वलयाचा व अभिनयाचा आपल्या सिनेमाच्या लोकप्रियतेसाठी उपयोग होईल हे निर्माता दिग्दर्शकांनी अचूक हेरले व त्यात ते यशस्वी झाले. 'दुनियादारी'त जितेंद्र जोशी याने 'साईनाथ'चा भूमिका केली आहे. जितेंद्र जोशीसाठी दिग्दर्शक संजय जाधव यांनी भूमिकेत बदल केले आहेत. 'नटरंग' सिनेमात अतुल कुलकर्णी यांनी भूमिकेची गरज म्हणून वजन किती वाढवले व कमी केले हे आपणास सिनेमा पाहताना जाणवते. सिनेमाच्या मध्यंतरापर्यंत 'राजा' होण्याचे स्वप्न पाहणारा गुणा अतिशय बलवान दिसतो पण 'नाच्या' होण्याचे नशिबात आल्यावर तो किती सडपातळ दिसतो हे आपण पाहिले आहे.

'जोगवा' प्रभावी होण्यासाठी दिग्दर्शक राजीव पाटील कलावंतांसह जोगतिणींचा प्रभाव असलेल्या गडहिंग्लज, सौंदत्तीच्या यल्लमा डोंगराच्या परिसरात फिरतात. अनेक जोगत्यांशी व जोगतिणींशी चर्चा केली जाते. उपेंद्र लिमये, किशोर कदम, मुक्ता बर्वे साकारत असलेल्या पात्रांच्या भाषा, लकवी, गाणी म्हणणे शिकतात. सर्वजण चौंडकं घेतात. यावरून कलावंतांच्या परिश्रमांचे महत्त्व आपणास समजते. 'भाग मिल्खा भाग' या हिंदी सिनेमातील मिल्खा सिंग याच्या भूमिकेसाठी फरहान अख्तर यांनी केलेले कष्ट व 'मेरी कोम' मधील प्रियांका चोपडा हिचे परिश्रम कौतुकास्पद आहे. फरहान हा मिल्खा सिंग व प्रियांका मेरी कोम म्हणून ओळखली जाऊ लागली. या दोन्ही सिनेमामुळे मिल्खा सिंग व मेरी कोम जगभर ओळखले जाऊ लागले. त्यांचा सन्मान झाला. जब्बार पटेल यांच्या 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' या आंतरराष्ट्रीय सिनेमात मामुटी या कलावंताने अप्रतिम अभिनय केला आहे.

दिग्दर्शक कलावंतांकडून अभिनय करून घेताना कॅमेरामनला योग्य अँगल लावण्याची सूचना देतो. कॅमेरा सुरू झाल्यावर दिग्दर्शकाने लाईट, कॅमेरा, रेडी असे म्हटल्यावर सीनचे चित्रकरण सुरू होते. 'रेडी'पासून 'कट' म्हणेपर्यंत सीनचे चित्रीकरण होते. दिग्दर्शकाचे समाधान होईपर्यंत रिटेक घेतले जातात. कितीही नावाजलेले कलावंत असले तरी त्यांना रिटेक हे द्यावेच लागतात. अलीकडच्या काळात उच्च दर्जाचे डिजीटल कॅमेरे वापरले जातात. ड्रोन कॅमेरामुळे सीन आकर्षक होतात. 'सैराट'मधील ड्रोनने चित्रीकरण केलेले सीन अप्रतिम झाले आहेत. इनडोअर किंवा आउटडोअर शूटिंगच्या ठिकाणी कॅमेरा कॉलीससारख्या गाडीतून आणला जातो. कॅमेऱ्याबरोबर




रूळ व क्रेन आवश्यक असते. फ्रेमिंग करताना Content योग्य घेऊन Shot Sizes व Angles बरोबर लावावे लागतात. वेगवेगळ्या Lensesच्या साहाय्याने चित्रीकरण केले जाते. कॅमेऱ्याने शूटिंग करताना क्लोज अप, मिड शॉट, लाँग शॉट घेतले जातात. त्या-त्या स्थळावरील (लोकेशन) सर्व सीन पूर्ण केले जातात. कॅमेराप्रमाणेच प्रकाशयोजना महत्त्वाची असते. वेगवेगळ्या प्रकारच्या लाईटमुळे सीन अप्रतिम होतात. उदा. नायकाच्या चेहऱ्यावरील प्रकाशझोत. काही मालिकांमध्ये भडक सीन घेतले जातात. शूटिंगस्थळी इलेक्ट्रिशियनची उपस्थिती आवश्यक असते. आर्थिंग चेक करणे, वायर बदलणे ही कामे त्याला करावी लागतात. आउटडोअर शूटिंगच्या वेळी लाईटसाठी टेम्पो आवश्यक असतो. लाईट पुरविणाऱ्याच्या हाताखाली ४ ते ५ लोक असतात. लाईटमुळे सीन उठावदार होतो.

सिनेमा, मालिका, माहितीपट व लघुचित्रपटाच्या यशामध्ये 'संगीता'चा महत्त्वाचा वाटा आहे. संगीत दिग्दर्शक आशयानुरूप गायकांकडून गीत म्हणवून घेतो. नावाजलेला गीतकार व गायक/गायिका असल्यास सिनेमाला चांगली प्रसिद्धी मिळते. सिनेमाच्या किंवा मालिकेच्या सरुवातीपासून शेवटपर्यंत प्रसंगानुरूप संगीत दिले जाते. 'जैत रे जैत' सिनेमातील 'आम्ही ठाकर ठाकर', 'मी रात टाकली', 'जांभूळ पिकल्या झाडाखाली' ही 'ना. धों. महानोर यांची गीते रसिकांचे कान तृप्त करतात. The Greatest Musical Hit of All Time in Marati Cinema अशी 'जैत रे जैत' सिनेमाची ओळख निर्माण झालेली आहे. 'जोगवा', 'नटरंग', 'सैराट'मधील अजय अतुल यांचे संगीत अफाट लोकप्रिय झाले. मनमोहक गीते रसिकांना सिनेमागृहात जाण्यास प्रवृत्त करतात. लता दीदी, आशा भोसले, सुरेश वाडकर, अनुराधा पौडवाल, बेला शेंडे, स्वप्नील बांदोडकर, अजय गोगावले, आदर्श शिंदे हे गायक म्हणजे मराठी संगीताला लाभलेले वरदान आहे. 'कट्यार काळजात घुसली' या सुबोध भावे यांच्या सिनेमातील गीते रसिकांना मंत्रमुग्ध करतात. मालिकांमध्येदेखील शीर्षक गीत महत्वाचे असते. 'उंच माझा झोका', 'जय मल्हार', 'लागींर झालं जी' इत्यादी मालिकांची टायटल साँग आकर्षक आहेत.

माध्यमांतर होताना पैसे पुरविणारा 'निर्माता' व्यावसायिक गुंतवणूक केलेली असल्याने अधिकाधिक नफा कसा मिळेल याचा विचार करतो. आवाक्यातील बजेट वाढल्यावर तो अस्वस्थ होतो. सिनेमा लोकप्रिय झाल्यावर फायदा त्यालाच अधिक प्रमाणात मिळतो. सिनेमा किंवा मालिका निर्मिती ही खर्चिक प्रक्रिया आहे. काही क्षणांच्या सीनसाठी लाखो रुपये खर्च करावे लागतात. 'पांगिरा' सिनेमातील शेवटचा सीन चित्रित करण्यासाठी लाखो रुपये खर्च केले जातात. 'बाजीरात्र-मस्तानी', 'बाहुबली' निर्मितीसाठी अवाढव्य खर्च आला आहे.

माध्यमांतर होताना सर्वांत महत्त्वाची भूमिका असते ती 'दिग्दर्शका'ची. सिनेमा किंवा मालिका हे दिग्दर्शकाचे माध्यम आहे. व्ही. शांताराम यांच्या रूपाने आपणास अतिशय दर्जेदार दिग्दर्शक लाभले आहेत. 'कुंकू', 'माणूस', 'शेजारी', 'पिंजरा' हे त्यांचे नावाजलेले सिनेमे आहेत. भालजी पेंढारकर, राजा परांजपे, आचार्य अत्रे, अमोल पालेकर, जब्बार पटेल, गजेंद्र अहिरे, सुमित्रा भावे, उमेश कुलकर्णी, चंद्रकांत कुलकर्णी, राजीव पाटील, रवी जाधव, संजय जाधव, संदीप सावंत, नागराज मंजुळे अशी दर्जेदार दिग्दर्शकांची परंपरा मराठी सिनेविश्वाला लाभली आहे. माध्यमांतराच्या प्रोसेसमध्ये दिग्दर्शक सुरुवातीपासून सहभागी असतो. दिग्दर्शक हा लेखक, चांगला अभिनेता, संगीताचे ज्ञान असणारा, कॅमेराचा योग्य अँगल समजणारा व उत्कृष्ट संकलक असावा लागतो. दिग्दर्शकाचा कॅमेरा न बोलताही बराच आशय अभिव्यक्त करतो. 'फॅन्ड्री'मध्ये नागराज मंजुळे डुक्कर पकडत असताना राष्ट्रगीत सुरू होऊन सर्व सावधान होणे, पकडलेले डुक्कर घेऊन जाताना महामानवांच्या प्रतिमा दाखवणे यामधून समाजव्यवस्थेतील वास्तवाचा वेध घेतला आहे. 'सैराट'मधील शेवटच्या सीनमध्ये बाळाची रक्ताळलेली पावले कॅमेऱ्यातून दाखवणे यातून दिग्दर्शकीय कौशल्य जाणवते.

शांता गोखले यांच्या 'रीटा वेलिणकर' या कादंबरीवरील 'रीटा' सिनेमातून रेणुका शहाणे यांनी आपल्या कौशल्यातून रीटाच्या भावनांचा कोलाज अभिव्यक्त केला आहे. शांता गोखले यांच्या आशयसूत्राला पडद्यावर दृश्यरूप देताना त्यांनी सिनेमा हे दाखवण्याचे माध्यम आहे, हे प्रत्येक फ्रेममधून प्रदर्शित केले आहे. बालपणीची रीटा समुद्र किना-यावर वाळूमध्ये बोटाने Rita असे लिहिते, पाण्याची लाट आल्यावर ती अक्षरे पुसून जाणे किंवा रीटाचे स्वप्न दाखविताना घाबरलेली रीटा जिन्याने वर जात आहे अशी दृश्यं दाखविली आहेत. 'जोगवा'मध्ये राजीव पाटील यांचे दिग्दर्शक म्हणून असलेले कौशल्य जाणवते. सिनेमाच्या सुरुवातीला बांगड्या फोडून त्या अग्नीमध्ये अर्पण करणे या प्रसंगामध्ये दिग्दर्शकाचा कॅमेरा प्रतीकात्मकतेने परंपरेचे चित्रण करतो. तायाप्पाला पंथात घेताना त्याच्या डाव्या हातावर तापलेल्या लोखंडी खिळ्याने गोंदणे यातून दिग्दर्शकाने तायाप्पाचा पुढील प्रवास वेदनादायी, खडतर आहे हे स्पष्ट केले आहे. यमन्याची पाठ घासताना तायाप्पाच्या हातातून अभावितपणे दगड खाली पडणे यामधून यमन्या 'बाईपण कसं अंगात भिनत जातंय ते तुला कळलं' हे तायाप्पाच्या अंतर्मनाला लागलेले दिग्दर्शकाने प्रदर्शित केले आहे. 'नटरंग' सिनेमाच्या शीर्षकातून रवी जाधव यांचा कलावादी दृष्टिकोन जाणवतो. झी टॉकीज निर्मित व पडणारी घुंगरे व त्यातील एका घुंगरातून पसरणारा रंग व त्या रंगामधून पडद्यावर 'नटरंग' असे शीर्षक दिसते. घुंगरामधून नटरंग असे दिग्दर्शकाने सुचविले आहे. नटरंगमधील 'र' वरील अनुस्वार हा घुंगराच्या स्वरूपात आहे.

दिग्दर्शक साहित्यिकाच्या भूमिकेशी प्रामाणिक राहिला नाही तर साहित्यकृतीची मोडतोड होते. वि. वा. शिरवाडकर यांच्या 'नटसम्राट' नाटकावर आधारित महेश मांजरेकर यांचा 'नटसम्राट' सिनेमा हास्यास्पद झालेला आहे. नटसम्राट की मद्यसम्राट, असा आपला संभ्रम होतो. वि. वा. शिरवाडकर असते तर त्यांनी या स्वरूपाच्या माध्यमांतराला नकार दिला असता असे वाटते. संजय जाधव यांनी देखील 'दुनियादारी' सिनेमाची 'दुकानदारी' केली आहे. आशसूत्राची मोडतोड, व्यसनांचा अतिरेक, भडकपणा, सरस्वतीच्या प्रतिमेपुढे सिगारेट पेटवणे अशा प्रसंगामुळे मूळ दुनियादारी वाचणाऱ्या रसिकांना सिनेमा तेवढा भावत नाही. दिग्दर्शकाला देव मानून काम करतो असे जेव्हा सचिन पिळगावकर म्हणतात, तेव्हा आपणास दिग्दर्शकाचे महत्त्व जाणवते.

'संकलन' हा माध्यमांतर प्रक्रियेतील महत्त्वाचा भाग आहे. चित्रीकरण पूर्ण झाल्यावर दिग्दर्शक अनावश्यक दृश्यांना कात्री लावतो. सिनेमातील मुख्य कलावंतांना स्टुडिओमध्ये बोलावले जाते. कलावंतांच्या हातामध्ये स्क्रीन प्ले दिले जातात. स्क्रीनवरील दृश्यावरून कलावंत आवाज देतात. दुय्यम व इतर कलावंतांचे आवाज व्यावसायिक लोक देतात. डबिंगमध्ये आवाज जुळणे (मॅच) महत्त्वाचे असते. कृत्रिम आवाज दिले जातात. उदा. दरवाजा उघडणे, घोड्यांच्या पायांचा टपटप आवाज, ढग गरजणे, पिस्तुलातून गोळी झाडणे इ... डबिंग करताना Sound Bank वापरली जाते.

आक्रमक मार्केटिंगमुळे सिनेमाला तसेच मालिकेला चांगले यश मिळते. थिएटरमध्ये, यू-ट्यूबवर, दूरचित्रवाणी वाहिन्यांवर सतत ट्रेलर दाखविणे, टीजरमधून तसेच सोशल मीडियातून उत्सुकता निर्माण करणे, गाते संगीतविषयक वाहिन्यांवरून सतत दाखवणे, वाहिन्यांवरून जाहिरात करणे, राष्ट्रीय व प्रादेशिक वर्तमानपत्रातून पानभर जाहिरात देणे, कलावंत व दिग्दर्शकांनी विविध चॅनल्सना मुलाखती देणे, विविध रिॲलिटी शोमध्ये भाग घेऊन तेथे आपलाच सिनेमा कसा चांगला आहे व जवळच्या सिनेमागृहात सिनेमा पाहणे कसे महत्वाचे आहे हे पटवून देणे या माध्यमातून मार्केटिंग केले जाते. 'सैराट' या मराठी सिनेमाने सोशल मिडियाच्या माध्यमातून उत्सुकता निर्माण केली व झी टॉकीजच्या आक्रमक जाहिरातीच्या जोरावर यश मिळवले. हिंदी सिनेमांचे कलावंत प्रमोशनसाठी फक्त हिंदी चॅनेलवर जात होते पण अलीकडे प्रादेशिक वाहिन्यांचे महत्त्व त्यांना समजले आहे. झी मराठीवरील 'चला हवा येऊ द्या' या रिॲलिटी शोमध्ये शाहरूख, सलमान, अमीर उपस्थित राहिले आहेत. सोनीवरील 'द कपिल शर्मा' या शोमध्ये टीम सैराटला आमंत्रित केले होते. न्यूज चॅनलवरील कार्यक्रमातून देखील सिनेमा व मालिकेची जाहिरात केली जाते. सिनेमाची टीम 'प्रिमियम'च्या माध्यमांतून व विविध सिनेमागृहांना भेट देऊन जाहिरात करतात.

माध्यमांतराचा फायदा काही साहित्यकृतींना होतो. माध्यमांतराने साहित्यकृतींना चांगले दिवस आले आहेत. चेतन भगत यांच्या कादंबऱ्यांचा खप सिनेमा प्रदर्शित झाल्यावर अधिकच वाढला आहे. मराठीतील 'दुनियादारी', 'शाळा', 'मी वनवासी', 'नटरंग', 'प्रकाशवाटा' या साहित्यकृतींचा खप वाढला आहे. साहित्यकृतीला हजारो वाचक लाभत असतील तर सिनेमातून किंवा मालिकेतून लाखो रसिक त्या कलाकृतीचा आस्वाद घेतात.


संदर्भ टीपा :

१) नागराज मंजुळे : उद्घाटक,साहित्यकृतींचे माध्यमांतर,राज्यस्तरीय चर्चासत्र, संस्कार मंदिर महाविद्यालय, वारजे-माळवाडी, पुणे ५ डिसेंबर २०१४

२) कऱ्हाकाठ स्मरणिका, अखिल भारतीय साहित्य संमेलन,सासवड,२०१४ पृ. १२८


●


राजेंद्र थोरात

चलभाष : ९८५००१७५९५



समीक्षा

## महेंद्र कदम

**द. ता. भोसले हे सातत्याने लिहिणारे आणि तीच जगण्याची प्रेरणा मानणारे लेखक आहेत. महत्त्वाची गोष्ट अशी, की त्यांची लेखनावर जशी अव्यभिचारी निष्ठा आहे तशी त्यांची बांधिलकीवरही निष्ठा आहे. ही बांधिलकी ग्रामीण माणूस, तेथील शेतीभाती, निसर्ग, अभावासकटचे सगळे जगणे आपल्या आस्थेच्या व्यूहात घेऊन शोषणाच्या शक्यता नोंदवत जाणारी आहे आणि शोषणमुक्त व्यवस्थेचे स्वप्न पाहणारी आहे.**




**द.** ता. भोसले हे मराठी माणसाला सुपरिचित असे नाव आहे. वयाची ऐंशी गाठलेला हा लेखक आजही तरुणांना लाजवेल अशी ऊर्जा घेऊन जगताना आणि भाषेतून व्यक्त होताना दिसतो आहे. आपल्याकडे कमी लिहिणाऱ्या लेखकाला मान्यता मिळते, परंतु जास्त लिहिणाऱ्यावर रंजकतेचा किंवा दुय्यमत्वाचा शिक्का मारला जातो. खरे तर आयुष्यभर लेखनावर अव्यभिचारी निष्ठा ठेवत, लेखन हाच आपला धर्म मानत, नाही लिहिले तर आपण जगणार नाही, अशी धारणा बाळगणारा माणूस तसा महत्त्वाचा मानला पाहिजे. अशा लेखक माणसाकडून काही लिहून होत असेल तर मराठी साहित्य आणि वाचकांसाठी ते महत्त्वाचेच आहे. त्याच्या लेखनातील हिणकस वाचक बाजूला सारतील आणि चांगले ते घेतील. द. ता. भोसले हे सातत्याने लिहिणारे आणि तीच जगण्याची प्रेरणा मानणारे लेखक आहेत. महत्त्वाची गोष्ट अशी, की त्यांची लेखनावर जशी अव्यभिचारी निष्ठा आहे, तशी त्यांची बांधिलकीवरही निष्ठा आहे. ही बांधिलकी ग्रामीण माणूस, तेथील शेतीभाती, निसर्ग, अभावासकटचे सगळे जगणे आपल्या आस्थेच्या व्यूहात घेऊन शोषणाच्या शक्यता नोंदवत जाणारी आहे आणि शोषणमुक्त व्यवस्थेचे स्वप्न पाहणारी आहे. म्हणूनच ते गाडगेबाबांवर लिहितानाच लोकसंस्कृतीचा अभ्यास करून त्यातले चिरंतनत्व शोधू पाहतात. भाषेचे सौंदर्य शोधताना ग्रामीण पर्यावरणातील भाषा, संस्कृती लिपिबद्ध व्हावी म्हणून यशस्वीपणे प्रयत्न करताना दिसतात. ललित लेखक, लोकसाहित्याचा अभ्यासक, संशोधक, समीक्षक म्हणून परिचित असणारे द. ता. भोसले सतत नावीन्याचा शोध घेताना दिसतात. त्यांच्यातला हा बालचौकसपणा आणि निरागस वाटणारा पण भूमिकेचा पक्का संशोधक आज मराठीत दुर्मीळच झाला आहे.

हे नोंदवण्याचे कारण असे, की त्यांचा 'आटपाटनगरीच्या कथा' हा एक नवीन कथासंग्रह नुकताच 'ग्रंथाली'कडून प्रकाशित झाला आहे. या संग्रहात एकूण अकरा कथा आहेत. या कथांचा सर्वांत महत्त्वाचा विशेष म्हणजे या सगळ्या कथा लोककथेच्या रूपबंधात आहेत. पुन्हा, लोककथेचा हा रूपबंध एकचएक नाही. सोमवारच्या कहाणीपासून वेगवेगळ्या व्रतांच्या कथेचा रूपबंध येथे आला आहे. पारंपरिक लोककथांचा रूपबंध हा अदृश्य नगर, राजा-राणी, सुष्ट विरुद्ध दुष्ट अशी लढाई, संकटांची मालिका, निरगाठ-उत्कंठा-उकल, दुष्टांचा पराभव-सुष्टांचा विजय आणि त्यांचा आनंदाचा संसार, कथेतील सगळा अवकाश धूसर, असं हे सगळं रूपबंधाचं समीकरण असतं. त्यात पुन्हा या आशयाला धर्म, श्रद्धा आणि शोषण यांचे अंगभूत नियम असतात; परंतु त्यांचे उदात्तीकरण आणि दैवतीकरण केल्यामुळे ते लक्षात येत नाही. त्यामुळे सामान्य माणसे त्याला बळी पडतात आणि या सगळ्या कथाआशयाकडे एक श्रद्धा म्हणून पाहतात. या कथांचा

आजही शिक्षित लोकांवर, विशेषतः स्त्रियांवर प्रभाव असलेला दिसतो.

द. ता. भोसले या लोककथेचा रूपबंध आपल्या कथेसाठी निवडतात. त्या रूपबंधाचा अत्यंत चपखल असा वापरही करतात, परंतु त्या रूपबंधाची प्रभावीपणे मोडतोडही करतात. रूपबंधाची मोडतोड करताना प्रथमच ते पारंपरिक कथाआशयाला धक्का देतात. म्हणजे भोसल्यांच्या कथेत दैव, दैवशरणता, प्राक्तन कुठेही येत नाही. या कथेतली पात्रे तशा अर्थाने सुष्ट अथवा दुष्ट नसतात. त्यामुळे पारंपरिक कथेतील धर्म आणि श्रद्धा या दोन अत्यंत महत्त्वाच्या लोकबंधाला ते पूर्णपणे नाकारतात. त्यामुळे मग आपोआपच 'शोषणाला नकार' हे सूत्र त्यांच्या कथांच्या केंद्रस्थानी येते. आणि त्यामुळे या कथांमधील सामान्य माणसे मुक्तपणे व्यक्त होताना दिसतात.

भोसल्यांच्या कथेतील कालावकाश लोककथेसारखा धूसर, अवास्तव असा राहत नाही. त्याला प्रत्यक्ष कथागत वास्तवाच्या प्रदेशाचे, कालाचे संदर्भ प्राप्त होतात. मग ते शेती, जंगल, गाव, राजवाडा, निसर्ग, माणसांची वेशभूषा, ऋतुचक्र असो- या सगळ्यांना एक दृश्यात्मकता येथे प्राप्त होते. त्यामुळे पारंपरिक लोककथेसारखी या कथांची आशयबीजे अधांतरी राहत नाहीत. त्याला एक वास्तव परिणाम लाभल्यामुळे कथेची परिणामकारकता वाढत जाते.

लोककथेतील पात्रे देवभोळी, शोषणारी, नशिबावर भरवसा ठेवून देवदेव करणारी, नियतिशरण असतात. ती दुष्टांविरुद्ध लढताना कायम पराभूत होतात; परंतु त्यांना पराभूततेतून दैवी शक्ती बाहेर काढतात. म्हणून ती जगायला उभी राहतात आणि अधिकाधिक दैवशरण, देवभोळी बनत जातात. कथारसिकाने आणि वाचकाने या पात्रांसारखे श्रद्धाशील बनावे, अशी त्यांची धारण असते. भोसल्यांच्या कथेतील पात्रे अशी देवभोळी नाहीत. कष्टकरी, शेतकरी, भिकारी, लाकूडतोडे, आदिवासी, गरीब अशा सगळ्या व्यक्तिरेखा आहेत. आणि ती देवशरण नसल्यामुळे स्वतःच्या कष्टांवर उभी राहणारी आहेत, श्रम हेच मूल्य मानणारी आहेत. भले ती अर्धपोटी असतील; पण त्या अर्धपोटी असण्यावर श्रद्धा ठेवून पुन्हा जगायला बळ बांधणारी आहेत. ती मोडून पडत नाहीत. आपल्या कृषिसंस्कृतीच्या मूल्यांवर भर देऊन प्रसंगी राजाला शहाणपण शिकवणारी आहेत. सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे ते शहाणपण हा त्यांचा उपजत गुण आहे. राजाकडून काहीच नको म्हणणारे आदिवासी असोत की शेतांची राखण करताना राजाला मदत करणारा शेतकऱ्याचा पोर असो, हे सहजतेने सगळे मांडत आणि सांगत जातात. ही पात्रे लोककथेसारखी थोडी ठाशीव नसणारी आणि धूसर वाटणारी असली तरी ती जमिनीवरची आहेत.

लोककलांचा प्रत्यय देणारी भाषिक रचना हा या कथांचा वैशिष्ट्यपूर्ण भाग. परंतु लोककथेची जी साधी, सरळ, रसाळ, निवेदनात्मक भाषा असते, ती येथे न येता संस्कृतप्रचुर, वैचारिक आणि प्रसंगी तत्त्वज्ञानात्मक स्वरूपात येते. एखादे मूल्य समजावून सांगताना

# आटपाटनगरीची सामान्य तत्त्वे



उदाहरणांची अनेकता हा जो भोसल्यांचा मूळ पिंड आहे तो येथेही आल्याने भाषेला विविधता लाभली आहे. एकीकडे संस्कृतप्रचुर, प्रसंगी सुभाषितवजा किंवा अलंकरणात्मक रूप धारण करणारी ही भाषा, दुसरीकडे ग्रामीण बोलीचा बाजही घेऊन येते, हे द. ता. भोसल्यांच्या एकूणच विशेषांमधील भाषावैभवाचं वेगळेपण येथेही आहे.

तसेच द. ता. भोसल्यांनी मूळ कथेचा रूपबंध मोडताना शेवटी संकुचित, टोकदार आणि सुखात्म समारोपाला नकार देऊन अंतर्मुख व्हायला लावणारा खुला समारोप करून कथेचा रूपबंध विस्तारित रूपात सादर केला आहे. येथील सामान्य व्यक्तिरेखा मूल्यदर्शनाची आणि निष्ठेची भूमिका बजावत असल्यामुळे रूपबंधातील आदेशात्मकता नाहीशी होते. वर्णनपरता आणि विश्लेषणात्मता आल्यामुळे कथेची परिणामकारकता वाढते. त्यामुळे मूळ लोककथेच्या रूपबंधाची सामर्थ्ये वापरत ही कथा स्वतःचा नवा रूपबंध अडवू पाहते, हे या कथांचे निराळेपण आहे.

कथांचे निराळेपण तपासताना आशयसूत्रेही महत्त्वाची ठरतात. 'आटपाटनगरीच्या कथे'तील चोरीला गेलेल्या म्हशीची तक्रार घेऊन राजाकडे आलेल्या स्त्रीची अगतिकता आणि तरीही निरागस वाटणारी प्रश्नाकूलता महत्त्वाची आहे. राजाच्या भेटीची फळे रक्षक घेतो. भटजी म्हशीचे भवितव्य सांगताना दक्षिणा उकळतो. सैनिक समिती नेमण्याची आधुनिक भाषा करून तिची दिशाभूल करतात. शेजारी तिच्या म्हशीचे रेडकूही मरावे म्हणून अपयश चिंतितो, तरी ती हरत नाही. परत येते तर दारात म्हैस आलेली असते. 'एका सोमवारची कहाणी'मध्ये चोरच कसा साव ठरतो. स्त्रीवर अत्याचार करणाऱ्याला मारले म्हणून राजा तरुणाला जंगलात हद्दपार करतो. हेतू हा- उपासमार आणि प्राण्यांच्या शिकारीला बळी पडून त्याचे आयुष्य संपावे. पण होते उलटेच. तो जंगलात छान रमतो. झाडं- फळं-फुलं- प्राणी यांच्याशी दोस्ती मजेत करतो. हे सगळे जगणे मुळातून कथेत वाचण्यासारखं आहे. निसर्गाशी असलेले माणसाचे नाते ही कथा ठळक करीत जाते. ज्या नातवांसाठी ही कथा सांगितली जाते ती सांगणारी आजी नातवांना निसर्गप्रेमाचा संदेश देते.

'प्रजेच्या सुखासाठी' ही या संग्रहातील अत्यंत महत्त्वाची कथा. संपन्न आणि समृद्ध अशा आटपाटनगरीत सगळे आनंदात चाललेले असताना, देवभूषण राजा सुखात असताना, हा आनंद अधिक द्विगुणित व्हावा म्हणून नागरिकांना अधिक सुखसोयी देण्याबाबत चर्चा असताना जे घडते, ते अत्यंत कलात्मक आणि परिणामकारकतेने इथे आले आहे. दरबारात सर्वप्रथम ब्रह्मवृंद येतात आणि पूजेसाठी फुलं आणि तुळशीच्या मंजुळा कमी पडत आहेत, तेव्हा तुळस आणि फुलझाडे लावणे शेतकऱ्यांवर बंधनकारक करा आणि ती मंदिरात दान द्यायला सांगा, म्हणजे पूजा यथासांग होतील आणि तुमचे पुण्य वाढेल. नंतर महादेवाचे भक्त येतात. शंकराला दुधाचा अभिषेक करण्यासाठी शेतकऱ्यांनी मंदिरामध्ये दूध आणून देण्याबाबत आदेश द्यावेत अशी सूचना करतात. या दोन्ही सूचना मान्य करून राजा आदेश काढतो. नंतर सेनापती येतो. राज्य बळकट करण्यासाठी आपण हत्ती, घोडे, उंट वाढवले. ते चांगलेही झाले आहेत. परंतु वरच्यावर त्यांना चारा कमी पडू लागला आहे, तो शेतकऱ्यांना वाढवायला सांगून आपल्याकडे देण्याचे बंधनकारक करा. त्याशिवाय आपले सैन्यदल प्रभावी राहणार नाही. तो मान्य करण्याच्या बेतात असताना पुन्हा लाकूडतोडे येतात. सरपण खूप कमी पडत आहे म्हणून जंगलतोडीची परवानगी मागतात आणि परवानगी घेऊन जातात. तर दुपारहून राजधानीतील नागरिक चोवीस तास पाण्याची विनंती करून शेतीसाठीचे धरणातील पाणी शहराकडे वळवा म्हणून विनंती करतात. हे सगळे आदेश निघतात आणि हळूहळू दारिद्र्य वाढते. राजधानी बकाल होत जाते. शेतकरी मोडून पडतो. उपासमार वाढीस लागते. तेव्हा राजाचा एक विश्वासू आचार्य म्हणतो, 'महाराज, आपल्या ताटात पडणारी प्रत्येक वस्तू शेतकऱ्याने पिकवलेली असते. भात, वरण, भाजी, पानविडा सगळं शेतीतूनच पिकतं. शेती आणि शेतकरी हेच तुमच्या राज्याचं वैभव आहे. त्याने केलेली सेवा हीच ईश्वराची सेवा असते. म्हणून त्याची आधी सोय बघा. त्याच्या मुखात आधी घास घाला. मग तो साऱ्या जगाला

**जगण्याचा स्तर उंचावलेली सगळीच माणसे स्खलनशील होतात. एखादे मानवतेचे मूल्य पायदळी तुडवताना चुकीचे समर्थन आणि त्याचेच तत्त्वज्ञान तयार करून त्याने निर्माण करून ठेवलेल्या शोषणाच्या व्यवस्थेचे ते समर्थन करतात. हे समर्थन आणि त्यातून वाढीस लागलेला भौतिकवाद संपूर्ण व्यवस्था गिळंकृत करेल. अशा वेळी दर कथेतला राजा शेतकरी आणि सामान्यजनांकडून जगण्याचे बळ मिळवतो, व्यवस्था परिवर्तनाचे मूल्य मनाशी बाळगत आशावादी बनतो, हे या सगळ्याच कथांमधले मुख्य सूत्र आहे.**



घास घालेल. मी वावगं बोललो असेन तर माफी असावी' (३६). हे जे सूत्र आहे तेच एकूण कथांमध्ये आवृत्त होताना आढळते.

'राजकन्येच्या विवाहा'तील राजकन्या म्हणूनच माणसे मारून पराक्रम मिरवणाऱ्या, लोकांना फसवून धर्माच्या नावाने तुंबडी भरणाऱ्या, बापाच्या जिवावर उड्या मारणाऱ्या तरुणांशी आणि राजपुत्रांशी लग्न न करता शेतकऱ्याशी लग्न करते आणि आनंदी होते. 'इंद्रसेन राजाच्या मुलूखगिरी'तून शेतकऱ्याचे आणि निसर्गाचे शहाणपण आणि समूहभावाचे दर्शन घडवले जाते. शेतकऱ्याच्या मुलाला राजाचे अप्रूप आहे, पण त्याचे वैभव नको आहे. स्वतःच्या घरातली चटणी-भाकरी आणि उपजत शेतीशी नाते सांगणारा परोपकारी मूल्यभाव हवा आहे. यातूनच 'राजा वीरसेनास नवे दर्शन' घडते. त्याच्या राजा असण्याविषयी सामान्य माणसाला आदर आहे पण अभिलाषा नाही. साधूला वाटते, सगळे जर ईश्वराचे आहे तर राजाचे काय? आदिवासींना वाटते, जंगल आम्हाला भरपूर देते. तुमचे सोने घेऊन करावे काय? तुमच्या ठिकाणी तुम्ही. आमच्या ठिकाणी आम्ही. फक्त शोषण कुणी कुणाचे करू नये, हा उपदेश या कथेतले आदिवासी राजाला देतात.

द. ता. भोसले यांच्या कथांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मूल्यऱ्हासाच्या चित्रणावर दिलेला भर हे आहे. 'राजा चक्रमसेन महाराजांचा दरबार', 'राजा प्रेमरंजन आणि नर्तिका', 'कुणा एकाचे मरण', 'अन्नदान' या कथांमधून वाढीस लागलेला चंगळवाद चित्रित झाला आहे. पैसा कमावण्यासाठी तांदळात खडे मिसळणे, मसाल्यात घोड्याची लीद मिसळणे, जगण्यासाठी कुणाच्या तरी मृत्यूची वाट पाहणे, चोरी करणे, ऐश्वर्य आहे म्हणून भोगी बनणे, संपत्तीसाठी वापाचा खून करू पाहणे, गोरगरिबांवर अन्याय करणे, देवळांचा आणि धर्माचा वापर स्वार्थासाठी करणे, नैतिकता नावाची गोष्ट बासनात बांधून ठेवणे, खोटे बोलणे, अवास्तव अपेक्षा बाळगून मूल्यांना मूठमाती देणे, अशा अनेक गोष्टी या कथेत घडतात. या सगळ्यांच्या परिणामातून अराजक कसे निर्माण झाले आहे, ते अत्यंत प्रभावीपणे आणि तितक्याच नर्मविनोदी पद्धतीने चित्रित झाले आहे. परंतु या सगळ्यात आशावाद दिसतो तो शेतकरी, कष्टकरी आणि सामान्य माणूस यांच्यातच.

जगण्याचा स्तर उंचावलेली सगळीच माणसे स्खलनशील होतात. एखादे मानवतेचे मूल्य पायदळी तुडवताना चुकीचे समर्थन आणि त्याचेच तत्त्वज्ञान तयार करून त्याने निर्माण करून ठेवलेल्या शोषणाच्या व्यवस्थेचे ते समर्थन करतात. हे समर्थन आणि त्यातून वाढीस लागलेला भौतिकवाद संपूर्ण व्यवस्था गिळंकृत करेल. अशा वेळी दर कथेतला राजा शेतकरी आणि सामान्यजनांकडून जगण्याचे बळ मिळवतो, व्यवस्था परिवर्तनाचे मूल्य मनाशी बाळगत आशावादी बनतो, हे या सगळ्याच कथांमधले मुख्य सूत्र आहे.

फारसे परिश्रम न घेताही काल्पनिक व वास्तवाची नेमकी मांडणी करीत सामान्यजनांना कळेल, रुचेल अशा साध्या तपशिलांनी व सरळ निवेदनाने या कथा भरलेल्या आहेत. एका लोककथेचा रूपबंध नव्या रूपात सादर केल्यामुळे कथांची वाचनीयता वाढली आहे.

●

**महेंद्र कदम**
चलभाष : ९४२३३३७२१६



अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

**डॉ. सुरेश जोशी**

# उगम
## सृजनाची महत्ता अधोरेखित करणारी कादंबरी



कथाकार मोनिका गजेंद्रगडकर यांची 'उगम' ही पहिली कादंबरी आहे. या पिढीतील एक उत्तम कथाकार म्हणून त्यांनी लक्षणीय यश मिळविले आहे. मात्र कादंबरी लेखनाची जातकुळी वेगळी असे. एक असाधारण जीवनफलक निवडावा लागतो. अनेक पात्रे आणि त्यांना बांधून ठेवणारे गुंतागुंतीचे प्रसंग साकारावे लागतात. एक बहुकेंद्री आशय चिंतनसन्मुख व्हावा लागतो. 'उमग' कादंबरीला तेवढी सफलता लाभली आहे. जन्म आणि मृत्यू हे जीवनाचे दोन प्रधान बिंदू आहेत. त्याबाबत प्राचीन काळापासून अनेकांनी विविध स्तरावर चिंतन व्यक्त केलेले आहे. 'महाभारता'दी अक्षर वाङ्मय आणि विविध धर्मग्रंथ, त्यासंदर्भात विख्यात आहेत. संपन्न आहेत. मोनिकाबाईंच्या 'उगम' कादंबरीत अपत्यप्राप्तीची लालसा आणि वात्सल्य तसेच धार्मिक संस्कारांचा मानवी जीवनावरील पगडा याभोवती कथावस्तू गुंफवलेली आहे.

सरवणा आणि व्हिक्टर या बालमित्रांच्या निरागस मैत्रीचित्रणापासून कादंबरीचा प्रारंभ झालेला आहे. हिंदू तमिळी कुटुंबातील सरवणा आणि ख्रिश्चन कुटुंबातील व्हिक्टर ही शाळकरी वयातील मुलं त्यांच्या देवळात आणि चर्चमध्ये जिज्ञासेनं वावरतात. जातयेत राहतात. गणेशमूर्ती आणि येशूची प्रतिमा जाणून घेण्याचा प्रयत्न करतात. आपल्या कुटुंबातील खाणंपिणं-रीतिरिवाज न्याहाळतात. प्रेमभावानं परस्परात मैत्र निर्माण करतात, पण आधी व्हिक्टरच्या आईच्या मृत्यूनं आणि नंतर त्या व्हिक्टरच्या मृत्यूनं हे त्यांचं मैत्र संपुष्टात येतं. सरवणा फारच भावव्याकूळ होतो. देव-देऊळ, येशू-चर्च, जन्म-मृत्यू, जगात असणं-नसणं याबाबत तो गोंधळतो. मानसिक काहूर निर्माण होतं आणि अशा पार्श्वभूमीवर त्याचे आईवडील ग्रामीण तामिळ भागातून मुंबई महानगरात स्थलांतरित होतात. ग्रामीण जीवन आणि महानगरी जीवन असा एक नवा संभ्रम त्याच्या मनात उदयाला येतो.

मुंबई महानगरातील झोपडपट्टीत राहावयास आल्यावर सरवणा योगायोगानं जवळच्या चर्चमधील वातावरणाशी सुपरिचित होतो. त्याच्या मनातील व्हिक्टरची मैत्रप्रतिमा वाढती राहते. तेथील फादर, मदर आणि इतरांच्या प्रेमळ, वात्सल्यपूर्ण सहवासात तो अधिकाधिक रमतो. स्वतःच्या आईवडिलांच्या मायेच्या बरोबरीनं ती चर्चमधील माणसंही त्याला आपली वाटतात. त्यांच्या सहवासात तो अनेक गोष्टी शिकतो. सेवाभाव आणि करुणा, प्रेम आणि वात्सल्य यांच्या संस्कारात वाढतो. अनेकदा मदर सिल्व्हियाच्या जवळ राहतोही. आणि अखेरी त्याचं एवढं मनःपरिवर्तन होतं की तो स्वतःच बालमित्र व्हिक्टर बनतो. धर्मांतरित ख्रिश्चन होतो.

लेखिका मोनिकाबाईंनी हे धर्मांतर, मानसिक परिवर्तन वात्सल्यविस्तारणाच्या अंगानं फार हळुवारपणानं चित्रित केलेलं आहे. आजकालच्या सामाजिक अस्वस्थतेच्या वातावरणात अशी धर्मांतराची कथावस्तू समृद्ध आशयात परावर्तित करणं फार धाडसाचं आहे, म्हणून अवघडही आहे. धर्माधर्मातील भिन्नतेची, गुणावगुणांची वादग्रस्त चर्चा न करता केवळ वात्सल्याच्या अंगानं कथेची पूर्तता करणं तसं सोपं नाही.

पण सरवणा या शालेय वयातील मुलाचं धर्मपरिवर्तन हे एकमेव आशयकेंद्र 'उगम' या कादंबरीचं नाही. लेखिकेनं मानवी जीवनातील अपत्यप्राप्तीची लालसा, मातृत्वाची ओढ या भावनेची बहुकेंद्री मांडणी येथे केलेली आहे. सरवणाचे आईवडील लक्ष्मी-व्यंकटेश यांची जीवनकहाणी मध्यवर्ती आहे. तामीळनाडू ग्रामीण भागातील त्यांचं गरिबीचं जीवन, पोटापाण्यासाठी त्यांनी मुंबई महानगरीत केलेलं स्थलांतर, काहीसं उशिरा जन्मलेल्या त्यांच्या मुलावरचं त्यांचं वात्सल्यसंपन्न प्रेम, त्यांचे पूर्वपरिचित मुंबईतील शेजारी कावेरी दांपत्य आणि त्यांची अपत्य लालसा, नारवक्कममधील बालमित्र व्हिक्टर आणि त्याची आई यांच्यातील वात्सल्यभाव, नोकरीच्या ठिकाणी लक्ष्मीला भेटलेली काजलभाभी आणि तिच्या मनाविरुद्ध तिच्यावर लादलेलं मातृत्व आणि त्यामुळे नृत्याची करियर संपुष्टात आली म्हणून तिला वाटणारी खंत, मातृत्व कटाक्षानं दूर ठेवणारी मदर सिल्व्हिया आणि अपत्यभेटीसाठी अंतसमयी मुलीची वाट पाहणारी तिची आई, ख्रिस्ती नन झाल्यामुळे आईपण नाकारलं गेल्याची खंत बाळगणारी सिस्टर क्लेरा, चर्चच्या आवारातच मुलाला जन्म देणारी एक अनाथ माता आणि गरिबीमुळं मुलाला सांभाळता येत नाही म्हणून चर्चच्या अनाथाश्रमाच्या पायरीवर बाळाला सोडून जाणारी पण नंतर त्याच वात्सल्यओढीनं त्याला परत घेऊन जाणारी दुसरी एक अनाथ









**एका व्यापक अर्थानं 'उगम' ही कादंबरी सृजनाची महत्ता अधोरेखित करणारी कादंबरी आहे. मातृत्व हे निसर्गप्रेरित सृजनभाग्य आहे, ते आपल्याला लाभावे असे प्रत्येक स्त्रीला वाटते. काही जणींना अनेक वर्ष प्रतीक्षा करूनही ते लाभत नाही. ज्यांना ते लाभले आहे त्यापैकी काहींना ते पेलवत नाही. काही जणींवर ते लादलं जातं म्हणून ते पेलवत नाही. आनंददायक वाटत नाही. अडचणींचं वाटतं. पण कालांतरानं मात्र त्यांना ते हवंहवंसं वाटतं... एवढेच नव्हे तर मुलासाठी खस्ता खाणे, वाटेल तेवढे कष्ट सोसणे हेच जीवनाचे ईप्सित वाटते. ती भावना केंद्रिभूत ठेवूनच संसाराची उभारणी केली जाते.**



- **उगम,**
- **मोनिका गजेंद्रगडकर,**
- **मौज प्रकाशन, मुंबई**

माता... अशी मातृवात्सल्याची अनेक चक्रं या कादंबरी कथावस्तूत गतिमान ठेवलेली आहेत. याशिवाय पार्श्वभागी मदत मेरी- येशू आणि माता पार्वती- कार्तिकेय (सरवणा) यांची असाधारण जन्मकथा ठेवलेली आहे. त्यामुळे मातृत्व या आशयसूत्राला गडदपणा प्राप्त होतो.

अपत्यप्राप्ती हे निसर्गसिद्ध सृजन आहे, हे लक्षात घेऊन जर मानवी मनोभूमी हे कलानिर्मितीचे सृजनकेंद्र आहे या वास्तवाकडं वळलं तर 'उगम' या कादंबरीतील काजलभाभीचं आणि तिच्या गुरु माँचं नृत्यप्रेम, तसंच मदर सिल्व्हियाच्या आईचं व्हायोलिनवादनप्रेम यांचं जे सविस्तर चित्रण कादंबरीत आलेलं आहे, त्याची अर्थपूर्णता अपूर्व वाटू लागते. अपत्यप्राप्ती आणि कलानिर्मिती यांचे नातेसंबंध लक्षात येऊ लागतात. तसेच स्वतःची मुलंबाळं नसतानाही चर्चमधील फादर आणि मदर त्यांच्या अनाथालयातील मुलांना का आणि कसं प्रेमवात्सल्यात भिजवून टाकतात, निराधार मातांचं बाळंतपण करण्यास का सिद्ध होतात, आईवाबांच्या निर्मळ प्रेमवात्सल्यात गुरफटून गेलेल्या सरवणाला आपल्या प्रतिवात्सल्य कसं ओढून आणतात आणि अखेरी त्याला गॉडमदरचा पुत्र बनवतात. तसेच धर्माचा 'उगम' मानवतेच्या वात्सल्यात कसा सामावलेला आहे, असाही अर्थपूर्ण संस्कार ही कादंबरी करते.

एका व्यापक अर्थानं 'उगम' ही कादंबरी सृजनाची महत्ता अधोरेखित करणारी कादंबरी आहे. मातृत्व हे निसर्गप्रेरित सृजनभाग्य आहे, ते आपल्याला लाभावे असे प्रत्येक स्त्रीला वाटते. काही जणींना अनेक वर्ष प्रतीक्षा करूनही ते लाभत नाही. ज्यांना ते लाभले आहे त्यापैकी काहींना ते पेलवत नाही. काही जणींवर ते लादलं जातं म्हणून ते पेलवत नाही. आनंददायक वाटत नाही. अडचणींचं वाटतं. पण कालांतरानं मात्र त्यांना ते हवंहवंसं वाटतं. हक्काचं वाटतं. भावनिक सुखाचं निधान वाटतं. दैन्यदारिद्र्यातही ते सोडवत नाही. कृतार्थतेच्या आनंदाबरोबरच ती जीवाभावाची संपत्ती वाटते. एवढेच नव्हे तर मुलासाठी खस्ता खाणे, वाटेल तेवढे कष्ट सोसणे, त्याला मोठे करणे, वाढवणे हेच जीवनाचे ईप्सित वाटते. ती भावना केंद्रिभूत ठेवूनच संसाराची उभारणी केली जाते.

ज्यांना हे निसर्गसिद्ध मातृत्व लाभत नाही, किंवा अन्य एखाद्या ध्येयाच्या पूर्ततेसाठी संसारी होण्याचे ज्या टाळतात, अशा व्यक्ती त्या वात्सल्य भावनेच्या पूर्ततेसाठी अन्य मार्ग शोधतात. इतरांच्या मुलात आपला वात्सल्यभाव एन्लार्ज करतात. स्वयंनिर्मिती कामातच वात्सल्यतृप्ती साधतात.

कलावंत मनाला स्वतःची निर्मिती वात्सल्यानंद देते. त्यामध्ये विघ्न येऊ नये म्हणून कधी कधी अपत्यप्राप्ती नाकारतात किंवा त्याच्या पालनपोषणापासून स्वतःला दूर ठेवतात. त्यांचे असे वागणे इतरेजनांना जरी विचित्र वाटले, अनैसर्गिक वाटले, तरी कलावंत मनाला त्याची भ्रांत नसते. कलानिर्मितीच्या स्वविश्वातच तो मग्न असतो. त्यामध्येच आनंद शोधतो आणि वात्सल्यपूर्तीची तगमग त्या अंगानं शमवून घेतो. धर्माधिष्ठित जीवन जगणारे प्रारंभापासूनच अपत्यप्राप्तीची वात्सल्यभावना कटाक्षाने दूर ठेवतात. संसारात पडत नाहीत किंवा लवकरच संसारविन्मुख होतात. आपल्या ध्येयदृष्टीलाच अपत्यसंगोपनाचे वळ देतात. शंकराचार्य, स्वामी, मठपती, बिशप, फादर, मदर, नन यांसारखे विविध धर्मांतील संस्कारमुक्त लोक वात्सल्य एन्लार्ज करून वावरतात. मराठी संस्कृतीच्या प्राचीन काळी पुरुषहृदयाचे ज्ञानदेव हे ज्ञानेश्वर माउली झाले. आधुनिक काळात पुरुष हृदय सानेगुरुजींना असं माउली होण्याचं भाग्य लाभलं. आपली परंपरा विठुमाउलीची आहे ना?

'उगम' कादंबरीच्या नावातील 'उ'चा संदर्भ प्राधान्यानं या 'माउली'तील 'उ'शी आहे. मानवी जीवनात धर्माचा उगमच मुळी 'सारी एकाच ईश्वराची लेकरे' या भावनेनं त्या बाळांच्या संगोपनासाठी झालेला आहे. 'शिणून येती गुरेपाखरे तीच लेकरे जाण सखे' (बा.भ.बोरकर) या उक्तीतच जीवनसाफल्य सामावलेले आहे. मोनिका गजेंद्रगडकर यांच्या 'उगम' कादंबरीत एवढी चिंतनसन्मुखता सामावलेली आहे.

●

**डॉ. सुरेश जोशी**
मानसी, मधली आळी,
देवरूख - ४१५ ८०४.
चलभाष : ९४२३८७४७८१



अनुक्रमणिका









पुस्तक परीक्षण

**प्रा. डॉ. वर्षा तोडमल**

# स्थित्यंतराचे भाषेवरील पडसाद आणि भाषाप्रकाश

**भा**रतामध्ये भाषेचा अभ्यास फार प्राचीन काळापासून चालू आहे. पाणिनीचे प्रसिद्ध व्याकरण दोन हजार वर्षांपूर्वीचे आहे. त्याच्या आधीही भाषाअभ्यासाची परंपरा होतीच. युरोप खंडात मात्र भाषेच्या अभ्यासाकडे अभ्यासकांचे लक्ष अठराव्या शतकापासून गेले. गेल्या दोन शतकांमध्ये भाषेकडे पाहण्याचा आधुनिक दृष्टिकोन बनत गेला आहे.

मराठी ही साधीसुधी रांगडी भाषा आहे, ती ज्ञानभाषा होऊ शकणार नाही. ज्या भाषेतून ज्ञानाचं वाटप होत नाही, जी भाषा रोजीरोटी देत नाही, ती भाषा कालौघात गडप होते, असं काही प्रागतिक विचारवंत सांगतात आणि 'संस्कृत'कडे बोट दाखवतात. संस्कृत कालौघात गडप झाली हे खरं आहे, पण तिच्याबरोबरच्या अनेक भाषा अजूनही बोलचालीत अस्तित्वात आहेत हेही महत्त्वाचं. मराठी म्हणजे गरीबगरीब भाषा. ज्ञानेश्वरांच्या काळापर्यंत ती अमृताते पैजा जिंकणारी होती; पण आता माझ्या माय मराठीच्या अंगावर अलंकार, दागिने फारसे उरले नाहीत. चार ठिकाणी ठिगळलेलं लुगडं तिच्या अंगावर आहे. दारिद्र्यानं गांजली असली तरी नजरेत मात्र अजूनही राजस चमक आहे. मराठी भाषेचं असं दीनवाणं तरीही अस्मितेनं फुलवलेलं, रंगवलेलं चित्र सर्वत्र दिसतं. पण खरंच मराठी भाषा इतकी केविलवाणी, दैन्यावस्थेत जगणारी आहे का? ज्ञानाचा ओघ आणलाच नाही त्या भाषेत, तर ती कशी होणार ज्ञानभाषा? जागतिकीकरणामुळे होणाऱ्या स्थित्यंतरांचे भाषाव्यवहारात कोणते पडसाद उमटत आहेत? इ. प्रश्नांची उत्तरे मिळवायची असतील तर डॉ. नीलिमा गुंडी यांच्या 'भाषाप्रकाश' पुस्तकाकडे वळावे लागेल.

मराठी भाषेचे तल्लख भान आपल्या साहित्यातून व्यक्त करणाऱ्या डॉ. गुंडी या भाषातज्ज्ञ आहेतच. 'शब्दांची पहाट' आणि 'भाषाभान' यानंतरचे भाषा या विषयाला वाहिलेले त्यांचे हे तिसरे पुस्तक आहे. बदलांना सामोरा जाणारा आपला मराठी भाषक समाज आणि त्याची भाषा या सूत्राभोवती गुंफलेलं 'भाषाप्रकाश' पुस्तक भाषेच्या अभ्यासकांना नवी प्रकाशवाट दाखवणारे आहे.

'बृहदारण्यकोपनिषदा'त जनकाने याज्ञवल्क्य याला विचारले होते : सूर्य अस्ताला गेल्यावर, अग्नी विझल्यावर माणसाजवळ कोणता प्रकाश असतो?

तेव्हा याज्ञवल्क्याने उत्तर दिले होते : भाषा हा आपला प्रकाश असतो. कारण अंधारात काम करताना आपले हात दिसत नाहीत, पण आपण ऐकू शकतो आणि त्या दिशेने जाऊ शकतो.

हे वाचताना लक्षात येते की, भाषेच्या अंगची प्रकाशमानता हा तिचा महत्त्वाचा गुणधर्म आहे. इथे लेखिकेने केवळ व्यावहारिक पातळीवरच नव्हे, तर रूपकाच्या पातळीवरूनही भाषेतील प्रकाशतत्त्व समजून दिले आहे.

मराठी भाषा सध्या संक्रमणकाळातून कशी जात आहे, हे निर्विवाद सत्य डॉ. गुंडी पटवून देतात. 'ऋ', 'ऐ' अशी शब्दरूपे नजरेस पडत आहेत. रफार, अनुस्वार यांच्या जागांविषयीची बेपर्वाई सर्रास आढळते आहे. विरामचिन्हांच्या वापरामागील शास्त्रीयता जाणून घेण्याची गरज उरलेली दिसत नाही. भाषेतील उच्चार बदलत आहेत. त्यात इंग्रजी, हिंदी या भाषांमधील हेल मिसळत आहेत. 'मोबाईल' आणि 'कॉम्प्युटर' यांच्याशी निगडित नवी परिभाषा आणि शब्दप्रयोग यांचा सुळसुळाट झाला आहे. सध्याच्या मोबाईलच्या जाहिरातीतून सतत वाढवून मिळणारा 'फ्री टॉक टाईम' आणि 'दाम कम, बाते जादा' या त्यांच्या आवाहनाला तरुणांचा मिळणारा वाढता प्रतिसाद, हे खरे तर भाषिक कुपोषणाचेच लक्षण आहे.

पु. ल. देशपांडे यांनी 'अपूर्वाई'मध्ये इंग्रजी भाषा भारतीय भाषांच्या सहवासाने कशी बिघडली, याची उदाहरणे दिलीत. दाक्षिणात्य उच्चारपद्धतीत 'बाथरूम'ची होणारी 'भातरूम' आणि वंगबंधूला 'हॅपी न्यू इयर' म्हटल्यावर 'शेम टू यू' असे दिलेले उत्तर, यांचा उल्लेख करून 'राष्ट्रभाषा होताना हिंदीनेही 'अशी' तयारी ठेवली पाहिजे'; असा इशारा त्यांनी दिला आहे. त्यांचा हा इशारा सर्वच भाषांना आज लागू आहे. भोवतालच्या परिस्थितीशी जुळवून घ्यायचे व त्यानुसार बदल स्वीकारायचे ही क्षमता भाषेत टिकून



अनुक्रमणिका






**मराठी भाषेचे तल्लख भान आपल्या साहित्यातून व्यक्त करणाऱ्या डॉ. गुंडी या भाषातज्ज्ञ आहेतच. 'शब्दांची पहाट' आणि 'भाषाभान' यानंतरचे भाषा या विषयाला वाहिलेले त्यांचे हे तिसरे पुस्तक आहे. बदलांना सामोरा जाणारा आपला मराठी भाषक समाज आणि त्याची भाषा या सूत्राभोवती गुंफलेलं 'भाषाप्रकाश' पुस्तक भाषेच्या अभ्यासकांना नवी प्रकाशवाट दाखवणारे आहे.**



- **भाषाप्रकाश**
- **डॉ. नीलिमा गुंडी**
- **मॅजेस्टिक पब्लिशिंग हाउस**

राहायला हवी. मराठीला तर असे धक्के पचवून टिकून राहण्याची रग तिच्यात आहे, हे तिच्या आजपर्यंतच्या इतिहासाने सिद्ध केले आहे. त्यामुळे बदलांकडे भावुक पद्धतीने पाहून चालणार नाही, हे लेखिका आवर्जून मांडते आहे.

साहित्यक्षेत्रात इंग्रजीचा वरचष्मा गाजू लागला आहे. इंग्रजी-मराठी द्वैभाषिक कविता आता वाचायला मिळू लागल्या आहेत. कवी सौमित्र 'आई आणि कॉम्प्युटर' कवितेत लिहितात-

''जाड्याभरड्या जीन्ससारखी माझ्या मायची स्कीन

जगण्यानं लै वापरलं, पण you know what I mean'' किंवा संदीप खरे यांची 'लवलेटर' कविता. एकूणच महानगरीय जीवनाचे चित्रण वास्तवानुरूप करण्यासाठी इंग्रजी शब्दांचा वापर कसा मोठ्या प्रमाणावर होतोय हे लेखिकेने अनेक उदा. देऊन नमूद केले आहे. इतकेच नव्हे तर आमच्या भाषेतला अपशब्दही आंग्लाळलेल्या चुकीच्या रूपात आला तर तोही खटकत नाही. उदा. 'गाभ्रीचा पाऊस' हे चित्रपटाचे नाव. 'गाबडीचा पाऊस' ही बोलीभाषेत पावसाला उच्चारलेली शिवी होती. मात्र रोमन लिपीत 'ड' अक्षरासाठी 'आर' आले आणि मूळ शब्द इंग्रजीतून मराठीत भाषांतरित होताना, हा विवेक लक्षात न घेतल्यामुळे शिवीचे शिवीपण पार धुतले गेले!!

'मराठी भाषा' हा आज विचारवंतांसाठी चिंतेचा विषय झाला आहे. काहींसाठी तो अस्मितेचा विषय आहे. काहींसाठी तो 'नॉस्टॅल्जिक' विषय आहे, तर काहींसाठी तो आत्मशोधाचा विषय आहे. रोजीरोटीचं म्हणाल, तर मराठी भाषा आज महानगरं सोडली तर सगळ्या महाराष्ट्रात रोजीरोटी नाही, पण 'भाजीभाकरी' निश्चित देते!

आजचे अस्वस्थ करणारे वास्तव असतानाही एकूण वाङ्मयीन पर्यावरण लक्षात घेता लेखिका मराठीच्या भवितव्याबाबत निराश नाही. कारण भाषा कालानुरूप बदलतेच. बदल हा भाषेचा स्थायीभाव असतो; हे मान्य करायला हवे.

इंटरनेटचा आज वापर करून ई-पत्ता लिहिताना त्यात एखादे अक्षरच काय, चिन्हही चुकीचे चालत नाही. तिथे आपण काटेकोरपणा पाळतोच ना? वाहतुकीचे नियम पाळतोच ना? मग भाषेचे नियम नाही पाळले तर 'भाषिक अपघात' होतील, त्याचे काय?

जीवनातील विविध ज्ञानक्षेत्रांच्या गरजा लक्षात घेऊन नव्या अभ्यासक्रमांची आखणी करणे आवश्यक आहे. जी.आर.ई.सारखी परीक्षा देताना आपले विद्यार्थी त्यांच्या इंग्रजी भाषेच्या ज्ञानाची कसोटी द्यायला कष्ट घेऊन तयार असतात. त्या धर्तीवर पुणे-मुंबईमध्ये शिक्षणासाठी मोठ्या प्रमाणावर येणाऱ्या परदेशी विद्यार्थ्यांनाही बेसिक मराठी शिकणे बंधनकारक करायला हवे. आज अमराठी भारतीय व परदेशी मंडळींना मराठी शिकायची इच्छा आहे, पण आपणच कमी पडत आहोत. विद्यापीठांनी यासाठी पुढाकार घ्यायला हवा. स्वातंत्र्यानंतर पहिल्यांदा तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळाला. त्यामुळे तिच्यात जागतिक पातळीवर संशोधनप्रकल्प राबवले जाऊ शकतात. आमच्या भाषारूपी राष्ट्रीय संपत्तीचे महत्त्व आम्हाला पुरेसे कळेल, तेव्हा त्या संपत्तीचे आम्हाला नीट नियोजन करता येईल.

एकूणच भाषेचे नाना विभ्रम, तिच्या क्षमता आणि तिच्यातील बदल यांचा डॉ. नीलिमा गुंडी यांच्या लेखणीने घेतलेला वेध म्हणजे मॅजेस्टिक पब्लिशिंग हाउसने प्रकाशित केलेले 'भाषाप्रकाश' हे पुस्तक. चिकित्सक आणि तरीही रोचक. चर्चासत्रात वाचलेल्या निबंधांबरोबरच स्फुट लेखही यात समाविष्ट आहेत. स्थित्यंतराचे भाषाव्यवहारात उमटणारे पडसाद, बदलाच्या संभाव्य दिशेचा वेध, बदलामुळे निर्माण झालेल्या प्रश्नांची तटस्थपणे चिकित्सा, बदलाच्या प्रक्रियेविषयीची निरीक्षणे आणि या प्रक्रियेवरचे मार्मिक भाष्य या पुस्तकातून वाचायला मिळते आणि हा 'भाषाप्रकाश' भाषाप्रेमींना आंतरिकरीत्या उजळवून टाकतो.

●

**प्रा. डॉ. वर्षा तोडमल,**
आबासाहेब गरवारे महाविद्यालय, कर्वेरोड, पुणे.



पुस्तक परीक्षण

सुधीर गाडगीळ

# सईंची 'सय' कलाप्रवासाची रंगतदार स्मरणयात्रा



'एकमेवाद्वितीय माझी आई' या आरंभीच्याच प्रकरणात, रँगलर र.पु. परांजपेंची जगावेगळी एकुलती एक कन्या, शकुंतलाबाईंचं विश्व, त्यांच्या एकुलत्या एक कन्या असलेल्या सईंनी मांडले आहेत. ''ज्या काळी मुली जेमतेम मॅट्रिक होऊन किंवा आधीच 'दिल्या घरी' दाखल होत, त्या काळात आईनं, म्हणजे शकुंतलाबाईंनी केंब्रिजमध्ये पदवी मिळवून, पुढे जिनिव्हाला 'आयएलओ'मध्ये अल्पकाळ नोकरी केली. फ्रेंच शिकल्या. तिथे भेटलेल्या एका उमद्या चित्रकाराबरोबर लग्न करून खळबळ उडवून दिली. दीड वर्षे युरोपमध्ये संसार करून, पुढे घटस्फोट घेऊन आपल्या तान्ह्या मुलीला (मला) घेऊन पुन्हा मायदेशी, पितृगृही परतली,'' असं ठळक, नाट्यपूर्ण वेगळेपण, सहजतेने सांगत, आपलं बालपण नि आईचे संस्कार नोंदवले आहेत, हे विशेष.

'वेगळेपणाचा वरदहस्त घेऊन जन्माला आलेली मी', अशीच सुरुवात करत, कुटुंबाची अनोखी पार्श्वभूमी, नेमक्या शब्दात मांडत, आकाशवाणी, दूरदर्शन, फिल्म इन्स्टिट्यूट, बालरंगभूमी, नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा, चिल्ड्रन्स फिल्म सोसायटी, नाटकं, चित्रपट असे आपल्या करीअरचे टप्पे मांडत, सईंनी 'सय'मध्ये आपला कलाप्रवास मांडला आहे. आपल्या रशियन वडलांच्या देशाकडे जाऊन, तिकडच्या गोष्टी सांगत, उत्कंठावर्धक आठवणी, बोलीभाषेत सहजतेनं मांडत, आपल्या आयुष्याचा 'पट', 'सय'मध्ये उलगडला आहे.

'एकमेवाद्वितीय माझी आई' या आरंभीच्याच प्रकरणात, रँगलर र.पु. परांजपेंची जगावेगळी एकुलती एक कन्या, शकुंतलाबाईंचं विश्व, त्यांची एकुलत्या एक कन्या असलेल्या सईंनी मांडले आहे. ''ज्या काळी मुली जेमतेम मॅट्रिक होऊन किंवा आधीच 'दिल्या घरी' दाखल होत, त्या काळात आईनं, म्हणजे शकुंतलाबाईंनी केंब्रिजमध्ये पदवी मिळवून, पुढे जिनिव्हाला 'आयएलओ'मध्ये अल्पकाळ नोकरी केली. फ्रेंच शिकल्या. तिथे भेटलेल्या एका उमद्या चित्रकाराबरोबर लग्न करून खळबळ उडवून दिली. दीड वर्षे युरोपमध्ये संसार करून. पुढे घटस्फोट घेऊन आपल्या तान्ह्या मुलीला (मला) घेऊन पुन्हा मायदेशी, पितृगृही परतली,'' असं ठळक, नाट्यपूर्ण वेगळेपण, सहजतेने सांगत, आपलं बालपण नि आईचे संस्कार नोंदवले आहेत, हे विशेष.

पुरुषोत्तम जवळच्या पहिल्या शाळेत भेटलेल्या, टिंगलविषय असलेल्या, मँगोलाइड मुलीचा उल्लेख करून, तिची दुष्टपणानं टिंगल करण्याऐवजी, तिला समजावून घेतले पाहिजे, हा माणुसकीचा आईनं दिलेला पहिला धडा नोंदवलाय. अतिरेकी, कठोर, मनस्वी आईनं, तुळशीबागेतून कापडी बाहुलाबाहुलीची छानशी जोडी विकत आणून रीतसर लावलेल्या लग्नाचं सविस्तर वर्णन करून, शेवटाला सहजतेने पण स्पष्टपणे असं नोंदवलंय की माझ्या बाहुलाबाहुलीचं लग्न थाटात लावून देणारी माझी आई माझ्या लग्नाला काही आली नाही.

पुस्तकांनी भरलेल्या खोलीच्या माध्यमातून, वाचनाची गोडी लावणारी आई, उच्चारांच्या स्पष्टतेबाबत दखल घेत, संस्कृत, फ्रेंच आदी भाषांत गती निर्माण करत, रोज लिखाण करण्याचा दंडक करत, 'मुलांचा मेवा' हे पहिलं गोष्टीचं पुस्तक वयाच्या ८व्या वर्षीच प्रसिद्ध करत, शास्त्रोक्त गाण्याची शिकवणी लावत, मुलीला सर्वकलागुणसंपन्न करण्याचा सिंहाचा वाटाच उचलत होती. हेही शकुंतलाबाईंचं 'दक्ष' आईपण सांगितलंय आणि हे सांगताना म्हटलंय की, पुढे विविध माध्यमांतून सईने केलेली कामगिरीत, तिच्या प्रत्येक कलाविष्कारात आईच्या पाऊलखुणा आढळतात. एका नाटकात 'तुळसा कोळीणीची' भूमिका करण्यापूर्वी आईने थेट कोळीवाड्यात नेऊन त्या कोळीणीचं व्यक्तिमत्त्व समजावलेय.

नमनाच्या प्रकरणातील हे सारे आईचे संस्कार तपशिलाने मांडण्याचं कारण,



अनुक्रमणिका



पुढच्या सर्व कलाप्रवासाचं मूळ कळतं, विविध माध्यमात केलेल्या सईच्या कामगिरीचं मूळही कळतं आणि पुढचा चित्र-नाट्य-दूरदर्शनसहचा सर्व तपशील वाचण्याची उत्कंठा प्रत्येक प्रकरणात वाढत जाते.

घराघरात 'अँटेना'च्या शेंड्या नव्हत्या, पुणे रेडिओ केंद्र सेंट्रल बिल्डिंगमध्ये होतं. जलाल आगा, एफ.टी.आय.मध्ये विद्यार्थी होता. सई ही आकाशवाणी पुणे केंद्राच्या बालोद्यानची अत्यंत लोकप्रिय 'ताई' होती. मुंबई दूरदर्शन केंद्राचा पहिला कार्यक्रम करण्याचा मान दडपून टाकणारा होता, अशी त्या त्या काळात घेऊन जाणारी माहिती कळत जाऊन, 'सय' शेवटपर्यंत वाचायलाच हवं, ही ओढ वाढतच जाते.



'टेलिव्हिजनची जादूची पेटी अवतरण्यापूर्वीचा तो काळ होता. लोकांना रेडिओच्या खोक्याचं अप्रूप वाटे', असं म्हणत, सईंनी आकाशवाणी पुणे केंद्राची, त्यांची कलाप्रवासाची मुहूर्तमेढ आणि त्या वेळचं सेंट्रल बिल्डिंगमधलं 'आकाशवाणी' पुणे केंद्राचं चित्र चितारलंय. आकाशवाणीवर इंग्रजी बातम्या आणि मराठी निवेदिका होण्याची मिळालेली संधी आणि वर पॉकेटमनी वाटावा असा महिना पन्नास रुपये पगार, ही नोंद वाचताना गंमत वाटते. डोळ्यांदेखत अनुभवलेला गीतरामायणाचा सुवर्णकाळ, पुरुषोत्तम जोशींचं धीरगंभीर निवेदन, रजनी मुथा (सौ. निळू फुले) यांचा लोकप्रिय आवाज, नाना (गोपीनाथ तळवलकर), हरबा (नेमिनाथ उपाध्ये) यांच्याबरोबर बालोद्यानमध्ये 'ताई' म्हणून काम करताना, १९७ला फोन केल्यावर, आवाज ऐकून 'ताई ना?' म्हणत सईचा ओळखलेला आवाज, हे अनुभवताना प्रसिद्धीची पहिली झुळुक विलक्षण सुखावह असल्याचं 'सई' मोकळेपणाने कबूल करतात. आकाशवाणीवर राम कदम नावाचा क्लॅरोनेट वादक होता. (जे पुढच्या टप्प्यावरचे लोकप्रिय संगीतकार झाले.) बा. भ. बोरकर, व्यंकटेश माडगूळकरांसोबत मी नानांच्या टेबलासमोर बसायचे, हे सांगताना, मला मासे आवडतात कळल्यावर बोरकरांनी घरी जेवायला बोलावले तेव्हा बोरकर म्हणाले, 'मी मेल्यावर मला दूर समुद्रात नेऊन सोडून द्या, असं लिहून ठेवलंय. जन्मभर मी मासे खाल्ले, आता त्यांची पाळी.' अशा ओघवत्या आठवणी रंजक आहेत. शिकारीच्या गोष्टी सांगणाऱ्या तात्या माडगूळकरांवर मी लट्टू होते, असंही स्पष्टपणे सांगूनही टाकतात.

'बालोद्यान'च्या निमित्तानं स्वतः लिहिलेली नाटकं, बालरंगभूमीनं दिलेला आनंद, अरुण जोगळेकरबरोबर केलेलं पहिलं काम, जसं सईंनी नोंदवलंय, तसं आप्पांच्या आधारानं पण आईच्या इच्छेविरुद्ध अरुणशी केलेलं लग्न, 'नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा'च्या काळात अल्काझींसारख्या वादळी व्यक्तिमत्त्वाशी झालेली भेट, पुण्याला फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये येणं, जलाल आगा भेट, एफ.टी.आय.मध्ये शिकवणं, प्रा. सतीश बहादूर यांच्या व्याख्यानातून ज्ञानाची (सिनेमाच्या) ओघवती गंगाच ऐकण्याचा मिळालेला अनुभव, सिनेमाचा चालता बोलता इतिहास असलेल्या पी.के. नायरांच्या राष्ट्रीय चित्रपट संग्रहालयात, सिनेमाचं तंत्र, इतिहास, अनेक पटकथा वाचायला मिळण्याचा अनुभव, जगभरच्या नामवंत चित्रपट दिग्दर्शकांची सिनेमातून झालेली ओळख, यातून मला सिनेमाची लागण झाली आणि पुढे अनेक वर्षांनी 'स्पर्श', 'चष्मेबद्दूर', 'कथा', 'पपीहा', 'दिशा', 'साज' असे चित्रपट निर्मिण्याची तमन्ना पूर्ण झाली. दिल्ली दूरदर्शनच्या मुक्कामात सईंनी मराठी मंगळागौरपण दिल्लीकरांना दाखवली. पु.लं.चं मार्गदर्शन त्यांना लाभलं. 'चिल्ड्रेन्स फिल्म सोसायटी ऑफ इंडिया'च्या माध्यमातून 'जादूचा रोख' आणि गौतम-विनी या घरच्या मुलांना घेऊन 'सिकंदर' सईंनी काढला. पण स्टाफ बडतर्फ करण्यावरून राजीनामा दिला. कॉम्प्युटर ग्राफिक्सचा चमत्कार घडण्यापूर्वीच काळात सईंनी दूरदर्शन काळात आठ-दहा लघुपट बनवले. विशेष म्हणजे 'बर्ट हान्सट्रा' या दिग्दर्शकाने लघुपट पाहणे हे कंटाळवाणे नसते हे सिद्ध केले. हे सांगताना सईंना त्यांची मुलाखत घेण्याची संधी मिळाली. ती मुलाखत कुठे घेतली, याची आश्चर्य वाटावे अशी माहिती त्या नोंदवतात. कुतुबमिनार, लाल किल्ला ही प्रेक्षणीय स्थळ टाळून, चांदणी चौकाच्या बाजारात किंवा जामा मशिदीजवळच्या गल्लीत मुलाखत करणं 'बई'ने पसंत केलं. एम.एफ.हुसेन यांच्या मुलाखतीतलं वेगळेपण असंच नोंदवलंय. दुर्गा खोटेंची छबी रंगवायला मिळाली तेव्हा हुसेनला धन्य वाटले. पंकज मलीकांवर लघुपट, लंडन सफर या जोडीला त्या काळात 'टेलिनाटिका' हा सुंदर रंजन प्रकार रंगवला. विदूषकी चाळ्यांनी लोकांना हसवण्यात वेळ घालवणाऱ्या 'केवल कपूर'सारखे असंख्य व्यक्तिमत्त्वाचे नमुने सईंनी मांडलेत. पॅरीस, जिनिव्हा, दिव्होन इकडे सईंना त्यांचे पपांकडचे रशियन सगे भेटले आणि पॅरीसला अलीयान्झ फ्रान्सेसच्या तीन महिन्याच्या अभ्यासक्रमाला उपस्थित राहण्याच्या निमित्ताने खूप नाटकंही पाहता आली. पॅरीस आणि तिथल्या नाटकांविषयी मुळातून सविस्तर वाचण्यात गंमत आहे.

'एक तमाशा अच्छा खासा' निमित्तानं मराठी तमाशा हिंदीत आणण्याचा यशस्वी प्रयत्न नोंदवताना त्या म्हणतात, 'लोकनाट्याचं आकर्षण पूर्वीपासूनच. पण त्याच्या आवाक्याची खरी जाणीव झाली ती पॅरीसमध्ये!' प्रासंगिक किश्श्याची रेलचेल अगदी फॅमिली प्लॅनिंगपासून, फिल्मी सिताऱ्यांची खिल्ली उडवण्यापर्यंत केल्याचं सांगताना, 'उद्ध्वस्त धर्मशाळा'वाले प्रा. गोविंद देशपांडेंना मिष्कील विनोदाचा झकास चोरकप्पा होता. त्यांनी या हिंदी तमाशात 'राजा' रंगवला. अशा तऱ्हेच्या अनपेक्षित गमती आणि

कलावंतावर त्यांनी केलेली टिप्पणी यामुळे 'सय' वाचताना रंगत वाटते.

'जास्वंदी', 'बिकट वाट', इ. आपल्या नाटकांचा आढावा घेत असताना, संकल्पनेमागच्या गमती, व्यक्तींबद्दलची स्पष्ट मतं, एखादी आश्चर्यकारक रंगतदार घटना मांडत, आपलं काहीसं खट्याळ निरक्षण नोंदवत, पानागणिक वाचकाचं कुतूहल वाढवत नेलेलं आहे. त्यामुळे तो नाटकांचा नुस्ता रिपोर्ताज वाटत नाही.

'जास्वंदी'च्या निमित्तानं स्वतःच्या घरात असलेलं मांजरांचं राज्य, मांजर मनुष्यावलोकन करतात आणि माणसांविषयी त्यांचं मत फारसं चांगलं नाही, असं म्हणत मांजरांच्या दृष्टिकोनात अवतरलेली साधीच प्रेमकथा म्हणजे 'जास्वंदी' हे कळत. सिंधी-गुजराथीत जास्वंदीची निर्मिती झाल्याचं समजतं आणि मिष्कील सई लिहितात की, या मांजरांच्या नाटकाच्या प्रॅक्टिसच्या वेळी एक भटका बोका मकरंद सोसायटीच्या हॉलमध्ये येत असे. कधी तो बोका पूर्ण तालमीला बसायला, तर कधी 'चालू दे तुमचं' असं सूचित करत निघून जायचा.

'बिकट वाट वहिवाट' नाटकाच्या निमित्ताने, दिल्लीहून मुंबईला येणं' 'चिन्मा' या मैत्रिणीच्या फ्लॅटवर मुक्काम, अनेक कलावंतांचं ते आश्रयस्थान, दामूभाई जव्हेरी, श्रीकांत मोघे, रेखा कामतचं वैशिष्ट्य, 'दिलीप प्रभावळकरला अभिनय बऱ्यापैकी येतो का?' अशी शंका घेणाऱ्या सईंनी स्वच्छ कबूल केलंय की 'पहिल्याच वाचनात त्यांना गारद केले.' असा नाटकाचा निवडीपासून प्रयोगापर्यंतचा भवताल आपल्याला वाचायला मिळतो.

'सख्खे शेजारी'च्या प्रवासात, 'कृष्णा'साठी मधुकर नाईक यांनी सुहास जोशींचं नाव सुचवल्यावर, 'मी तर तिला लहानपणापासून ओळखते. पुण्याला माझ्या 'पत्तेनगरीत' नाटकात ती बदाम राणी होती' ही आठवण जागवलीय. 'सोयरीक'च्या निमित्ताने 'आकडे, तारखा, सन आणि वार सोडले तर मला माझ्या कारकिर्दीचा तपशील स्पष्ट आठवतो. गतकाळातल्या कित्येक घटना स्फटिकाप्रमाणे स्पष्ट दिसतात,' असे म्हणत आपल्या स्मरणशक्तीची ग्वाही दिलीय. आणि संपूर्ण 'सय' वाचताना ही त्यांच्या कलाप्रवासाची 'स्मरणयात्रा'च वाटते. 'राजहंस'ने सुभाष अवचट यांच्या नेटक्या मुखपृष्ठासह ही यात्रा नेमकी मांडलीय.

सर्वच नाटकांबद्दल- सिनेमांबद्दल इथं लिहीत नाही, पण 'स्पर्श', 'कथा', 'चष्मेबद्दूर', 'दिशा', 'साज' या सिनेमांबद्दलचं सईचं म्हणणं, आपल्या मनातल्या शंका दूर करणारे, आठवणी समृद्ध करणारे आणि वाचनीय झालेलं आहे. घडल्या घटना आठवल्या तशा, पण रंगतदार, रोमहर्षक लिहिल्या आहेत. तीनशे अठरा पाने होऊनही आम्ही वाचक 'आता आवरा' म्हणत नाही. उलट आणखी थोडं हवं होतं, असंच म्हणू.

●





अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

प्रा. डॉ. चंद्रकांत पोतदार

# मरणगंधाच्या कुपीतली महानगरीय जाणीव : शहर आत्महत्या करायचं म्हणतंय!

■■

**जीवनातल्या मूलभूत घडामोडींच्या सुखदु:खाचा स्तर कवितेत येतो तेव्हा त्याला आत्मनिर्भरतेची, आत्मीय वर्तमानाची, वर्तमानाच्या धावून अंगावर येणाऱ्या वास्तवाची आणि प्रखरेतची एक किनार असते. कवी सुशीलकुमार शिंदेच्या 'शहर आत्महत्या करायचं म्हणतंय!' या संग्रहातल्या कवितेला अशी किनार असल्याचे वारंवार जाणवते.**

■■



खूप काही मनाच्या तळाशी साचलं की कुठूनतरी व्यक्त करावसं वाटतं, ही अस्वस्थ जाणीव कवितेची असते. कविता हा माणसाच्या जगण्याचा जणू श्वासच असतो. जीवनातल्या मूलभूत घडामोडींच्या सुखदु:खाचा स्तर कवितेत येतो तेव्हा त्याला आत्मनिर्भरतेची, आत्मीय वर्तमानाची, वर्तमानाच्या धावून अंगावर येणाऱ्या वास्तवाची आणि प्रखरेतची एक किनार असते. कवी सुशीलकुमार शिंदेच्या 'शहर आत्महत्या करायचं म्हणतंय!' या संग्रहातल्या कवितेला अशी किनार असल्याचे वारंवार जाणवते. उपरेपणासारखे वाटणारे आयुष्य अनेकदा अपरिहार्यपणे जगणे क्रमप्राप्त ठरते. जगण्याच्या अशा असंख्य तऱ्हा सांभाळताना होणारी कसरत, अंधार-उजेडाच्या गर्तेतलं जगणं जगावं तसं हजारोंच्या गर्दीतलं एकाकी जगणं आणि एकटेपणाच्या मनातली माणसांची गर्दी या संभ्रमित जगण्यात स्वत:चं मूल्य सापडेल काय? असा नेमका प्रश्न करून हा कवी व्यक्त होतो, हीच कवीची काव्य जाणीव खूप अंतर्मुख करणारी आहे. आवतीभोवतीचे सामाजिक आणि अन्य पातळीवरचे दररोज बदलत जाणारे पर्यावरण माणसाच्या मूलभूत हक्कांवर - जगण्यावर आघात करणारे आहे. शहर कधीच आपलं म्हणवत नाही, आणि काळजातून गाव दूर हटत नाही. अशी एक कोंडी मघल्या पिढीत होती - आजही आहे. इथे मात्र कविताच शहराच्या केंद्रवर्ती आहे. शहर किती माणसाला बदलायला लावतं, नात्याह-गोत्यांच्या विचारांपासून कसं दूर करतं, कशी जगण्यातली घुसमट आणखीच रूंद करतं या सगळ्यातून येणारी मनाची मरगळ असूनही आपली तग धरून राहण्याची कवीची चिवट जाणीव महत्त्वाची आहे. काळजातली रितेपणाची जाणीव वक्त करताना शब्दांचा सडेतोडपणा आणि अंतर्मनातली अस्वस्थ सल, मनाचा दुभंगलेपणा अत्यंति प्रत्यकयकारीपणे व्यक्त होतो. शहरात स्वप्ने बघणाऱ्या माणसांच्या स्वप्नांचा चुराडा दूधी होतो कळत नाही. कचऱ्याच्या ढिगाऱ्याखाली जणू स्वप्नेभाड्यानेच ठेवली आहेत. ही खोलवरची जाणीव ज्या विचारांतून येते ती जाण महत्त्वाची आहे. शहर - आर्थिक प्रश्नांचा गुंता - सामाजिक दंभाखाली व्यक्त होणारी - मानवी प्रवृत्ती - मूल्ये हरवलेली माणुसकी हे सगळंच सामान्य माणसाला परवडणारं नाही. जातवार विभागलेला माणूस - मतांची गोळाबेरीज - जर्जर झालेलं जगणं - जायबंदी झालेलं साचेबद्ध आयुष्य - बेवारस माणसांचे छळणारे प्रश्न - स्वत:चं कुठलाही अस्तित्वाचा धागा नसलेलं बिनचेहऱ्याचं रूपडं - मनात दाटून येणारी बंडाची - विद्रोहाची - व्यवस्थेविरूद्धच्या संतापाची भाषा ही सगळी प्रामाणिक वैशिष्ट्ये या कवितेची आहेत. इथे कविता केळव कल्पनाबंधनातून येणारी भाषा नाही. तर वर्तमान वास्तवाच्या व्यापक भूमिकेला मांडणारी 'स्व'भाषा आहे. अस्तित्वाची



अनुक्रमणिका



रेषा ठळक करत एक प्रामाणिकतेने व्यक्त होणारी आणि परखडतेतून व्यक्त होणारी कविता म्हणून ही कविता महत्त्वाची आहे. व्यवस्थेच्या आणि शहराच्या बदलत्याक रूपाला नाकारणारी कविता खूप प्रभावीपणे येते.

*'या गचाळ शहराच्या कठड्यावर*
*मी सोलून ठेवलाय माझा आत्मा*
*जसा सलीम अडकून ठेवतोकापलेला बोकड*
*कत्तलखाण्याच्या खुटीवर.*
*मी नाकारतोय*
*रक्तात मिसळत जाणारं राक्षसीकरण !' - पृष्ठ - ३३*

शहरात कुणीच नसतं कुणाचं अशावेळी आपलं अस्तित्व सिद्ध करणं म्हणजे स्वत:चीच एक दीर्घ लढाई असते. दीर्घपल्याची स्वप्नं पूर्णत्वासाठी धडपडायला लावतं शहर. तसं आत्मा विकून जगायलाही  लावतंशहर.

ही कोंडी कुणापुढं मांडायची? हा केवळ कवीचाच प्रश्न नाही तर शहराच्या वाटेवर जगणाऱ्या प्रत्येयकाचाच प्रश्न. माणूसच मालसाला ठेचून मारावा आणि माणसाचे हात - पाय - धड - मेंदू सारं निकामी करून टाकावं. माणसाचं, तसं इथलं प्रखर वास्तव. तरी ही शहराच्या कानाकोपऱ्याची नोंद घेत जगणं क्रमप्राप्त ठरतं कारण दर तीन तासानंतरची आतडी पोखरणारी भूक माणसाला आतून पोखरत असते. शहरात जशी स्वत:साठी जगणारी माणसं असतात तशीच ती इतरांसाठीही जगतात. मात्र कुणाचाही जीव घ्यायला कधीच घाबरत नाही. माणूस, उलट तडफडून आलेल्या मृत्यूचा कौतुकसोहळा साजरा करावा आणि मग निर्जिव प्राण्याच्या मासांची चव न्यारी असल्याचे नमूद करावे, ही एकूणच संवेदनशीलतेचे तत्व हरवल्याची जणू खूणच आहे. 'हुकाला उलटी टांगलेली कोंबडी', 'कूस बदलणारी शहरं' सारख्या अनेक कवितांमधून हरवल्या संवेदनशीलतेचे दर्शन घडते. माणूस मारण्याच्या यंत्राची प्रगती आणि आवक वाढावी, हे भयानक चित्र असूनही माणसाचे मुकेपण म्हणजे गांभीर्याची बाबच आहे. एखाद्या साथीच्या रोगाची लागण व्हावी आणि संपूर्ण शरीरालाच फेकून द्यावे या जावघेण्या जगण्यातून अशीच अवस्था शहरांची - शहरी माणसांची. आपला जीवनपट विस्तीर्ण करून जगणाऱ्या माणसांची - शहरांची कथाच वेगळी. नामदेव ढसाळ - अरुण काळे - आणि गिरणी कामगारांचं दु:ख मांडणारी

नारायण सुर्वेची कविता बऱ्याच अंशी महानगरीय जाणीवांना शब्द बद्ध केलेल आहे. तथापि सांप्रत कवीने शहराशी जुळवून घेताना मूळ मातीतला ग्रामसंस्कृतीचा संस्कार अंगी मुरल्याधने शहराचा हा आवाका आव्हारनात्माक वाटतो. या शहरात निभाव लागेल का ? इथपासून ते शहराची नाळ आता अंगात मुरली नसली तरी वर्तमान नाकारता येत नाही अशावेळी जगतानाची मोठी कसरत महत्त्वाची ठरते. जणू या शहराने आपल्याला जखडून बांधलयं. आपलं जगणंही यंत्रवत बनलयं- असंच वाटू लागतं. घाम गाळणाऱ्या माणसांचं जग, हजारों वादळांशी टक्कर देणारं शहर माणूस पचवून करपट ढेकर देणारं शहर, खूपच यंत्रासारखं बनलंय. सामान्या,ला जगू देत नाही अशावेळी इवल्याशा जागेतही स्व त:चं बस्तून बसवायचं, हाकलण्याची भाषा करतील, धमकावतील मात्र निवडणूक आली तर तेच कागद बदलून जागा देतील. एकूण ही शहरी व्यवस्था खूप व्याहपक आणि घुसमटीची आहे. जो जन्मालला आला त्या ला जगण्याचा हक्क आहेच जो राबतो त्या्ला त्यूचे दाम मिळणारच. तरीसुद्धा आपण आपली खुंटी हलवून जागा घट्ट करायलाच हवी, ही स्वारभिमानाबरोबरच क्रांतीचीही भाषा कवी बोलतो, तेव्हाी त्यापचा अंतर्मनातला व्यवस्थेटविरुद्धचा विद्रोह स्पररष्ट होतो. शहर एखाद्या मरणगंधाच्यां कुपीसारखेच वाटू लागते, सोडवत नाही.

*'ह्या देशाच्यो मातीवरती, तुझा हक्क आहेच की*
*तुझा बाप राबला इथे, तुही राबतो आहेच की*
*ह्या झगमगत्या शोषणाला जाब आपण विचारायचा*
*जमेल तिथे आवळून मूठ धक्काण आपण मारायचा !*

ही क्रांतीची आणि जगण्याविषयीची ठाम भूमिका खूप प्रखर भाष्य करते. दहा बाय दहाच्याा खोलीत विरघळणारा संसार, शिव्यू देणारा कूकर, अंधारुन येणारं भविष्य, वाढत जाणारी घरातील गर्दी हे संगळंच खूप अस्वळस्थस करणारं असं आहे. खूप काही चांगलं असल्यारचा भास निर्माण होतो, वास्तव मात्र तोंड दाबून मुका मार देत राहतं. सगळी माणसं आपली असूनही नसतात. कुणीच कुणाची. हा एकुणच इथल्यात जीवनशैलीचा नित्यतनियम जनावरांची कत्तलखान्यागची वाढ, पुलावर भीक मागत उभी राहणारी बाई आणि माणसांचया भाऊगर्दीत सिग्रवलला मुलाला चिमटे घेणारी आई, मूल रडलं की उपाशीपोटीचा जाणिवतेने भीक जास्ता मिळेल ही आशा सिमेंट जंगलातली असं बिनचेहऱ्यांनी जगणारी माणसं पाहून अस्वास्थजणारं मन कवितेतून व्यंक्तह होतंय ते खूप आतलं आहे. अंगावर धावून येणारं केवळ शहरच नाही तर दिवसाबरोबर रात्रही काळोखाला घेऊन अंगावर धावत येते. 'सलमा' कवितेतली स्त्री ची जगण्यातली अगतिकता, आयुष्य म्हघणजे एखाद्या बलात्कासरासारखाच केवळ सोसत राहावा लागणारा आणि दुसऱ्यांच्यात मर्जीसाठी जगावा लागणारा क्षणभराचा डाव जो नित्यानं जगावा लागतो.

अशा हजारो 'सलमांचं काय ? हा मेंदू पोखरणारा प्रश्न काळजात खोल रुतून बसतो. गाव बदललं-शहर बदललं तरीही जगण्याच्याण रुढी-परंपरेत अडकून असलेला माणूस नासत चाललेल्यो माणुसकीतून बाहेर कधी पडेल? हा संभ्रमित प्रश्न खूप व्याआपक आहे. हजारो स्वेप्नांतचा चुराडा, जगण्यावरची उडालेली श्रद्धा, माणूसच माणसाला गिळंकृत करण्यासाठी माणसाने आखलेल्यो असंख्य युक्यावेला, जातीपातीच्याय विचारात अडकलेला माणूस, क्रांतीची मनात निर्माण झालेली ठिणगी आणि त्यायलाही दाबून टाकणारी व्यावस्थाच, भाषा आणि प्रांताचे वर्चस्व , विनबुडाचं बदलणारं सरकार, आश्वासनांची रज्यकत्र्यां ची हवा, अस्तित्वायसाठीची लढाई आणि भावभावनांची आंदोलने या सगळ्यातून वाट्याला येणारी काळीकुट्ट जिंदगी सरणार कधी? हा खोलवरचा प्रश्न खूप व्या पकतेने आला आहे. हा केवळ प्रश्न नाही, तर बाईपणाच्याद खोलवर चिघळून जाणाऱ्या जखमेसारखं हे आयुष्य उजेडाचा रस्तान दाखवणार कधी?हा अगतिक प्रश्न अंतर्मुख करणारा आहे.

सडेतोड भाषा म्हुणजे शव्दांखशी- पंगा घेऊन व्य क्तड होणं.आदिम काळापासून सलणाऱ्या दु:खाला व्यतक्तय करताना मुकी दिसणारी वेदना कशी मांडावी? हे प्रखर वास्तव कवीच्या चिंतनातून व्यक्त होते.

*'कोड फुटल्यागत अंगभर पसरत जाते मुकी वेदना*
*भाकरीचा घास रावबत राहातो दिवसरात्र*
*तरीही यंत्राची धडधड गळणारा घाम*
*मातीआड गेलेली माणसं, वाळवी लागलेला गावगाडा*
*कुठेच का दिसत नाहीत?*
*जिंदगीच्या बुकासोबत मीही उलटत राहतो*
*कोडगेपणा व्यालेली तुझी अतिरंजित पानं*
*हे साहित्य देवते,*
*बाजिंद्यापनालाही असू द्याव्यात थोडयाशा मर्यादा।'*

- पृष्ठ४४

कवीची कविता केवळ कविता नसते. जगून झालेल्या आयुष्यबरोबरच वर्तमान जगण्याचा भवताल कवितेत असतो. आपल्या नजरेसमोर सुखदु:खांच्या हेलकाव्यातून व्यक्तय होणारी भाषा असते. आयुष्य नावाची एक जगण्याची प्रयोगशाळाच असते. प्रत्येकाचे संदर्भ वेगळे आणि जगण्याचा माहोळ वेगळा असतो. याअर्थाने या संग्रहात व्यक्त होणाऱ्या काही कविता आहेत. उदा. जिंदगीची शाळा, एबॉर्शन केलेल्या कविता, हौसाक्का, सलमा, जागतिकीकरण, यासाख्या कविता सामाजिक-आर्थिक विषमतेवरोवरच सामाजिक भान व्यक्त करणाऱ्या अशा आहेत. महानगरीय जीवन, दैनंदिन जगण्याची उलघाल, महानगरीय जीवनातले संवेदनाशून्य माणसाचे जगणे, सामाजिकतेबरोबरच राजकीय व्यवस्थेचे ताणेवाणे, अमानुषतेचा कळस गाठणारी माणसाचीच विकृती कुठलाच अर्थाने जगण्याचा घालता न येणारा ताळेबंद, कुणीच आपलं नसल्याची झालेली जाणीव घड्याळ्याच्या काट्यासारखी यंत्रवत् झालेली माणसे, जगावं की जगू नये अशा विवंचनेत असणारी सामान्य माणसाची जिवघेणी हालत, धावून येणारा अर्थहीन वर्तमानकाळ हे सगळंच कवीला 'आतून' अस्वस्थ करतं. कवीची मातीशी जुळून असणारी संवेदनशीलत कवीला घट्ट पकडून देवते. विचार आणि भावनेपेक्षा सर्वांगीन कृतीचे रूप व्यक्त करताना शब्दांवर असणारी निष्ठा, साध्य माणसाविषयीची कणव व्यक्त करते. शहराविषयीची आस्था आणि शहराविषयीची नवी मांडणी करणारी कविता म्हणून ही जितकी महत्वाची आहे, तितकीच ती शहराविषयीची संवेदनशीलता मांडते म्हणूनही महानगरीय कवितांविषयीची परंपरा पुढे नेणारी कविता म्हणून ठळक बनते. मानवाचे अस्तित्व नाकारणारे शहर, भौतिक सुखात लोळणारे शहर, नात्यांपासून दुरावणारे शहर, कुणालाच आपलेसे न करणारे शहर माणुसकीला पायदळी तुडवत राहते.

मात्र अशाही वातावरण अस्तित्वाची लढाई करु पाहणारे कवीचे मन दैनंदिन जगण्यात घुसमटून गेले आहे. या घुसमटीला कवी स्वत:च्या आवाजात मांडतो. हा आवाज हीच या कवितेची सशक्त बाजू आहे. शब्दांमधली क्रांती, भाषा आणि भावनेतला विद्रोह, भोवतालची वर्तमानस्थिती, माणसातील सौंदर्य आणि क्रूरता आणि अजूनही माणसातला माणूस शोधण्याची व्यापक चिवटपणाची मांडणी अशा अनेकविध वैशिष्टयांसह ही कविता प्रामाणिक भाषेचा स्वर मांडते.

**शहर आत्महत्या करायचं म्हणंतय...**
**कवी सुशीलकुमार शिंदे**
**ग्रंथाली प्रकाशन, मुंबई**
**प्रथमावृत्ती : ऑगस्ट, २०१६**
**पृष्ठ : ६४**
**मूल्य : ५० रु.**

●

**प्रा. डॉ. चंद्रकांत पोतदार**
मराठी विभाग,
यशवंतराव चव्हाण महाविद्यालय,
हलकर्णी, ता. चंदगड, जि.कोल्हापूर - ४१६ ५५२.
चलभाष : ९४२३२८६४७९/७०५७९.८६४७९



कार्यवृत्त

**प्रकाश पायगुडे**

# म.सा.प. पुणे शहर कार्यवृत्त नोंद
## (१ जून २०१७ ते ३१ ऑगस्ट २०१७)






**मसाप चाळीसगाव शाखेला 'राजा फडणीस फिरता करंडक' उत्कृष्ट शाखा पुरस्कार देताना परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे आणि पुष्पा भावे. तो स्वीकारताना जळगाव जिल्हा प्रतिनिधी तानसेन जगताप आणि त्यांचे सहकारी.**

**१. दि. १४ जून २०१७ : कथासुगंध :**

डॉ. प्रतिमा इंगोले यांनी 'मियाँ बिबी राजी' व 'धूळमाती' या दोन कथा सांगितल्या व या कथांमागची कथा उलगडून सांगितली.

**२. दि. २ जून २०१७ : भा. द. खेर जन्मशताब्दी समारंभ :**

या निमित्ताने भा. द. खेर लिखित 'लोकमान्य टिळकदर्शन' या ग्रंथाचे प्रकाशन डॉ. विश्वनाथ कराड यांच्या हस्ते झाले. या वेळी ज्येष्ठ पत्रकार रामभाऊ जोशी व डॉ. कराड व कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांची भाषणे झाली. राजेंद्र खेर यांनी मनोगत व्यक्त केले.

**३. दि. २६ जून २०१७ : कवि कालिदास दिन :**

'कवितेतला पाऊस' हा मराठीतील श्रेष्ठ, ज्येष्ठ कवींच्या निवडक कवितांचा विशेष कार्यक्रम डॉ. माधव मुतालिक व डॉ. मैत्रेयी मुतालिक यांनी सादर केला.

**६. दि. २७ जून २०१७ : लेखक तुमच्या भेटीला :**

या उपक्रमांतर्गत नुकताच साहित्य अकादमीचा बालसाहित्य पुरस्कार लेखक ल. म. कडू यांना जाहीर झाल्यानिमित्त अहिल्यादेवी हायस्कूलमधील ९वीच्या विद्यार्थिनींशी संवाद साधण्यासाठी आमंत्रित केले होते. अनुष्का गुंजाळ, हिमानी हर्षे, सृष्टी आचार्य, वैष्णवी काळे, मीनल गानू, केतकी देशपांडे या विद्यार्थिनींनी कडू यांना अनेक प्रश्न विचारून त्यांच्याशी संवाद साधला. श्री. कडू यांना पुरस्कार मिळाल्यानिमित्त मसापतर्फे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते त्यांचा हृद्य सत्कार करण्यात आला. यावेळी समन्वयक कार्यवाह प्रा. माधव राजगुरू, दीपक करंदीकर व प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे उपस्थित होते. प्रा. राजगुरू व प्रा. जोशी यांनी यथोचित भाषणे केली. विद्यार्थिनींच्या उत्स्फूर्त सहभागाने, मुख्याध्यापिका सुलभा शिंदे यांच्या उपस्थितीमुळे कडूंशी संवाद रंगत गेला.

**५. दि. २८ जून २०१७ : 'मसाप गप्पा' :**

या उपक्रमांतर्गत विज्ञान लेखक निरंजन घाटे यांची मुलाखत अर्चना जगदीश गोडबोले यांनी घेतली.

**६. दि. २ जुलै २०१७ : ज्येष्ठ अभिनेते मोहन जोशी सत्कार सोहळा :**

संगीत नाटक अकादमीचा पुरस्कार मिळाल्यानिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषद व नाट्य परिषद, पुणे यांच्यातर्फे जाहीर सत्कार करण्यात आला. या वेळी श्रीनिवास भणगे, ज्योती चांदेकर, सुहासिनी देशपांडे, उल्हासदादा पवार, प्रभाकर भावे,



अनुक्रमणिका







सुरेश देशमुख, दीपक रेगे, मोहित टाकळकर इत्यादी मान्यवर उपस्थित होते. सत्कारानंतर राजेश दामले यांनी मोहन जोशी यांची मुलाखत घेतली.

**७. दि. ७ जुलै २०१७ : एक कवी, एक कवयित्री :**

या उपक्रमांतर्गत गझलकार कवी रमण रणदिवे आणि हेमा लेले यांचे काव्य वाचन व त्यांच्याशी संवाद साधण्यात आला. कार्यवाह उद्धव कानडे व प्रमोद आडकर यांनी या दोघांची मुलाखत घेतली.

**८. दि. ८ जुलै २०१७ :**
**कै. प्रा. शं. वा तथा सोनोपंत दांडेकर स्मृती पुरस्कार :**

कै. सोनोपंत दांडेकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दिला जाणारा पुरस्कार यंदा डॉ. संज्योत देशपांडे यांच्या 'अटळ दुःखातून सावरताना' व डॉ. यश वेलणकर यांच्या 'ध्यानविज्ञान' या ग्रंथांसाठी ह.भ.प. चंद्रकांत महाराज वांजळे यांच्या हस्ते विभागून प्रदान करण्यात आला. या वेळी देणगीदार डॉ. म. वि. गोखले यांच्या कन्या डॉ. आनंदिनी क्षीरसागर उपस्थित होत्या. ग्रंथनिवड समितीत डॉ. आरती दातार व डॉ. मुकुंद दातार यांचा समावेश होता. पुरस्कार विजेते डॉ. संज्योत देशपांडे व डॉ. यश वेलणकर यांनी व ह.भ.प. चंद्रकांत महाराज वांजळे यांनी या वेळी आपले विचार प्रकट केले.

**१०.दि. १० जुलै २०१७ :**
**थोर लेखक जी. ए. कुलकर्णी जयंती समारंभ :**

महेश आफळेलिखित 'जीए पत्रास विनाकारण की' या पुस्तकाचे प्रकाशन दै. 'सकाळ'चे संपादक मल्हार अरणकल्ले यांच्या हस्ते झाले. या वेळी व्यासपीठावर सोलापूरचे शशिकांत लावणीस, जीएंच्या भगिनी नंदा पैठणकर उपस्थित होते. महेश आफळे, शशिकांत लावणीस व मल्हार अरणकल्ले यांची भाषणे झाली. दुसऱ्या भागात जीएंच्या 'काजळमाया' या कथासंग्रहातील 'प्रदक्षिणा' या कथेचे नाट्यरूपांतर व त्याच कथेवर तयार केलेल्या सिनेमाचा ट्रेलर दाखविण्यात आला.

**११. दि. १२ जुलै २०१७ :**
**संत सावतामाळी पुण्यतिथी व्याख्यान :**

'संत सावतामाळी जीवन व विचार' या विषयावर ह.भ.प. महेश महाराज नलावडे यांचे व्याख्यान झाले. यासाठी देणगी देणारे मा. कृष्णकांत कुदळे यांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

**१२. दि. १३ जुलै २०१७ :**

रेणूताई गावस्कर यांच्या हस्ते कै. बाबूराव व शांतादेवी शिरोळे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दिले जाणारे बालकुमार साहित्य विषयक पुरस्कार यंदा मिरजेचे गोविंद गोडबोले व जळगावच्या माया धुप्पड या बालसाहित्यकारांना प्रदान करण्यात आले. गोविंद गोडबोले व माया धुप्पड यांची पुरस्काराला उत्तर म्हणून मनोगते व्यक्त झाली व रेणूताई गावस्कर यांनी अध्यक्षीय समारोप केला. या वेळी वसुंधरा शिरोळे उपस्थित होत्या.

**१३. दि. १८ जुलै २०१७ :**
**लोकशाहीर अण्णाभाऊ साठे स्मृती व्याख्यान :**

महाराष्ट्र साहित्य परिषद व व दलित साहित्य परिषद यांच्या सहकार्याने वि. दा. पिंगळे यांचे 'शाहीर अण्णा भाऊ साठे' या विषयावर व्याख्यान झाले. कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार व दलित साहित्य परिषदेचे अध्यक्ष धर्मराज निमसरकर यांनी प्रास्ताविक व मनोगत व्यक्त केले.

**१४. दि. २० जुलै २०१७ :**
**कै. वा. म. जोशी स्मृतिव्याख्यान :**

'मराठी साहित्य : चरित्र आणि चारित्र्य' या विषयावर डॉ. न. म. जोशी यांचे व्याख्यान झाले.

**१५. दि. २४ जुलै २०१७ : मसाप गप्पा :**

व्यंगचित्रमहर्षी शि. द. फडणीस यांची परिषदेच्या व्यासपीठावर प्रथमच जाहीर गप्पावजा मुलाखत झाली. त्यांनी काही ताज्या कल्पनांची व्यंगचित्रे या वेळी कॅनव्हासवर काढून दाखविली. त्यांची रंगतदार मुलाखत 'चिंटू' फेम प्रसिद्ध चारुहास पंडित यांनी घेतली.

**१६. दि. २६ जुलै २०१७ :**
**विशेष कार्यक्रम : सृजनरंग :**

पु. शि. रेगे यांच्या निवडक कविता आणि लघुकथांचे अभिवाचन महाराष्ट्र साहित्य कल्चरल सेंटरतर्फे करण्यात आले. तेव्हा शुभांगी दामले व प्रमोद काळे उपस्थित होते. हर्षद राजपाठक, वेदांत रानडे, ओमश्री बडगुजर, अमृता पटवर्धन, सचिन जोशी यांनी अभिवाचनात सहभाग घेतला.

**१७. दि. २९ जुलै २०१७ : लेखक तुमच्या भेटीला :**

या उपक्रमांतर्गत पुण्यातील पीईएस गर्ल्स एज्युकेशन शाळेच्या विद्यार्थिनींच्या भेटीला प्रसिद्ध संगणकतज्ज्ञ दीपक शिकारपूर यांना आमंत्रित केले होते. या वेळी मुख्याध्यापिका सुजाता तांबे उपस्थित होत्या. उज्ज्वला हतागळे व आदिती बोडस यांनी सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले.

**१८. दि. १० ऑगस्ट २०१७ :**
**कै. विलास शंकर रानडे स्मृती क्रीडा पुरस्कार समारंभ :**

'गाथा क्रीडातपस्वीची' (वैद्य म.द. करमरकर चरित्र) ह्या मनीषा बाठे लिखित ग्रंथाला व त्यांच्या कन्या वैशाली भट यांना कै. वि.शं. रानडे क्रीडा पुरस्कार प्रसिद्ध क्रिकेटपटू सदानंद



अनुक्रमणिका

मोहोळ यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. निवड समितीचे सदस्य मिलिंद ढमढेरे व शशिकांत भागवत हे होते. शशिकांत भागवत यांनी निवड समितीची भूमिका स्पष्ट केली. या प्रसंगी शुभदा कुंटे उपस्थित होत्या. मनीषा बाठे (लेखिका) यांनी पुरस्काराचे मनोगत व्यक्त केले. सदानंद मोहोळ यांनी अध्यक्षीय समारोप केला.

**१९. दि. ११ ऑगस्ट २०१७ : कथासुगंध :**

कथालेखिका डॉ. छाया महाजन यांच्या दोन कथांचे वाचन महाराष्ट्र कल्चरल सेंटरच्या हर्षद राजपाठक व सौदामिनी साने यांनी प्रभावीपणे केले. 'भ्रमरा' व 'मुलखावेगळा' या दोन कथांचे अभिवाचन त्यांनी केले. तसेच डॉ. छाया महाजन यांनी कथांमागची कथा उलगडून सांगितली व स्वतः 'देवघर' या लघुकथेचे वाचन केले.

**२०. दि. १२ ऑगस्ट २०१७ :**

वाचन जागर महोत्सवात शब्दांगण, रोहन प्रकाशन व महाराष्ट्र साहित्य परिषद या तीन संस्थांच्या सहकार्याने 'शोध अस्वस्थतेचा : मुलांच्या आत्महत्यांचा' या ज्वलंत विषयावर प्रा. मिलिंद जोशी यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. या वेळी मसापच्या कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, रोहन प्रकाशनाचे प्रतिनिधी व शब्दांगणचे लक्ष्मण राठीवडेकर व दीपक करंदीकर उपस्थित होते. परिसंवादात प्रा. वर्षा तोडमल (पालकांच्या भूमिकेतून), अतुल कहाते (संगणक युग व मुले), डॉ. संज्योत देशपांडे (मानसशास्त्र); राजीव तांबे (मुलांचे विश्व) या वक्त्यांनी आपले विचार प्रकट केले.

**२१. दि. १४ ऑगस्ट २०१७ :**
**डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृतिदिन :**

यंदाचा डॉ. जोगळेकर पुरस्कार डॉ. ल. रा. नसिराबादकर यांना डॉ. विलास खोले यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. त्यांची कन्या डॉ. सुनीता लेंगडे यांनी पुरस्कार स्वीकारला व यथोचित भाषण केले. या वेळी प्रा. डॉ. प्र. चिं. शेजवलकर, पराग जोगळेकर, उज्ज्वला जोगळेकर हे उपस्थित होते. डॉ. उज्ज्वला जोगळेकर, डॉ. शेजवलकर, डॉ. विलास खोले यांची यथोचित भाषणे झाली.

या सर्व कार्यक्रमाचे प्रास्ताविक, सूत्रसंचालन, परिचय, आभार मानणे इत्यादी कामे प्रा. मिलिंद जोशी, सुनीताराजे पवार, प्रकाश पायगुडे, दीपक करंदीकर, बंडा जोशी, माधव राजगुरू, उद्धव कानडे, प्रमोद आडकर, वि. दा. पिंगळे यांनी केली.

◆

कार्यवृत्त नोंद शब्दांकन
**दीपक करंदीकर**
कार्यवाह मसाप, पुणे

## चाळीसगाव शाखा

**१. ९०वे अ.भा. मराठी साहित्य संमेलन सहभाग :**

डोंबिवली येथे संपन्न झालेल्या ९०व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनास अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कार्यवाह बी.एल. ठाकरे यांचेसह काही आजीव सदस्यांनी शाखेच्या वतीने उपस्थिती दिली. शाखेचे सदस्य व अहिराणी कथाकार सुनील गायकवाड यांचे संमेलनात बोलीतील कथा या कार्यक्रमात अहिराणी कथाकथन तसेच बोलीभाषेच्या कट्ट्यात प्रा. अशोक वाबळे यांची अहिराणी कविता सादरीकरण, तसेच कवीकट्ट्यात गौतमकुमार निकम, राजेंद्र चिमणपुरे, मनोहर आंधळे या कवींचे काव्यवाचन सादर झाले.

**२. मराठी राजभाषा गौरव दिन :**

दि. २७ फेब्रुवारी २०१७ रोजी शाखेने राजभाषा दिन कार्यक्रम उत्साहाने पार पाडला. यावेळी सुनील गायकवाड लिखित 'गल्लूर' या कथासंग्रहाचे म.सा.प. पुणेचे विभागीय कार्यवाह तथा जिल्हा प्रतिनिधी प्राचार्य तानसेन जगताप यांचे हस्ते प्रकाशन करण्यात आले. नूतन लोकनियुक्त नगराध्यक्षा सौ. आशाताई चव्हाण तसेच शाखेचे काही आजीव सदस्य लोकप्रतिनिधी म्हणून निवडले गेले. त्यांचा जाहीर सत्कार व बहुमानप्राप्त सदस्यांचा सत्कार करण्यात आला. त्यात नगरसेविका सौ. योगिनी ब्राम्हणकार, नगरसेवक रामचंद्रजी जाधव, जि.प. सदस्य मा. शशिकांतजी साळुंखे, जि.प. सदस्या सौ. मोहिनी गायकवाड तसेच प्रा. डॉ. प्रकाश बाविस्कर, शालीग्राम निकम यांचा यथोचित सन्मान करण्यात आला.

याप्रसंगी भडगाव येथील प्राचार्य सुनील पाटील यांचे 'मराठी भाषा - मती आणि गती' या विषयावर व्याख्यान झाले. यात त्यांनी मराठीतील साहित्यिक व त्यांची लेखन शैली असा धागा धरून माहितीपूर्ण व्याख्यान दिले.

दि. १७/७/२०१७ रोजी शाखेने आपल्या स्वतःच्या कार्यालयात पहिले पाऊल टाकले. याच दिवशी कलशपूजनाचा उत्तम कार्यक्रम पार पडला.

शाखेच्या रीतसर पूर्ण व्यवस्थापनाच्या व प्रशासकीय कार्यक्रमास प्रारंभ झाला आहे. शाखेचे कार्यालय २०×१० असे आहे.

स्वतंत्र कार्यालय सुरू झाल्यामुळे कामांना फारच गती मिळाली आहे. ३०/७/२०१७ रोजी 'एक कवयित्री, एक कवी' असा माया धुप्पड व अशोक कोळी यांचा कार्यक्रम आयोजित केला आहे.

## शाखा जळगाव

जळगाव (दि. २५) साहित्याविषयीची आस्था असणाऱ्या सर्वांनी एकत्र येऊन दर महिन्याला चर्चा आणि कार्यक्रम घडवून आणावेत, नवागतांना प्रेरणा मिळावी यासाठी साहित्यदीप महाराष्ट्र परिषद जळगावच्या वतीने कार्यक्रम घेतले जाणार आहेत अशी माहिती डॉ. किसन पाटील यांनी दिली. यावेळी वर्षभर घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमाविषयीचे भूमिकाकथन डॉ. प्रकाश सपकाळे यांनी केले. पुढील काळात लेखन कार्यशाळा, व्याख्याने, पुस्तक चर्चा, मुलाखती, पुस्तक प्रकाशने, परिसंवाद अशा स्वरूपाचे कार्यक्रम घेणार असल्याची माहिती त्यांनी दिली. यावेळी मोहम्मद उमर यांच्या 'अमिना' या सुखदेव वाघ यांनी अहिराणी बोलीत अनुवादित केलेल्या कादंबरीचे प्रकाशन प्रा. सी.एस. पाटील, डॉ. किसन पाटील, डॉ. प्रकाश सपकाळे, चंद्रकांत भंडारी यांच्या हस्ते करण्यात आले. वर्षभर विविध कार्यक्रम आयोजित करण्याचा मानस यावेळी मान्यवरांनी व्यक्त केला. यावेळी आयोजित कविसंमेलनाच्या अध्यक्षस्थानी रा.शे. साळुंखे होते. यात विशाल पाटील, गोविंद देवरे, भीमराव सोनवणे, प्रफुल्ल पाटील, उदय येशे, गणेश सूर्यवंशी, आर.डी. चव्हाण, गोविंद पाटील, श.मु. चौधरी, रफीक पटवे, डॉ. प्रकाश सपकाळे, डॉ. किसन पाटील यांनी आपल्या कविता सादर केल्या.

## शाखा पश्चिम (मनोरमा शाखा) सोलापूर

**१. दि. १४ मे २०१७ :** या शाखेचा उद्‌घाटन समारंभ संपन्न झाला. या कार्यक्रमास श्री. प्रकाश पायगुडे (प्रमुख कार्यवाह, मसाप, पुणे), श्री. मिलिंद जोशी (कार्याध्यक्ष, मसाप, पुणे), श्रीमती निर्मलाताई ठोकळ (उपाध्यक्षा, मसाप पुणे), सौ. सुनिताराजे पवार (कार्याध्यक्ष, मसाप, पुणे) यांच्या शुभहस्ते व डॉ. इरेश स्वामी (माजी कुलगुरू सोलापूर विद्यापीठ), डॉ. द. ता. भोसले (ज्येष्ठ साहित्यिक), श्री. राजा माने (संपादक, लोकमत सोलापूर), श्री. सुनील शिनखेडे (सहा. संचालक आकाशवाणी प्रतिनिधी), श्री. कल्याण शिंदे (सोलापूर जिल्हा प्रतिनिधी), ॲड. जे. जे. कुलकर्णी (सोलापूर जिल्हा प्रतिनिधी), श्री. कल्याण शिंदे (सोलापूर जिल्हा प्रतिनिधी), डॉ. संजीवनी तडेगावकर, ज्येष्ठ कवयित्री यांच्या प्रमुख उपस्थितीत व श्री. श्रीकांत मोरे (अध्यक्ष, मसाप शाखा पश्चिम (मनोरमा शाखा) सोलापूर यांच्या प्रमुख मार्गदर्शनाखाली उद्‌घाटन सोहळा पार पडला.

**२.** महाराष्ट्रातील नामवंत व्यंगचित्रकार व वात्रटिकाकार कै. नागेशराव सुरवसे यांच्या स्मरणार्थ सोलापूरमधील वृत्तपत्र छायाचित्रकार किंवा चित्रकार यांना देण्यात येणाऱ्या प्रथम पुरस्काराचे मानकरी श्री. यशवंत सादुल यांचा रोख रक्कम, शाल, सन्मानचिन्ह, मानपत्र देऊन सत्कार करण्यात आला. यावेळी सोलापूर जिल्ह्यातील मसापच्या १४ शाखांमधील अध्यक्ष व कार्याध्यक्ष यांचा शाल, रोपटे, सन्मानचिन्ह देऊन सत्कार करण्यात आला. तसेच उपस्थित कवींचे काव्यसंमेलन सादर करण्यात आले.

**३. रविवार दि. ४ जून २०१७ :** मसाप शाखा पश्चिम (मनोरमा शाखा) सोलापूरचे अध्यक्ष श्री. श्रीकांत मोरे यांच्या अध्यक्षतेखाली पहिल्या काव्यमैफलीचा कार्यक्रम पार पडला. दरमहा साहित्यिक विषयावर चर्चा-विचार विनिमय तसेच साहित्यिक कार्यक्रम करण्याचे ठरले. या वेळी श्री.श्रीकांत मोरे, अध्यक्ष, सौ. शोभा मोरे, उपाध्यक्षा, सौ. अस्मिता गायकवाड, कार्याध्यक्षा, श्री. प्रकाश भोसले व संतोष सुरवसे, कार्यवाह, कोषाध्यक्षा व सचिव सौ. शिल्पा कुलकर्णी, सहसचिव श्री. सुनील पाटील, तसेच कार्यकारिणी सदस्य डॉ. राजशेखर शिंदे, प्रा. माधव कुलकर्णी, श्री. नीलकंठ करंडे, श्री. शिवाजी ठाकरे, चाँदबीबी शेख, श्री. प्रशांत पाटील, श्री. पुरुषोत्तम साखरे, सौ. नयना भोसले, श्री. अजय मोरे हे उपस्थित होते.

## शाखा पाटण

१. १६/९/२०१६ रोजी मसाप पाटण शाखेतील प्रा. डॉ. सौ. रामकली पावसकर यांच्या 'सांज सावल्या' व 'मराठी कविता प्रवृत्ती आणि प्रवाह', श्री. ए. व्ही. देशपांडे संपादित 'कोयनाकाठच्या कविता', प्रा. डॉ. एस. डी. पवार यांच्या 'गांधीवाद व मार्क्सवादाचा समन्वय' आणि श्री. बवनराव कोळी यांच्या 'कोयनाकाठचा फरारी' या कादंबरीचे प्रकाशन प्रा. डॉ. चंद्रकांत पोतदार, प्रसिद्ध कवी, कोल्हापूर, मा. मिलिंद जोशी कार्याध्यक्ष, मसाप पुणे, सातारा जिल्हा प्रतिनिधी मा. रवींद्र बेडकिहाळ यांच्या शुभहस्ते झाले.

२. दि. ८ व ९ ऑक्टोबर २०१६ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, शाखा पाटण आणि बाळासाहेब देसाई कॉलेज पाटण यांच्या संयुक्त विद्यमाने भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५व्या जयंती वर्षानिमित्त त्यांच्या विचारस्मृतीस समर्पित विभागीय मराठी साहित्य संमेलन आयोजित केले गेले.

३. २४/१/२०१७ रोजी 'रंग कवितेचे' हे कवी संमेलन आयेजित केले गेले.

४. २५/१/२०१७ रोजी प्रा. महेश गायकवाड यांचे 'साहित्याचे जीवनातील स्थान' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले.

५. महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा पाटण आणि महाराष्ट्र कवी यशवंत प्रतिष्ठान, चाफळ यांच्या संयुक्त विद्यमाने शुक्रवार दि. ९/३/२०१७ रोजी दु. १ वाजता कवी यशवंत प्रतिष्ठान, चाफळ येथे नवोदित कवींच्या काव्यसंमेलनाचे आयोजन केले.



अनुक्रमणिका

## शाखा कल्याण

**१.** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा कल्याण आणि सार्वजनिक वाचनालय कल्याण यांचे संयुक्त विद्यमाने महाराष्ट्राचे लाडके विनोदी लेखक, कल्याणभूषण कै. वि. आ. बुवा यांचा जन्मदिवस दि. ४ जुलै २०१६ रोजी सार्वजनिक वाचनालय कल्याणच्या सभागृहात संपन्न झाला. प्रसंगी प्रमुख पाहुणे म्हणून इतिहास संशोधन मंडळ कल्याणचे अध्यक्ष प्रा. श्री. जितेंद्र भामरे हे उपस्थित होते.

प्रसंगी बुवांच्या अनेक चाहत्यांनी त्यांच्या आठवणींना उजाळा दिला तर तरुणांनी बुवांच्या विनोदी कथांचे वाचन केले. महाराष्ट्र साहित्य परिषद, कल्याण शाखेचे कार्याध्यक्ष श्री. भिकू बारस्कर यांनी वि. आ. बुवांचे उचित स्मारक कल्याणमध्ये व्हावे अशी मागणी केली. यावेळी सार्वजनिक वाचनालय, कल्याणचे अध्यक्ष श्री. राजीव जोशी, ज्येष्ठ लेखक व महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष जनार्दन ओक यांनी आपले विचार मांडले. सूत्रसंचालन सौ. वंदना सहस्रबुद्धे यांनी केले.

**२. शनिवार दि. १३ ऑगस्ट २०१६** रोजी 'अत्रे अत्रे सर्वत्र' हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला.

कार्यक्रमात एकूण १८ जणांनी भाग घेतला होता. त्यातील काही नावे पुढीलप्रमाणे :

१. अनुश्री फडणीस : लेखाचे वाचन
२. श्री. अरविंद बुधकर : स्वरचित विडंबन
३. श्री. प्रवीण देशमुख : झेंडूची फुले
४. सौ. स्वाती नातू : अग्रलेख
५. सौ. प्रणिता जोशी : विनोदांचे वाचन
६. श्री. सुनील जोशी : घरावाहेरील नाट्यप्रवेश

अशा प्रकारे अत्र्यांच्या साहित्यावर आधारित वेगवेगळ्या प्रकारात कार्यक्रम सादर केले.

**३. रविवार दि. २१ ऑगस्ट २०१६** रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद आयोजित 'श्रावणसरी' हा कार्यक्रम करण्यात आला. या कार्यक्रमात पावसावर आधारित कविता सादर करण्यात आल्या. कार्यक्रमाला परी बांदेकर, दीपाली भोसले, सौ. स्वाती नातू, श्री. प्रमोद शिंदे, श्री. प्रवीण देशमुख यांच्यासह १८ कवींनी भाग घेतला होता.

**४.** महाराष्ट्र साहित्य परिषद, कल्याण शाखा व सार्वजनिक वाचनालय, कल्याण व ९०व्या मराठी साहित्य संमेलनाचे आयोजक आगरी युथ फोरम यांच्या संयुक्त विद्यमाने कल्याणच्या शारदा मंदिराच्या प्रांगणात विद्यार्थी साहित्य संमेलन आयोजित करण्यात आले.

मराठी भाषेच्या नावाने गळे काढणारा उच्चभ्रू समाज इंग्रजी माध्यमाचा पुरस्कर्ता आहे. आपल्या बोलीभाषेतून जो मराठी भाषा जगतो, तो खरा गावाकडचा माणूस, मग तो शेतकरी, वारकरी, महानुभाव यापैकी कोणीही असेल. मराठी भाषा खऱ्या अर्थाने ग्रामीण भागातच जोपासली जात आहे. जोपर्यंत गावाकडचा माणूस तिची अस्मिता जोपासत आहे, तोपर्यंत मराठी भाषेला मरण नाही, असे प्रतिपादन अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी यांनी केले.

याप्रसंगी महापौर मा. राजेंद्र देवळेकर, आमदार मा. नरेंद्र पवार, अभिनेत्री सोनाली खरे, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. भिकू बारस्कर, स्वागताध्यक्ष मिलिंद कुलकर्णी, मराठी साहित्य परिषद, कल्याणचे अध्यक्ष श्री. जनार्दन ओक, सुरेश देशपांडे, कल्याण जनता सहकारी बँकेचे श्री. मोहन आघारकर, ९१व्या साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष गुलाबराव वझे आदी मान्यवर उपस्थित होते.

विद्यार्थी साहित्य संमेलनाच्या निमित्ताने सार्वजनिक वाचनालय ते संमेलन स्थळ असलेले शारदा विद्यामंदिर अशी भव्य ग्रंथदिंडी काढण्यात आली. टाळ, मृदंग, ढोल, ताशा आणि लेझीम पथकांच्या निनादाने यावेळी कल्याण नगरी दुमदुमली. या ग्रंथदिंडीत २८ शाळांचे विद्यार्थी लेझीम पथकांसह सहभागी झाले होते.

**५. रविवार दि. ५ मार्च २०१७** रोजी महिला दिनानिमित्त 'कर मन मोकळे मोकळे' चारोळ्यांचा बहारदार कार्यक्रम आयोजित करण्यात आला. यात सौ. श्रद्धा वझे, सौ. अपर्णा बनगरे, सौ. संजीवनी कांबळे, सौ. रेश्मा मेहता यांच्यासह १८ महिलांनी चारोळ्या सादर केल्या.

**६. रविवार दिनांक २३ एप्रिल २०१७** रोजी 'काव्य ऋतुरंग' हा कार्यक्रम वसंत ऋतूचे औचित्य साधून काव्य रसिकांसाठी खास नजराणा आयोजित करण्यात आला. कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे सुप्रसिद्ध कवी-लेखक मा. श्री. राजीव जोशी व सुप्रसिद्ध गझलकार श्री. प्रशांत वैद्य उपस्थित होते. या कार्यक्रमांत १५ नामवंत कवींनी प्रत्येक ऋतूंवरील कविता सादर केली.

**७. रविवार २८ मे २०१७** रोजी 'माझ्या जीवनातील अविस्मरणीय क्षण' हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. प्रत्येकाच्या जीवनात अशा काही घटना घडतात की, त्या आयुष्यभर मनात घर करून राहतात. अशाच घटनांवर आधारित सौ. रेश्मा मेहता, श्री. भिकू बारस्कर, सौ. सुरेखा गावंडे, श्री. राजीव जोशी यांच्यासह १५ जणांनी आपले अविस्मरणीय क्षण सादर केले.



अनुक्रमणिका

## शाखा डोंबिवली

**१. कवी केशवसुत स्मृतिदिन :** रविवार दि. ६ नोव्हेंबर २०१६ रोजी अर्वाचीन कवितेचे जनक आणि एकूणच कवितेच्या आशय, विषयांत आमूलाग्र बदल घडविणारे युगप्रवर्तक कवी केशवसुत यांच्या स्मृतिदिनाचा कार्यक्रम, म.सा.प. डोंबिवली शाखेने आयोजित केला होता. यावेळेस सर्वश्री दामोदर मोरे, राजीव जोशी, हेमंत राजाराम, प्रवीण दामले, दया घोंगे, गजानन गावंड, किरण सोनावणे, जयंत कुलकर्णी, अरुण गवळी, तसेच सुलभ कोरे, वृंदा कौजाल्गुकार, मृणाल केळकर, प्रज्ञा कुलकर्णी, लीला शाह, अनसूया कुंमार या पंधरा कवींनी स्वतःची एक कविता आणि त्याचबरोबर केशवसुतांची एक कविता सादर केली. त्यामुळे केशवसुतांच्या कवितांचा आस्वाद श्रोत्यांना घेता आला. 'केशवसुतांची कविता-आजच्या संदर्भात' या विषयावर नीलकंठ कदम यांचे भाषण झाले. अध्यक्ष श्री. वामनराव देशपांडे यांनी केशवसुतांच्या कवितेतील सौंदर्य उलगडून दाखविले.

**२. कथारंभ.. एक नवीन सुरुवात! :** शनिवार दि. ८ एप्रिल २०१७ रोजी मसाप डोंबिवली शाखेतर्फे 'कथारंभ.. एक नवीन सुरुवात..!' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. ४०-४५ वर्षांपूर्वी द.मा. मिरासदार, शंकर पाटील आणि व्यंकटेश माडगूळकर या तिघांनी आपल्या कथाकथनाने संपूर्ण महाराष्ट्र गाजविला होता. त्यानंतर व. पु. काळे, शं.ना. नवरे यांनी ती प्रथा पुढे चालू ठेवली होती; परंतु कथाकथन ही परंपरा काहीशी खंडित झाल्यासारखीच आहे. त्या परंपरेला उजाळा देण्याचा प्रयत्न सुरेश देशपांडे, विलास सुतावणे आणि वसंत भूमकर यांनी केलाय. सुरेश देशपांडे यांनी स्वतःची 'सर्पराज' ही गूढकथा तर सुतावणे यांनी शं.ना. नवरे यांची 'चिखल' आणि भूमकर यांनी त्यांचीच 'शीळ' ही कथा सादर केली.

## शाखा इस्लामपूर

**दि. ५ जून २०१६ : वर्धापन दिन व सत्कार समारंभ**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा इस्लामपूरचा वर्धापनदिन व सत्कार समारंभ राजारामबापू पाटील ज्ञानप्रबोधिनीच्या सभागृहात संपन्न झाला. या कार्यक्रमाचे प्रमुख अतिथी अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. श्रीपाल सबनीस हे होते. या कार्यक्रमात साहित्य क्षेत्रातील नामवंत व्यक्तींचा त्यांच्या उचित कार्याबद्दल व सन्माननीय निवडीबद्दल सत्कार करण्यात आला. यामध्ये म.सा.प.चे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, उपाध्यक्ष डॉ. तारा भवाळकर, कार्यवाह मा. प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सौ. सुनिताराजे पवार, प्रा. वैजनाथ महाजन, प्रा. दशरथ पाटील, प्रा. शामराव पाटील या मान्यवरांचा सत्कार करण्यात आला. या समारंभात सर्वच मान्यवरांनी आपली मनोगते व्यक्त केली. या कार्यक्रमांचे स्वागत व प्रास्ताविक शाखेचे अध्यक्ष प्रा. प्रदीप पाटील यांनी केले तर सूत्रसंचालन प्रा. दशरथ पाटील यांनी केले. आभार प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांनी मानले.

**दि. ३ जुलै २०१६ : श्रद्धांजली**

महाराष्ट्रातील प्रसिद्ध साहित्यिक डॉ. रा. चिं. ढेरे व प्रा. रा.ग. जाधव यांच्या निधनाबद्दल श्रद्धांजलीचा कार्यक्रम शाखेच्या कार्यालयात संपन्न झाला. या कार्यक्रमाचे अध्यक्ष प्रसिद्ध कवी प्रा. प्रदीप पाटील हे होते. यावेळी प्रा. वि. द. कदम, डॉ. दीपा देशपांडे, डॉ. दीपक स्वामी, प्रा. राजा माळगी या मान्यवरांनी आपली मनोगते व्यक्त केली.

**दि. ६ जुलै २०१६ : महाकवी कालिदास साहित्य महोत्सव व कवी संमेलन**

राजारामबापू ज्ञानप्रबोधिनीच्या सभागृहात महाकवी कालिदास साहित्य महोत्सव संपन्न झाले. कवी संमेलनाचे अध्यक्षपद कवी भीमराव धुळबुळ यांनी भूषविले. महाराष्ट्रातील अनेक मान्यवर कवींनी आपल्या कविता सादर केल्या.

**दि. १४ जुलै २०१६ : प्राचार्य शरद भोसले स्मृतिदिन**

म.सा.प.चे माजी अध्यक्ष प्राचार्य शरद भोसले यांचा स्मृतिदिन म.सा.प.शाखेच्या कार्यालयात संपन्न झाला. या कार्यक्रमाचे प्रमुख अतिथी प्रसिद्ध वक्ते अनिल खटावकर हे होते. त्यांनी 'संतसाहित्याचे महत्व' या विषयावर आपले मौलिक विचार मांडले.

**दि. १३ नोव्हेंबर २०१६ : पुस्तक प्रकाशन समारंभ**

म.सा.प.शाखेच्या वतीने कवी रमेश खंडागळे यांच्या 'सल' या कविता संग्रहाचा प्रकाशन समारंभ प्रसिद्ध कवी भरत दौंडकर यांच्या शुभहस्ते संपन्न झाला. या कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान प्राचार्या डॉ. दीपा देशपांडे यांनी भूषविले.

**दि. १० डिसेंबर २०१६ : आचार्य शंकरराव जावडेकर स्मृतिदिन**

अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष आचार्य शंकरराव जावडेकर यांचा स्मृतिदिन शाखेच्या सभागृहात आयोजित करण्यात आला. या कार्यक्रमाच्या प्रमुख अतिथी प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांनी आचार्य जावडेकरांच्या साहित्यिक व एकूण कार्याचा आढावा घेऊन त्यांच्या अनेक आठवणी सांगितल्या. या समारंभाचे अध्यक्षस्थान प्रा. शामराव पाटील यांनी भूषविले.

**दि. १ डिसेंबर २०१६ : श्रद्धांजली व शोकसभा**

ज्येष्ठ समीक्षक आनंद यादव यांच्या निधनाबद्दल श्रद्धांजली व शोकसभेचा कार्यक्रम शाखेच्या वतीने आयोजित करण्यात आला. या कार्यक्रमात प्रा. व्ही. डी. कदम, प्रा. राजा माळगी, प्रा. नामदेव क्षीरसागर, डॉ. दीपक स्वामी, प्रा. दि. बा. पाटील, प्राचार्य विश्वास सायनाकर, प्रा. प्रदीप पाटील यांनी आपली मनोगते व्यक्त करून श्रद्धांजली वाहिली.

**दि. २२ डिसेंबर २०१६ : शाहीर पठ्ठे बापूराव स्मृतिदिन :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, राजारामबापू ज्ञानप्रबोधिनी व जागर साहित्य कला मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने शाहीर पठ्ठे बापूराव यांच्या स्मृतिदिनाचे आयोजन करण्यात आले. या कार्यक्रमाचे प्रमुख अतिथी डॉ. दीपक स्वामी यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**दि. ६ जानेवारी २०१७ : पुस्तक प्रकाशन व सत्कार समारंभ**

म.सा.प. शाखा इस्लामपूर, राजारामबापू पाटील ज्ञानप्रबोधिनी व जागर साहित्य कला मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने ज्येष्ठ साहित्यिक प्रा. चंद्रकुमार नलगे यांच्या 'कोण पुसणार त्यांची आसवं', 'कुणी घर देता का घर' या ग्रंथाचे प्रकाशन प्राचार्य विश्वास सायनाकर यांचे शुभहस्ते प्रकाशन करण्यात आले. या समारंभ प्रसंगी 'मनोरमा' सोलापूर या संस्थेच्या वतीने 'जीवनगौरव' हा पुरस्कार दिल्याबद्दल प्रा. चंद्रकुमार नलगे व यशवंतराव चव्हाण सांस्कृतिक संस्था, पेठ यांच्या वतीने देण्यात येणारा 'सहकार भूषण' पुरस्कार प्राप्त केल्याबद्दल प्रा. शामराव पाटील यांचा सत्कार करण्यात आला.

**२२ जानेवारी २०१७ : २४ वे साहित्य संमेलन**

महाराष्ट्र साहित्य परिषद व राजारामबापू ज्ञानप्रबोधिनी शाखा इस्लामपूर यांच्या संयुक्त विद्यमाने २४ वे मराठी साहित्य संमेलन शाखेच्या सभागृहात संपन्न झाले. या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष सुप्रसिद्ध साहित्यिक व आकाशवाणी निवेदक मा. डॉ. महेश केळूसकर, मुंबई हे होते.

या संमेलनात डॉ. चंद्रशेखर चिंगरे, पुणे यांच्या 'ऊर्जारूप आणि साहित्य समीक्षा' श्री. कैलास सलादे, वडनेर भैरव जि. नाशिक यांच्या 'दाहगाथा' या काव्यसंग्रहास लोकनेते राजारामबापू पाटील राज्यस्तरीय उत्कृष्ट वाङ्मय निर्मिती पुरस्कार देऊन त्यांना सन्मानित करण्यात आले. या कार्यक्रमाचे उद्घाटन प्रसिद्ध साहित्यिक प्रा. डॉ. मधुकर हसमनीस यांच्या हस्ते करण्यात आले. त्याचबरोबर प्रसिद्ध कवी राजेंद्र टिळे व शहानवाज मुल्ला यांचा औदुंबर येथील सुधांशु पुरस्कार प्राप्त केल्याबद्दल साहित्य परिषदेच्या वतीने त्यांचा सत्कार करण्यात आला.

साहित्य संमेलनाच्या दुसऱ्या सत्रात 'व्यक्तिमत्त्व विकासातील वाचनाचे स्थान' या विषयावर प्रा. वैजनाथ महाजन यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद संपन्न झाला. या परिसंवादात प्रा. विष्णू वासमकर, श्री. सुभाष कवडे, प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांनी सहभाग घेतला . या सत्राचे स्वागत व प्रास्ताविक श्री. धोंडीराम सलगर यांनी केले, तर आभार प्रा. सुभाष खोत यांनी मानले.

साहित्य संमेलनाच्या तिसऱ्या सत्रात कवी संमेलनाचा बहारदार कार्यक्रम संपन्न झाला. हिमांशु स्मार्त यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या कवी संमेलनात वसंत पाटील, भीमराव धुळबुळू, विठ्ठल मोहिते, मनीषा पाटील, निर्मला लोंढे, डॉ. भीमराव पाटील, दया सागर बन्ने, सुरेश मोहिते, मंगल कोकाटे, शहानवाज मुल्ला, डॉ. सुरज चौगुले, सौ. नंदिनी साळुंखे-पाटील, रवि बावडेकर, वैजयंती पेठकर, प्रा. प्रदीप पाटील, डॉ. दीपक स्वामी इ. मान्यवर व नवोदित कवींनी आपल्या कविता सादर केल्या.

साहित्य संमेलनाच्या चौथ्या सत्रात सर्व मान्यवरांच्या उपस्थितीत साहित्य संमेलनाचा समारोप करण्यात आला.

**दि. ६ जून २०१७ :** महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा, इस्लामपूर या शाखेचा वर्धापन दिन मंगळवार दि. ६ जून २०१७ रोजी सायं. ६.०० वा. राजारामबापू ज्ञानप्रबोधिनी सभागृहात संपन्न झाला. ग्रामीण कथाकार श्री. रंगराव बापू पाटील सदर कार्यक्रमाचे अध्यक्ष होते. या प्रसंगी या शाखेचे कार्यवाह प्रा. अरुण घोडके यांना ठाणे येथील 'पश्चिम महाराष्ट्र भूषण' हा पुरस्कार प्राप्त झाल्याबद्दल त्यांचा यथोचित सत्कार प्रा. डॉ. मधुकर हसवनीस यांच्या हस्ते करण्यात आला. या प्रसंगी शाखेचे अध्यक्ष प्रा. प्रदीप पाटील, प्रा. शामराव (अण्णा)पाटील, सांगली जिल्हा प्रतिनिधी प्रा. दशरथ पाटील, इ. सर्व मान्यवर उपस्थित होते. सदर कार्यक्रमाचे आभार प्राचार्य दीपा देशपांडे यांनी मानले.

**दि. १४ जुलै २०१७** रोजी राजारामबापू ज्ञानप्रबोधिनीच्या सभागृहात प्राचार्य शरद भोसले यांच्या स्मृतिदिन निमित्त सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाचे मराठी विभागप्रमुख प्रा. डॉ. अविनाश आवळगांवकर यांचे 'सद्यःस्थितीत संतसाहित्याची आवश्यकता' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले. कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानी मा. प्रा. शामराव पाटील (आण्णा) होते. स्वागत व प्रास्ताविक प्रा. प्रदीप पाटील यांनी करून दिला. या कार्यक्रमास ॲड. बी. एस. पाटील, प्राचार्य विश्वास सायनाकर इ. मान्यवर उपस्थित होते. कार्यक्रमाचे आभार प्रा. श्रीकांत भोसे यांनी मानले. सूत्रसंचालन सौ. वृषाली आफळे यांनी केले.

## शाखा सोलापूर (मुख्य शाखा)

महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखेच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त मसाप, सोलापूर शाखा व डॉ. निर्मलकुमार फडकुले प्रतिष्ठान, सोलापूर यांचे संयुक्त विद्यमाने- दि. ११ ते १५ जानेवारी २०१७ या कालावधीत कैलास भिंगारे यांनी संकलित केलेल्या व्यंगचित्रांचे प्रदर्शन डॉ. फडकुले संकुल, सोलापूर येथे आयोजित करण्यात आले. या प्रदर्शनाचे उद्घाटन दि. ११ रोजी माजी केंद्रीय गृहमंत्री सुशीलकुमार शिंदे यांच्या हस्ते पार पडले.

यावेळी सोलापुरातील व्यंगचित्रकारांचा सत्कार करण्यात आला. तसेच डॉ. अब्दुल कलाम यांच्या कार्यावर आधारित लघुपट दाखवण्यात आला. या प्रदर्शनात जगविख्यात व्यंगचित्रकार आर. के. लक्ष्मण, शिवसेनाप्रमुख बाळासाहेब ठाकरे, वसंत सरवटे, शि. द. फडणीस, ज्ञानेश सोनार, विकास सबनीस, प्रभाकर झळके, विजय पराडकर, संजय मिस्त्री, प्रशांत कुलकर्णी, सुरेश लोटलीकर यांनी रेखाटलेली व्यंगचित्रे उपलब्ध करून देण्यात आली होती. प्रदर्शनाच्या अखेरच्या दिवशी परिसंवादात पत्रकार अमोल अंकुलकर, श्रीकांत सावळे, चित्रकार हेमंत कपुरे यांचा सहभाग होता.

**राम गणेश गडकरी पुण्यतिथी :**

राम गणेश गडकरी यांच्या ९८व्या पुण्यतिथीनिमित्त दि. २३ जानेवारी २०१७ रोजी विनय हर्डीकर, पुणे (पत्रकार, लेखक, संपादक) यांच्या व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले. व्याख्यानाचा विषय 'दोन महान नाटककार : राम गणेश गडकरी आणि विल्यम शेक्सपिअर' हा होता. राम गणेश गडकरी म्हणजे महाराष्ट्राचे शेक्सपिअर असे प्रतिपादन यावेळी विनय हर्डीकर यांनी

केले. मसापचे अध्यक्ष डॉ. सुहास पुजारी यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले. कार्यवाह ॲड. जे. जे. कुलकर्णी, कार्यवाह बाबूराव मैंदर्गीकर यावेळी मंचावर उपस्थित होते.

**मराठी भाषा दिन कार्यक्रम :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर व सोलापूर विद्यापीठ यांच्या संयुक्त विद्यमाने कवी कुसुमाग्रज जयंतीनिमित्त मराठी भाषा गौरव दिन साजरा करण्यात आला. कार्यक्रमाच्या सुरुवातीला ग्रंथदिंडीचे आयोजन करण्यात आले होते. यावेळी माजी निवडणूक आयुक्त नीला सत्यनारायण यांच्या व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले.

**जागतिक महिला दिनानिमित्त व्याख्यान :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखेच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त जागतिक महिला दिनाच्या निमित्ताने दिनांक १२ मार्च २०१७ रोजी डॉ. निर्मलकुमार फडकुले सभागृह, सोलापूर येथे ज्येष्ठ साहित्यिका व ग्रामीण कथालेखिका डॉ. प्रतिमा इंगोले, पुणे यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले. यावेळी मसाप, सोलापूर शाखेने महिलांसाठी आयोजित केलेल्या कथास्पर्धेचा निकाल जाहीर करण्यात आला व विजेत्या स्पर्धकांना पारितोषिक वितरीत करण्यात आले. प्रथम पारितोषिक मसापचे कार्यवाह व्यंकटेश नुले यांचे स्मरणार्थ देण्यात आले. कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानी माजी आमदार व मसाप, पुणे उपाध्यक्षा निर्मला ठोकळ या होत्या.

**अभिनेते जयंत सावरकर यांचा सत्कार :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखेच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त प्रसार भारती, आकाशवाणी, सोलापूर व महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने दिनांक २५ मार्च २०१७ रोजी अभिनेते जयंत सावरकर, मुंबई यांचा सत्कार व 'माझा नाट्यप्रवास...' हा आत्मकथनाचा कार्यक्रम आयोजित केला. सोलापूर आकाशवाणीचे कार्यक्रम अधिकारी, सुनील शिनखेडे यांनी स्वागत करून कार्यक्रमाचा हेतू विशद केला. मसापचे अध्यक्ष डॉ. सुहास पुजारी यांनी प्रास्ताविक केले. ॲड. जे. जे. कुलकर्णी यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. पुणेरी पगडी, सोलापुरी चादर, पुष्पहार, व पुष्पगुच्छ देऊन जयंत सावरकर यांचा सत्कार करण्यात आला. मसापचे उपाध्यक्ष दत्ताअण्णा सुरवसे यांनी श्रीगणेशाची मूर्ती भेट दिली. या वेळी जयंत सावरकर यांनी आपल्या नाट्य व चित्रपट जीवनाचा प्रवास कथन करून नाट्यक्षेत्रात आलेले विविध अनुभव व किस्से सांगितले.

## शाखा रहिमतपूर

**दि. २९/१/२०१६ : स्व. वसंत कानेटकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त जिल्हास्तरीय एकपात्री नाट्याभिनय स्पर्धा:**

**गट - इयत्ता ८वी ते १०वी - १६ स्पर्धकांचा सहभाग :**

प्रथम क्रमांक : वसुधा सुरेश कदम - कन्या शाळा, सातारा; द्वितीय क्रमांक : श्रेया संजय रावखंडे-कन्या शाळा, सातारा; तृतीय क्रमांक : प्रतिक्षा सुधीर चव्हाण, कन्या प्रशाला, रहिमतपूर.

**गट - इयत्ता ११वी ते खुला - ११ स्पर्धकांचा सहभाग -**

प्रथम क्रमांक : संतोष पाटील, कराड; द्वितीय क्रमांक : गणेश प्रकाश पाटील, कराड; तृतीय क्रमांक : आकाश प्रशांत पाटील, सातारा.

तुषार भद्रे- ज्येष्ठ रंगकर्मी, निवेदक व चंद्रकांत कांबीरे - नाट्यअभिनेते यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

**३० जानेवारी २०१६ :**

स्व. वसंत कानेटकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त सातारा जिल्ह्यातील साहित्यिक व नाट्यप्रेमींचा स्नेहमेळावा व जिल्हास्तरीय एकपात्री नाट्याभिनय स्पर्धेतील विजेत्यांचा गुणगौरव सोहळा ३० जानेवारी २०१६ रोजी संपन्न झाला.

प्रमुख पाहुणे : मा. अविनाश देशमुख, सुप्रसिद्ध नाट्यअभिनेते, अध्यक्ष : प्रा. नितीन बानुगडे-पाटील, 'शंभुराजे' महानाट्य निर्माते-लेखक-दिग्दर्शक; स्वागताध्यक्ष - मा. सुनील गुलाबराव माने, माजी अध्यक्ष, म.सा.प.शाखा- रहिमतपूर; विशेष उपस्थिती : मा. प्रा. व. बा. बोधे, ग्रामीण कथाकार; मा. सौ. सुनिताराजे पवार, कोषाध्यक्ष, मसाप पुणे; मा. रविंद्र बेडकिहाळ, मसाप सातारा जिल्हा प्रतिनिधी; प्रा. डॉ. यशवंत पाटणे, व्याख्याते-लेखक; मा. नितीन हंबीरराव माने, संचालक हिंदुस्थान फिडस् सातारा.

**५ सप्टेंबर २०१६ : शिक्षक दिन**

डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांच्या प्रतिमेचे पूजन. रहिमतपूर व परिसरातील सेवानिवृत्त शिक्षकांचा सत्कार सोहळा. प्रमुख पाहुणे - मा. हणमंतराव भोसले, उपाध्यक्ष, पुणे विद्यार्थी गृह.

**१५ ऑक्टोबर २०१६ : वाचन प्रेरणादिन**

डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या जयंतीनिमित्त वाचन प्रेरणादिनाचे नियोजन करण्यात आले. शालेय विद्यार्थ्यांना बालपणापासून वाचनाची आवड निर्माण व्हावी, वाचन संस्कृती त्यांच्या अंगी रुजावी या उद्देशाने साहित्य परिषदेच्या वतीने वाचन प्रेरणादिनाचे आयोजन करण्यात आले होते.

**४/१२/२०१६ : कवी गिरीश पुण्यतिथी**

स्पर्धा परीक्षा अभ्यासिका शुभारंभ व ग्रंथ प्रदर्शन, प्रमुख पाहुणे : मा. अभिजीत भोसले, विक्रीकर अधिकारी, मा. अनिल महामुनी, मंडल कृषी अधिकारी, मा. अभिजीत माने, वनअधिकारी.

**३० जानेवारी २०१७ : स्व. वसंत कानेटकर स्मृतिदिन**

प्रतिमा पूजन व वसंत कानेटकर यांच्या नाटकांचा परिचय.

## शाखा मंगळवेढा

मसाप शाखा मंगळवेढा आणि सप्तर्षी प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने राज्यस्तरीय साहित्य पुरस्काराचे आयोजन करण्यात आले होते. या पुरस्कारांचा वितरण सोहळा १५ मार्च २०१७ रोजी मरवडे ता. मंगळवेढा येथे संपन्न झाला. ज्येष्ठ गझलकार ए. के. शेख, प्राचार्य डॉ. सुरेश शिंदे, प्रा. लक्ष्मण ढोबळे, पद्माकर कुलकर्णी, राहुल शहा यांच्या हस्ते साहेबराव ठाणगे यांना राज्यस्तरीय काव्य पुरस्कार, श्रीरंजन आवटे यांच्या कादंबरीसाठी, नीलम माणगावे, प्रा. डॉ. नलिनी महाडिक यांना कथासंग्रहासाठी राज्यस्तरीय साहित्य पुरस्काराने तर डॉ. सात्ताप्पा खरबडे यांना कृषी लेखनासाठी गौरविण्यात आले.

रोख रक्कम २५०० रुपये, सन्मानपत्र, सन्मानचिन्ह, शाल, श्रीफळ असे पुरस्कारांचे स्वरूप होते. वितरण सोहळ्याचे प्रास्ताविक कार्यवाह गणेश यादव, सूत्रसंचालन शाखेचे अध्यक्ष सुरेश पवार यांनी केले. याप्रसंगी मान्यवर कवींची बहारदार काव्यमैफल रंगली.

---

## शाखा सोपाननगर (सासवड)

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोपाननगर (सासवड) व भैरवनाथ विद्यालय, वनपुरी यांचे संयुक्त विद्यमाने वनपुरी येथे क्रांतिदिनाचे औचित्य साधून इयत्ता ९वीमधील विद्यार्थ्यांना लिहिण्याची व वाचण्याची सवय लागावी म्हणून निबंध स्पर्धा घेण्यात आली. त्यामधील विद्यार्थ्यांची गुणवत्ता तपासण्यात आली. त्यामधून तीन क्रमांक निवडण्यात आले. निवडण्यात आलेल्या गुणवंतांना मसाप शाखा, सोपाननगर तर्फे सन्मानचिन्ह देऊन गौरवण्यात आले. यासाठी मोहन साळवी, सिद्राम भुजवळ, प्रा. पांडुरंग शिरवळकर, डॉ. कोडीतकर, ॲड. बेल्हेकर या सर्व शाखा सदस्यांसह शाळेच्या मुख्याध्यापिका सौ. बोकडमॅडम, श्री. कदमसर, श्री. मुळीकसर आणि शाळेतील इतर अध्यापक यांनी विशेष असे सहकार्य केले.

गौरवप्राप्त विद्यार्थी- कृष्णा सु. गोवाडे (तृतीय क्रमांक), अर्चना शि. बनसोडे (द्वितीय क्रमांक), तेजस शि. कुंभारकर (प्रथम क्रमांक).

---

## ठाणे जिल्हा शाखा

१. शुक्रवार दि. २ जून २०१७, डॉ. शरद घाटे लिखित 'शरदाचे चांदणे' अर्थात मराठी प्रेमकविता व रसास्वाद या ग्रंथावर मुक्तसंवाद आयोजित केला होता. इस. १८८५ ते १९८० या कालखंडातील ठळक कवींच्या प्रेमकवितांचा काव्यरसास्वाद व थोडक्यात समीक्षा या ग्रंथात आहे. या कार्यक्रमात प्रा. अशोक बागवे, प्रा. डॉ. वीणा सानेकर, प्रा. सौ. आसावरी फडणीस वक्त्या म्हणून सहभागी होत्या. यावेळी व्यक्त झालेले विचार - 'समीक्षात्मक लिखाण करणे अवघड असते. कारण ज्यांचे समीक्षण करायचे त्या विभागातील इतर पुस्तकांचे वाचन व मनन करावे लागते - समीक्षात्मक लिखाण हे जबाबदारीचे काम आहे.'

२. शाखेचा (स्थापना १० जून १९७९) ३८वा वर्धापन दिन दि. १३ ऑगस्ट २०१७ या दिवशी डॉ. अंजली कीर्तने यांच्या 'माझा कलाप्रवास' या व्याख्यानाने साजरा झाला. डॉ. आनंदीबाई जोशी : काही आणि कर्तृत्व (चरित्र), गानयोगी पं. द.वि. पलुस्कर (चरित्र) या ग्रंथाच्या कीर्तने या लेखिका तर डॉ. आनंदीबाई जोशी : काळ आणि कर्तृत्व, दुर्गाबाई एक शोध इ. लघुपटांच्या त्या निर्मात्या आहेत. त्यामुळे लेखिका, कवयित्री, लघुपट निर्मात्या अशा दीर्घ अनुभवाच्या त्या धनी आहेत.

३. शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा २३ जुलै २०१७ या दिवशी आयोजित केली होती. या सभेत अहवाल व सनदी लेखापाल (सीए)द्वारा जमाखर्च सादर केला गेला.

---

## शाखा : पिंपरी चिंचवड

१. महाराष्ट्र साहित्य परिषद, पिंपरी-चिंचवड शाखेतर्फे २३ जुलै २०१७ रोजी 'पावसाळी कविता व गाणी' हा कार्यक्रम प्रतिभा महाविद्यालय, चिंचवड येथे आयोजित करण्यात आला. प्रमुख पाहुणे म्हणून चित्रपट निर्माते श्री. अविनाश आवटे तसेच माजी नगरसेवक संभाजी बारणे उपस्थित होते. उपस्थित कवींनी पावसाळ्याचे व पावसाचे विविध पदर उलगडून रसिकांना चिंब चिंब केले. सदर कार्यक्रमास कार्याध्यक्षा विनिता ऐनापुरे, कार्यवाह संजय जगताप, कोषाध्यक्ष विजय नाईक व अन्य सदस्य उपस्थित होते. अध्यक्ष राजन लाखे यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले तर दत्तू ठोकळे यांनी आभार मानले. कार्यक्रमाच्या पहिल्या सत्राचे सूत्रसंचालन समृद्धी सुर्वे यांनी तर दुसऱ्या सत्राचे सूत्रसंचालन अश्विनी रानडे यांनी केले. सदर



अनुक्रमणिका

कार्यक्रमात ४६ कवींनी सहभाग घेतला.

२. दिनांक १३ ऑगस्ट २०१७ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी-चिंचवड शाखा, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ आणि महाराष्ट्र साहित्य प्रसारिणी सभा यांच्या संयुक्त विद्यमाने 'साहित्य लेखन कार्यशाळा' व्यापक स्वरूपात आयोजित करण्यात आली. चिंचवड येथील प्रतिमा महाविद्यालयाच्या ऑडिटोरियममध्ये संपन्न झालेल्या या एकदिवसीय कार्यशाळेचे तीन सत्रामध्ये विभाग केले होते. पहिल्या सत्रात ललित लेखन, दुसऱ्या सत्रात वैचारिक लेखन, तर तिसऱ्या सत्रात कविता लेखन आणि प्रश्नोत्तरासाठी प्रत्येक सत्रात १५ मिनिटे राखून ठेवण्यात आली होती.

सदर कार्यशाळेचे उद्घाटन अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे पूर्वाध्यक्ष मा. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या हस्ते झाले. अध्यक्षपदी अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष श्रीपाद भालचंद्र जोशी तर प्रमुख पाहुणे म्हणून म.सा.प.चे कार्याध्यक्ष मिलिंद जोशी उपस्थित होते. ललित लेखनासाठी भारत सासणे, वैचारिक लेखनासाठी - डॉ. श्री. मा. भावे, तर कविता लेखनासाठी श्री. प्रदीप निफाडकर यांनी मार्गदर्शन केले. मान्यवरांमध्ये डॉ. राजेंद्र कांकरिया, डॉ. समिता टिल्लू, श्रीमती विनिता ऐनापुरे, डॉ. रजनी शेठ, डॉ. श्रीकृष्ण जोशी, संजय जगताप उपस्थित होते. मसाप पिंपरी-चिंचवडचे अध्यक्ष राजन लाखे यांनी साहित्य लेखन कार्यशाळेची गरज व पिंपरी चिंचवडमध्ये सदर कार्यशाळा घेण्यासंबंधीची पार्श्वभूमी विषद केली, तर सचिन इटकर यांनी आभार मानले. सदर कार्यशाळेत चिंचवड, मंचर-तळेगाव, मावळ, अहमदनगर आदी ठिकाणांहून १६०जण सहभागी झाले होते.

## शाखा चाळीसगाव

१. शाखेने माहे जून २०१७पासून शहरातील मुख्य रस्त्यावरील घाटे संकुलाच्या इमारतीत कार्यालयाकरिता गाळा भाडेतत्त्वावर घेतला असून दि. १७ जुलै २०१७ रोजी तेथे ग्रंथपूजन व वृक्षपूजन करून शाखेच्या कार्यालयाचा शुभारंभ शाखेचे विश्वस्त प्रा. जयसिंग बागुल व कार्यकारिणी सदस्या सौ. प्रतिभा बागुल यांच्या हस्ते करण्यात आला. याप्रसंगी विश्वस्त मा. अरुण भावसार, सुभाषशेठ करवा, उत्तमराव काळे, डॉ. विनोद कोतकर यांचेसह विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुनील राजपूत तसेच संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, कार्याध्यक्ष विजय पाटील, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, उपाध्यक्षा ॲड. सुषमा पाटील यांच्यासह सर्व कार्यकारिणी सदस्य उपस्थित होते.

शाखेच्या सर्व कार्यकारिणीने रु.२००/- प्रतिमाह देणगी देऊन सदर गाळाभाडे व देखभाल खर्च करण्यात येणार आहे. तसेच कार्याध्यक्ष विजय पाटील व प्रमुख कार्यवाह गणेश आढाव यांनी प्रत्येकी रु. १०,०००/- अनामत ठेवून अत्यावश्यक सामग्री खरेदी करण्यात आली आहे. शाखेची प्रत्येक सभा स्वतःच्या जागेत घेताना शाखेस धन्यता वाटते.

२. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा चाळीसगावतर्फे दि. ३० जुलै २०१७ रोजी भडगाव रोडवरील वाणी मंगल कार्यालय येथे सायं. ५ वा. 'एक कवी, एक कवयित्री' या कार्यक्रमात कवयित्री धुप्पड यांनी आपले मनोगत व्यक्त केले.

कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी म.सा.प. पुणे शाखा चाळीसगावचे कार्याध्यक्ष विजय पाटील हे होते. तर प्रमुख उपस्थिती म्हणून मसापचे विभागीय कार्यवाह तथा म.सा.प.चे जळगाव जिल्हा प्रतिनिधी प्राचार्य तानसेन जगताप आणि त्यांचे सोबतच मान्यवर अतिथी कवी डॉ. अशोक कौतिक कोळी, जामनेर व म.सा.प. प्रमुख कार्यवाह गणेश आढाव हेही व्यासपीठावर विराजमान होते. याप्रसंगी कार्यक्रमाचे देणगीदार श्री. मनोहर सूर्यवंशी व श्री. के. एन. तडवी सर यांनाही सन्मानित करण्यात आले.

मान्यवर कवी व कवयित्री यांची मुलाखत घेत त्यांचा लेखन प्रवास रसिकांसमोर आणण्यासाठी संवादक म्हणून कवी मनोहर जोंधळे, ॲड. सुभाष पाटील व प्रा. अशोक वावळे हे यथोचित प्रश्नोत्तरांच्या माध्यमातून भावपूर्ण संवाद साधत होते.

उपस्थित मान्यवर व विश्वस्तांना गुलाबपुष्प देत कार्यवाह बी. एल. ठाकरे यांनी स्वागत केले.

स्वागत समारंभाचे सूत्रसंचालन शालिग्राम निकम यांनी केले तर श्रावणी कोटस्थाने हिने ईशस्तवन सादर केले.

सदर काव्यानंदासह मुलाखतीचा आस्वाद घेण्यासाठी म.सा.प.चे उपाध्यक्ष समाजभूषण रामभाऊ शिरोडे, म.सा.प. कार्यकारी विश्वस्त- अरुण भावसार, विश्वस्त डॉ. विनोद कोतकर, डॉ. सौ. चेतना कोतकर, प्रा. जयसिंग बागुल, सुभाष करवा, उत्तमराव काळे यांच्यासह कार्यकारिणी सदस्य - प्रा. पी. एस. चव्हाण, रामचंद्र गोसावी, सौ. संगीता देव, सौ. प्रतिभा बागुल, कवी सुनील गायकवाड, अशोकबापू ब्राह्मणकर, राकेश बोरसे, गौतमकुमार निकम व सौ. लिलावती जगताप आणि श्री. दत्तभक्त मंडळ सदस्यांसह योगाचार्य वसंत चंद्रात्रे, भा. ल. कोतकर तसेच म.सा.प. सभासद बंधू व भगिनी आणि परिसरातील कवी, कवयित्री व श्रोते बहुसंख्येने उपस्थित होते.

# मराठी विज्ञान परिषदेची पहिली पन्नास वर्षे

• **प्रास्ताविक :** २४ एप्रिल १९६६ रोजी मुंबईत मराठी विज्ञान परिषद (मविप लघुरूप) स्थापन झाली. ५० वर्षांचा छोटा आढावा येथे आहे. मविपचे संकेतस्थळ www.mavipamumbai.org आहे. ग्रंथालीने (मराठी विज्ञान परिषद नाबाद ५१) ३०० पानी पुस्तक डिसेंबर २०१६मध्ये प्रसिद्ध केले. ते संकेतस्थळीसुद्धा आहे. मी (निवृत्त) अभियंता पण मराठी भाषा व साहित्य यांची गोडी आहे. मी १९९७पूर्वी मुंबईकर, पुढे पुणेकर. १९६० साली ठाणे येथे मराठी साहित्यसंमेलन पाहिले. मराठी विज्ञान संमेलने असावीत असे वाटले. माझे वय २८ वर्षे होते. मुंबई मराठी साहित्य संघ कार्यकारिणीत ३ वर्षे मी होतो. काही विज्ञानप्रसार व एक छोटे विज्ञान संमेलन केले.

• **कार्यक्षेत्र :** मुंबई हे साहित्य संघाचे कार्यक्षेत्र. मविपचे कार्यक्षेत्र महाराष्ट्र (व बाहेर) असावे असे मी सुचवले. अनेकांनी पाठिंबा दिला. तेव्हा विज्ञानप्रसारक सामाजिक संस्था नव्हती. काहींच्या सहीने वृत्तपत्रात जाहीर करून मुंबईत स्थापना सभा झाली. सभेने मला कार्यवाह नेमले, समिती नेमली. घटनानियम, नोंदणी केल्यावर ती पहिली कार्यकारिणी झाली. नोंदलेल्या संस्थेचे नाव व उद्देश बदलता येत नाहीत. चार उद्देश ठरवले. (१) विज्ञानाचा प्रसार प्रामुख्याने मराठी भाषेतून करणे. (२) विज्ञान व्यक्त करण्यासाठी मराठी भाषा समृद्ध करणे. (३) विज्ञानाचे जीवनात महत्त्व वाढवणे. (४) वैज्ञानिक संशोधन व विज्ञानाची प्रगती करणे.

• **मराठी विज्ञान संमेलन :** डिसेंबर १९६६ मुंबईत पहिले मराठी विज्ञान संमेलन झाले. दर संमेलनात (हजेरी ४०० ते १२००) मान्यवरांतर्फे उद्‌घाटन, वैज्ञानिक संमेलनाध्यक्ष यांचे भाषण. स्मरणिका प्रकाशन, काही सत्कार, भाषणे, परिसंवाद. दोन दिवस हे कार्य, तेव्हा विज्ञानकृती प्रदर्शन. तिसरा दिवस विज्ञान सहली वगैरे. मविप कार्यकारिणी संमेलनाध्यक्ष निवडते. ५० वर्षांत ५० संमेलने ठिकठिकाणी झाली. क्र. ३९ पासून संमेलनास अधिवेशन नाव आहे.

• **शाखा विभाग :** काही काळ परिषदेने ठिकठिकाणी शाखा स्थापन केल्या. खूप शाखा सांभाळणे कठीण झाले. घटना दुरुस्तीने एप्रिल १९७१पासून शाखा स्वायत्त व संलग्न झाल्या. त्यांच्या नावात शाखाऐवजी विभाग शब्द आला. विभागांना मध्यवर्ती कार्यकारी मंडळात काही प्रतिनिधित्व व प्रवासखर्च मिळू लागले. विज्ञान संमेलन मध्यवर्तीतर्फे किंवा (मध्यवर्ती + स्थानिक विभाग)तर्फे होते. ५० वर्षे संपताना ७६ विभाग होते.

• **मुखपत्र :** मराठी विज्ञान परिषद पत्रिका हे सोळा पानी मासिक एप्रिल ६८पासून सुरू झाले. ते शासनाकडे नोंदावे लागले. तत्पूर्वी जानेवारी १९६७पासून ४ पानी वार्तापत्र होते. सभासदांशी संपर्क राहिला. काही लेखही आले. पत्रिका हळूहळू अनेक पानांची, मोठा आकार, सुंदर कव्हर व कित्येक उत्तम लेखयुक्त होत गेली. प्लास्टिक, प्रदूषण वगैरे विशेषांक निघाले. सर्वोत्तम दिवाळी अंक असाही बहुमान एकदा मिळाला.

• **कार्यालय :** सामाजिक संस्थेला कार्यालय लागते. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने विनामूल्य थोडी जागा मविपला दिली. पहिले संमेलन झाल्यावर परिषद कार्यालय माझे कार्यालय (चौथा मजला, ताडदेव एअरकंडिशंड मार्केट, मुंबई ४०००३४) येथे व आसपास भाड्याची खोली येथे होते. १९८३मध्ये विज्ञान भवनाचा पहिला टप्पा झाल्यावर तेथे मविपचे कार्यालय गेले.

• **इमारत :** मविपच्या इमारतीला सवलतीने जमीन मिळण्यासाठी महाराष्ट्र शासनास १९६७मध्ये अर्ज केला. सभागृह, ग्रंथालय, प्रयोगशाळा, शिक्षणवर्ग वगैरेसाठी जागा हवी होती. जमीन, द्रव्य मिळणे वेळखाऊ असते. टप्प्याटप्प्याने तळमजला, पहिला मजला (प्रत्येक ३०० चौ. मीटर) बांधले. दुसरा मजला बांधणे शक्य. गच्चीवर प्रयोगबाग. इमारत नाव विज्ञानभवन (पत्ता : पुरव मार्ग, शीव-चुनाभट्टी, मुंबई ४०००२२, फोन : ०२२-२४०५४७१४ (मंगळवारी बंद)).

• **अन्यभाषकांशी सहकार्य :** मुंबईत कित्येक अन्यभाषक विज्ञानप्रसारक आहेत. त्यांच्यासह मविपने काही सभा इंग्रजीतून घेतल्या. एकमेकांच्या अडचणी व उपाय समजू लागले. पुढे National Centre for Science Communicators संस्था स्थापण्यास व कार्यालयीन मदत देण्यास मविपने पुढाकार घेतला. या सेंटरमार्फत भारतात व विदेशातही काही कार्यक्रम झाले, काही प्रकाशने झाली, देशविदेशातील काही संशोधनसंस्था व तज्ज्ञ यांच्याशी संपर्क आहे.

• **लोकोपयोगी प्रयोग :** मविपने कित्येक लोकोपयोगी कामे केली. मुलगा वयात येतो, मुलगी वयात येते हे समजवणारे दृक् श्राव्य कार्यक्रम शाळांतून दाखवले. गोबर वायू कसा करतात, सौरऊर्जा कशी पकडावी-वापरावी, मोकळ्या जागेत वनस्पती कशा लावाव्यात, काही पाकक्रिया वगैरे प्रात्यक्षिके दाखवली जातात. विद्यार्थी प्रयोग करतात. विज्ञान खेळणी व कोडी असतात. विज्ञानकथा लेखनाबाबत मार्गदर्शन तज्ज्ञांकडून केले जाते.

• **संकीर्ण :** अन्यही विविध कार्य झाले आहे. परिभाषा निर्मिती, विविध कोश निर्मिती, विविध स्पर्धा, २८ फेब्रुवारी राष्ट्रीय विज्ञानदिन साजरा करणे, वगैरे. अनुदाने, देणग्या, जाहिराती वगैरे मार्गांनी मविप मुंबई येथे वार्षिक रुपये एक कोटी जमतात. विद्यार्थी ते मोठे शास्त्रज्ञ असे कित्येक मविपचे सभासद आहेत. शासन, अनेक संस्था व कित्येकांच्या सहकार्याने मविप मोठी झाली.

●

**म. ना. गोगटे**
४, पवन अपार्टमेंट, लक्ष्मी पार्क,
नवी पेठ, पुणे ४११०३०.
फोन : ०२०-२४५३७५७४
ई-मेल : mng1932@yahoo.com



अनुक्रमणिका






## खंडाळ्याच्या शिवारात रंगले मसापचे पहिले शिवार साहित्य संमेलन

चोहीकडे हिरवेगार डोंगर, उंच नारळाची गर्द झाडी, उसाची हिरवीगार शेती, पक्ष्यांचे मंजुळ आवाज, जनावरांचे हंबरण्याचे आवाज आणि त्यांच्या गळ्यातील वाजणाऱ्या घंटा, ओढ्यातून वाहणाऱ्या पाण्याचा खळखळाट अशा प्रसन्न वातावरणात गावातले शेतकरी, शेतमजूर आणि ग्रामस्थांनी साहित्याचा आस्वाद घेतला. ना मंडप, ना भपका, ना कुण्या पुढाऱ्यांचा बडेजाव, ना सत्कार सोहळ्याचे कौतुक, ना रुसवे फुगवे बळीराजाच्या आणि काळ्या आईच्या सहवासात माती, नाती आणि संस्कृतीचा जागर करीत महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या इतिहासातले पहिले शिवार साहित्य संमेलन अजुनुज (ता. खंडाळा, जि. सातारा) या गावातील शिवारात रंगले. महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा खंडाळा आणि ज्ञानदीप क्रेडिट को-ऑप सोसायटी यांच्या संयुक्त विद्यमाने विश्वनाथ पवार यांच्या शिवारात या साहित्य संमेलनाचे आयोजन प्रसिद्ध ग्रामीण कथाकार आणि कथाकथनकार रवींद्र कोकरे यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आले होते. या वेळी संमेलनाचे उद्घाटक आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, सातारा जिल्हा प्रतिनिधी रवींद्र बेडकिहाळ, विनोद कुलकर्णी खंडाळा शाखेचे अध्यक्ष विलास वरे, लेखक शंकर कवळे, जिजाबा पवार उपस्थित होते. उद्घाटन सत्रानंतर कविसंमेलन कथाकथन असे कार्यक्रम झाले.

प्रा. मिलिंद जोशी म्हणाले, 'केवळ महानगरापुरती मर्यादित न राहता साहित्य परिषद ग्रामीण भागापर्यंत, शिवारापर्यंत पोचते आहे, ही समाधानाची बाब आहे. साहित्य रसिकांना संमेलनापर्यंत पोचणे शक्य नसेल तर संमेलनांनी त्यांच्यापर्यंत पोचले पाहिजे. कारखानदार त्यांनी निर्माण केलेल्या वस्तूची किंमत ठरवितात, बिल्डर त्यांनी बांधलेल्या घरांच्या किंमती ठरवितात. अन्नधान्य निर्माण करणारे शेतकरी मात्र त्यांच्या मालाची किंमत ठरवू शकत नाहीत. ही या देशाची शोकांतिका आहे. 'बळीराजा' असे गोंडस नाव देऊन शेतकऱ्यांचा बळी दिला जात आहे, हे दुर्दैवी आहे. पुढील शिवार साहित्य संमेलन दुष्काळी भागात होईल.

रवींद्र कोकरे म्हणाले, 'जोपर्यंत शिवारातली माणसं लिहीत आहेत, साहित्याचा आनंद घेत आहेत तोपर्यंत भाषेची आणि साहित्याची काळजी करण्याची गरज नाही. शिवारातल्या माणसांनीच आजवर मराठी भाषा टिकवली आहे.' अत्यंत साधेपणाने पार पडलेल्या या संमेलनाची सांगता पिठलं - बाजरीची भाकरी, जवसाची चटणी वरण - भात आणि शिरा असा फक्कड मराठमोळा बेत असलेल्या भोजनाने झाली. ज्यांचा धडा पाठ्यपुस्तकात असूनही ज्यांना पोटासाठी गवंडी काम करावे लागते असे कराडचे कादंबरीकार शंकर कवळे यांचा सत्कार सर्वांनाच सद्गदित करून गेला.

बुक-पोस्ट


प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : September 2017
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

